


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,

धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


---

# निवेदन



अनुक्रमणिका




संपादक

डॉ. मीना वैशंपायन
डॉ. मंगला सरदेशपांडे
डॉ. आनंद जोशी
श्री. नाना जोशी

रचना

हेमचंद्र कराडकर

अक्षरजुळणी

अभिजित पंडित

मुद्रण व्यवस्था

विजय एंटरप्रायझेस,
'भाग्यरेखा', जुना बेलापूर रस्ता,
कळवा, ठाणे.

मालक, मुद्रक, प्रकाशक
आणि पत्रव्यवहार

श्री. नाना जोशी
४ – अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई – ४०० ०१२


# तपशील


अंक पाचवा, वर्ष पहिले, १९९६


## अनुक्रमणिका


**लेखकाचा परिचय**

आयरिस मरडॉक १
डॉ. आनंद जोशी

**लेखमाला**

असा हा वाचनछंद ३८
डॉ. मीना वैशंपायन

**मिशेल तुर्निए – फ्रायडे**

फ्रायडे ४५
डॉ. मंगला सरदेशपांडे

**साहित्य आणि संशोधन**

स्वयंप्रकाशी ताऱ्यांचे शोधनाट्य
(भाग २) ७२
नाना जोशी

**लेखमाला**

प्रेमपुजारी डी. एच्. लॉरेन्स ८८
श्रीकृष्ण कामत


अनुक्रमणिका



## संपादकीय

प्रिय रसिकहो,

'तपशील'चा हा पाचवा अंक. आधी योजिल्यापेक्षा अंक बाहेर पडण्यास जरासा उशीर झाला आहे याची आम्हांस जाणीव आहे. परंतु वेगवेगळ्या कारणांनी अंकाचे काम थोडेसे लांबले. क्षमस्व !

या पाचव्या अंकात एका नवीन लेखकाची ओळख करून देत आहेत, डॉ. आनंद जोशी. आयरिस मरडॉक ही लेखिका विचारवंत, तत्त्वचिंतक आहे. तिच्या एका महत्त्वाच्या कादंबरीचा संक्षिप्त सारांश इथे दिला आहे. त्याचबरोबर तिची एक प्रदीर्घ मुलाखतही यात समाविष्ट केली आहे. तिच्या व्यक्तिमत्त्वातील तत्त्वचिंतनाच्या पैलूवर त्यामधून प्रकाश पडेल त्याचप्रमाणे तिच्या साहित्यविषयक मतांचाही आपणास परिचय होईल. मागच्या तिसऱ्या अंकात पी. डी. जेम्स ही रहस्यमय ललितकृतींची लेखिका आपणास भेटली होती. या अंकात आयरिस मरडॉकच्या भेटीचा आनंद आपण घेऊ शकाल. त्याचबरोबर डॉ. जॉन्सन, यांचा चरित्रकार बॉसवेल आणि 'फ्रायडे' या 'मिथ'बद्दल लिहिणारा मिशेल तुर्निए हेही आपल्याला भेटतील.

डी. एच. लॉरेन्स या लेखकाच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकणाऱ्या चरित्राचा अनुवाद आपण वाचता आहात 'प्रेमपुजारी' या शीर्षकांतर्गत ! या भागात 'रेनबो' या त्याच्या कादंबरीचे प्रकाशन, त्यावरील टीकेचे वादळ याविषयी वाचता येईल. तसेच त्याच्या लेखन प्रेरणा कोणत्या होत्या याचेही आपणास दर्शन होईल. 'असा हा वाचनछंद' या लेखमालेत यावेळी आपल्या वाचनाबद्दल जर्मेन ग्रियर ही ऑस्ट्रेलियन लेखिका आपल्याशी गप्पा मारणार आहे. स्त्रीवादी विचारांची पुरस्कर्ती, कार्यकर्ती अशी ग्रियर एक प्रकाशनसंस्थाही चालवते. ठाम विचार, रोखठोक बोलणे यामुळे तिचे लेखन समकालीनांपेक्षा वेगळं दिसतं.

पुढचा अंक हे वर्ष संपण्याअगोदर आपणापर्यंत पोचावा यादृष्टीने आम्ही प्रयत्नशील आहोत. आपण देत असलेल्या सहकार्याबद्दल आभार. यापुढे यापेक्षाही अधिक सहकार्याची अपेक्षा करीत आहोत. लोभ असावा ही विनंती.

आमच्या वाचकांना व हितचिंतकांना दिवाळीच्या शुभेच्छा

**– संपादक**

**'तपशील'चा तपशील**

* सुट्या अंकाची किंमत रुपये १००
* (६ अंकांची) वार्षिक वर्गणी रुपये २०१
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १२० ते १२५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात दुसऱ्या अंकाला वर्गणी पाठवली तरी पहिल्या अंकापासूनच अंक देण्यात येतील.

---

अनुक्रमणिका



# लेखकाचा परिचय

## आयरिस मरडॉक

– डॉ. आनंद जोशी

### (१) आयरिस मरडॉक

मरडॉक जीन आयरिस – लोकप्रिय नाव आयरिस मरडॉक

जन्म आयर्लंडच्या डब्लीन शहरात १५/७/१९१९ रोजी. सत्याहत्तर वर्षांची आयरिस मरडॉक ही सुप्रसिद्ध ब्रिटिश कादंबरीकार आणि तत्त्वज्ञ. ऑक्सफर्डच्या सेंट अँड्रु कॉलेजमध्ये १९४८ ते १९६३ पर्यंत तत्त्वज्ञान विषयात फेलो व अध्यापक. तिचं पहिलं पुस्तक प्रकाशित केलं केंब्रिजनं १९५३ साली सात्र– रोमँटिक रॅशनॅलिस्ट !

'अंडर दि नेट' (लंडन १९५४) या कादंबरीनं तिची बहुप्रसवा कादंबरीकार म्हणून कारकीर्द सुरू झाली. आजपर्यंत तिच्या चोवीस कादंबऱ्या प्रकाशित झाल्या असून तिने नाटकं, कविता, व तत्त्वज्ञानविषयक अभ्यासपूर्ण ग्रंथही लिहिलेले आहेत. तिच्या कथारूप साहित्यात तिच्यातील तत्त्वज्ञ सतत दिसून येतो. कला व नितीमूल्यं यांचं नातं तसंच वास्तव, सत्य, स्वातंत्र्य आणि शिवम् यांचं स्वरूप याबद्दल तत्त्वज्ञ म्हणून तिला सतत असलेली ज्ञानलक्ष्यी आस्था तिच्या कथारूप साहित्यात पदोपदी प्रत्ययास येते. दुसऱ्याचं अस्तित्व, दुसऱ्याचा अनुभव, याची सत्यता मान्य केली तरच व्यक्तीला वास्तवाचं आकलन होतं, असं वास्तव तिनं तिच्या साहित्यात उभं केलं आहे. प्रेम या भावनेमुळे व्यक्तीला मुक्ती मिळते. प्रेम ही एक प्रचंड शक्ती. या शक्तीनं प्रत्येक दुसरी व्यक्ती हे एक स्वतंत्र व्यक्तित्व आहे, हे माणसाला उमगतं. हे उमगणं हीच त्याची मुक्ती असते. समाज म्हणजे गडद, व्यामिश्र व संदिग्ध वातावरण. या वातावरणात घडणाऱ्या आकस्मिक व न सांगता येणाऱ्या घटना आणि व्यक्ती यांना सामोरे जात, तोंड देत, प्रत्येक माणूस आपल्या नैतिक व्यक्तित्वाला आकार देत असतो, असं समाजाचं चित्रण आयरिसनं तिच्या कांदबऱ्यांत वाचकांना सादर केलं आहे. तिला विनोदासाठी मिळालेला खजिना म्हणजे व्यक्ती– व्यक्तीमधील संघर्ष ! हे वाचकाला 'ए सिवीयर्ड हेड' (१९६१) या कादंबरीत प्रकर्षानं जाणवतं. तिची विनोददृष्टी, कथनावरची पकड, कथानक तसंच व्यक्तिरेखा निर्मितीचं प्रभुत्व, ही तिच्या कादंबऱ्यांची ठळक लक्षणं. पण याहीपेक्षा महत्त्वाचं म्हणजे नैतिक मूल्यांबद्दल

तिला वाटणारी आस्था, आत्मिक अनुभूतीचं महत्त्व व जाण, याचं तिच्या कादंबऱ्यात होणारं दर्शन; नेमक्या याच मर्मस्थानामुळे तिच्या कादंबऱ्यांना 'इंग्लिश पारंपारिक सामाजिक कादंबरी' या वाङ्मयप्रकारात मानाचं पान मिळालं व आयरिस मरडॉकला आधुनिक इंग्लिश लेखकांच्या पहिल्या रांगेत स्थान मिळालं. 'द-सी' या तिच्या कादंबरीला (१९७८) बुकर मॅकोनेल पुरस्कार मिळाला आणि 'डेम ऑफ ऑर्डर ऑफ दि ब्रिटिश अेम्पायर' असा तिचा सन्मान ब्रिटिश सरकारनं केला.

आयरिसने वयाच्या सदतिसाव्या वर्षी, १९५६ साली जॉन बेलेशी विवाह केला. ऑक्सफर्डच्या सेंट कॅथरिन कॉलेजमध्ये जॉन बेले वार्टन प्रोफेसर ऑफ इंग्लिश लिटरेचर असून, तो त्या कॉलेजचा फेलो आहे. ऑक्सफर्ड शायरमधील स्टीपल अॅस्टन येथे आयरिस व जॉन बेले एका टुमदार घरात राहातात. घराच्या सर्वात वरच्या मजल्यावर तिचे खाजगी कलादालन आहे. लंडनमधील तिच्या आवडत्या चित्रकारांची चित्रं दालनात दिमाखानं लावलेली आहेत. याच दालनात जॉन हॅंपनडेनने मार्च १९८३ मध्ये आयरिसची मुलाखत घेतली.

जॉन हॅंपनडेन शेफिल्ड विद्यापीठात इंग्लिश लिटरेचरचा अध्यापक आहे. 'जॉन हॅंपनडेनने वाङ्मयीन मुलाखतीची कला पूर्णत्वास नेली आहे' अशी शाबासकी दि संडे टाइम्स या ब्रिटिश वृतपत्राने जॉनला दिली आहे.

१९८३ साली आयरिस मरडॉकची 'फिलॉसॉफर्स प्युपिल' ही कादंबरी प्रकाशित झाली व गाजली. त्यामुळे या मुलाखतीची सुरुवात 'फिलॉसॉफर्स प्युपिल' वरील चर्चेने झाली आहे.

## (२) अनुवादकाचे टिपण

आयरिस मरडॉक व जॉन हॅंपनडेन यांच्या चर्चेचा अनुवाद मराठी वाचकांसाठी सादर करत आहे. विश्लेषणात्मक चर्चा व सातत्याने जी चालूच राहाते अशी चर्चा (ससटेंड अर्ग्युमेंट) वाचण्याची मराठी ललित वाङ्मयाच्या वाचकाची मानसिकता नसते. कदाचित तसे वाङ्मय वाचण्याची मराठीत परंपरा नसेल. परन्तु अशा तऱ्हेच्या विश्लेषणात्मक तर्कनिष्ठ चर्चेत एक सौंदर्य असते व त्यातून कष्टसाध्य आनंद मिळतो.

त्या निर्मितीक्षम लेखिकेने आपलं सर्व जीवन उत्तम कलाकृती निर्मिण्यात घालवले अशा लेखिकेची मुलाखत तिच्या जीवनाशी निगडित असते व त्या मुलाखतीला आत्मचरित्रात्मक पैलू असतात. पडद्यामागे घडणाऱ्या कितीतरी गोष्टी अशा मुलाखतीत उघड होतात. जीवनभर जमवलेल्या विविधरंगी क्षणांनी आणि अनुभवांच्या कणांनी भरलेली अत्तराची कुपी लेखक हळुवारपणे उघडत असतो. ती कुपी त्याला तशी उघडायला लावणं हे मुलाखतकाराचं कौशल्य.

या कुपीतून अलगद येणारा मंद सुवास वाचकाला आनंद देतो, त्याबरोबर वाचकाला समृद्ध करणारी वेगळी दृष्टी देतो.

लेखिकेने मुलाखतीत सांगितलेले विचार म्हणजे त्रिकालाबाधित सत्ये नव्हेत. परंतु जीवनभर केलेल्या मनन चिंतनाने व मिळवलेल्या सूक्ष्म दृष्टीने या विचारांना एक सखोलता प्राप्त झालेली असते. मुलाखत हा तसा जिवंत प्रकार असल्यामुळे ते विचार सहजतेने वाचकांपर्यंत पोचतात. वाचकाला आपले विचार त्या विचारांशी घासून पाहाता येतात. या मुलाखतीतसुद्धा कितीतरी स्थळं अशी असतील की तेथे वाचक लेखिकेशी पूर्णत: सहमत होणार नाही. पण वाचकांची विचारशक्ती जागृत होण्यास व स्वत:चे विचार तपासून पहाण्यास अशा स्थळांची मदत होईल. या मुलाखतीत काही विचारवंतांचे उल्लेख आले आहेत, त्यांच्याबद्दलची थोडक्यात माहिती या टिपणात देत आहे. ख्रिश्चॅनिटी व पाश्चिमात्य संस्कृतीतील काही संकल्पनांचे स्पष्टीकरण येथे देत आहे. विशिष्ट संज्ञांचे अर्थ व स्पष्टीकरण माहीत असल्यास लेखिकेचे मुद्दे समजण्यास सोपे जाईल; हा या मागील हेतू आहे. दि टेम्पेस्ट या शेक्सपियरच्या नाटकातील प्रॉस्पेरो व कॅलिबन या दोन पात्रांचे उल्लेख मुलाखतीत वारंवार येतात, त्या दोन व्यक्तिरेखांचा परिचय थोडक्यात करून दिला आहे.

## (३) सिमॉन वेल (१९०९ – १९४३)

फ्रेंच तत्त्वज्ञ, निबंधकार व गूढवादी. जन्म पॅरिस येथे एका ज्यू सुखवस्तू प्रतिष्ठित कुटुंबात. फ्रान्समधील उत्तम शिक्षणसंस्थात तिचं शिक्षण झालं. विशीत ती तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र शिकली. कठोर परिश्रम करणाऱ्या सिमॉनची बौद्धिक भूक अफाट होती. तिने ग्रीक, लॅटिन, संस्कृत या प्राचीन भाषांबरोबर विविध आधुनिक भाषा आत्मसात केल्या. पाश्चात्त्य व पौर्वात्य धर्म, विज्ञान, गणित, व वाङ्मय या विषयांचाही तिने अभ्यास केला.

सत्य व सामाजिक न्याय याचा शोध घेण्यासाठी तिने कोणतीही तडजोड न करता स्वत:ला वाहून घेतलं होतं. आयुष्यभरचा तिचा तो वसा होता. रेनॉल्ट मोटार कारखान्यात कामगार म्हणून तिनं काम केलं. तसं काम करण्याची तिला मुळीच जरुरी नव्हती. स्पॅनिश यादवी युद्धात १९३६ मध्ये तिने रिपब्लिकनांच्या बाजूने भाग घेतला. १९३८ च्या सुमारास तिला पहिला गूढ अनुभव आला. पुढे अशाच गूढ अनुभवांची मालिकाच तिने अनुभवली. या गूढ अनुभवांचा तिच्या लेखनावर गाढ परिणाम झाला. परंतु कोणत्याही प्रस्थापित धर्माशी ती संलग्न नव्हती.

दुसऱ्या महायुद्धात तिने इंग्लंडमध्ये फ्रेंचांच्यावतीने, फ्रान्समध्ये चालू असलेल्या प्रतिकार चळवळीत भाग घेतला व तेथेच तिचा क्षयरोगाने अंत झाला. सर्व भौतिक सुखांपासून स्वत:ला निष्ठुरपणे वंचित ठेवून सिमॉन जीवन जगली. मृत्यूनंतर 'वेटिंग फॉर गॉड', आणि 'नोटबुक्स'



अनुक्रमणिका

ही तिची आत्मचरित्रात्मक दोन पुस्तकं प्रकाशित झाली. हे सर्वच लिखाण गूढगुंजनात्मक व त्यातला विचार नेमका काय आहे असं न समजण्यासारखे आहे. या दोन पुस्तकांमुळे तिचे विचार प्रकाशझोतात आले. तिला लौकिक मिळाला तो मृत्यूनंतर! व याला ही दोन पुस्तकं कारणीभूत ठरली.

सिमॉन वेलचे विचार सामाजिक (सोशल) व आधिभौतिक (मेटॅफिजिकल) या दोन क्षेत्रांवर केंद्रित झाले आहेत. हे विश्व निष्ठुर नियमानुसार चालू आहे. अशा विश्वात माणूस चांगुलपणाची 'सत्' ची दुर्दम्य अपेक्षा उरी बाळगून असतो. मानवी व्यक्तिमत्त्वातील हाच एक पवित्र भाग! सिमॉनच्या दृष्टीने समाज हा एक अवाढव्य प्राणी. हा समाज खोटी श्रेष्ठता देतो. आधुनिक औद्योगिक समाजात मूल्ये उखडली जातात, पण नवीन मूल्ये माणसापुढे ठेवली जात नाहीत. वर सांगितल्यानुसार माणसात सत्च्या अपेक्षेचा जो भाग असतो त्या संदर्भातील मूल्ये सिमॉनला अभिप्रेत आहेत हे लक्षात ठेवले पाहिजे. विचार आणि शारीरिक कष्टाची कामे याचा मिलाफ सिमॉनला हवा होता. समाज – प्राण्याच्या आत्मिक रचनेत ज्यावेळी शारीरिक मेहनतीचे एकात्मीकरण होईल त्याचवेळी व्यक्तीला स्वातंत्र्य, प्रतिष्ठा समूहजीवन हे खऱ्या अर्थानं जाणवू लागेल.

सिमॉन वेलच्या विचारांच्या केंद्रस्थानी एक मूलभूत मानवी वैफल्य आहे. दोन विचारांच्या अंगभूत संघर्षातून हे वैफल्य निर्माण झालं आहे. विश्वामध्ये कार्यरत असलेली कठोर व्यक्ती निरपेक्ष, जणू यांत्रिक यंत्रणा आणि मानवाच्या अंतरंगात असलेली 'सत् ' ची अपेक्षा. या मध्यवर्ती संघर्षातून सिमॉन वेलचे आधिभौतिक शास्त्र (मेटाफिजिक्स) उभे राहाते.

विचाराप्रमाणे आचार ठेवणारी सिमॉन वेल. कारखान्यात कामगार, शेतावर शेतमजूर अशी ढोर गड्याची कामे तिने केली. 'बोले तैसा चाले' या वृत्तीने राहिल्यामुळे सिमॉन वेलच्या विचारांचे महत्त्व व हेच तिच्या नावलौकिकाचे कारण.

**दि टेम्पेस्ट :** हे शेक्सपियरचं शेवटचं नाटक. हे अद्भुतरम्य नाटक लिहून शेक्सपियरन रंगभूमीचा निरोप घेतला. १६११ साली लिहिलेल्या या नाटकाचा पहिला प्रयोग १ नोव्हेंबर १६११ रोजी इंग्लडच्या राजदरबारात झाला. चार्लस पहिला याची राजकन्या एलिझाबेथ हिच्या साखरपुड्यानिमित्त जो उत्सव चालला होता त्यातील मनोरंजनाचा एक कार्यक्रम म्हणून या नाटकाचा प्रयोग झाला होता.

या नाटकाचा आरंभ सागरी तुफानानं होतो. नेपल्सचा राजा अलोन्सो, याचं जहाज वादळाच्या तडाख्यानं फुटतं. राजा अलोन्सो, त्याचा भाऊ सेबॅस्टिन, राजपुत्र फर्डिनँड आणि मिलानचा ड्यूक अँटोनियो दैवयोगानं एका बंदराच्या किनाऱ्याला लागतात. हे एक मंतरलेलं बेट होतं. त्या बेटावर प्रॉस्पेरो व त्याची कन्या मिरांडा हे दोघे राहात होते. आता मिरांडा पंधरा वर्षांची



अनुक्रमणिका

सुंदर युवती झाली होती. बारा वर्षापूर्वी म्हणजे मिरांडा तीन वर्षाची असतानाची गोष्ट. प्रॉस्पेरो त्यावेळी मिलानमध्ये राहात होता. जादू शिकण्याच्या अभ्यासात दंग असलेला प्रॉस्पेरो खरा मिलानच्या ड्यूक होणार होता. तो अभ्यासात दंग आहे असे पाहून अँटोनियोनं त्याचं ड्यूक-पद बळकावलं. त्याने प्रॉस्पेरो व मिरांडा यांना होडीत बसवून अफाट सागरावर सोडून दिलं. गोन्झॅलो या दयाळू सरदाराने प्रॉस्पेरोच्या होडीत खाद्यपदार्थ, कपडे, व प्रॉस्पेरोची मौल्यवान पुस्तकं ठेवली होती. नशीब चांगलं म्हणून ते दोघं एका बेटावर येऊन पोचले. या बेटावर पूर्वी एक चेटकीण राहात होती. प्रॉस्पेरो त्या बेटावर पोचला तेव्हा ती चेटकीण काळाच्या उदरात गडप झाली होती. या चेटकिणीचं नाव सिकोरॅक्स. या सिकोरॅक्सचा रानटी मुलगा कॅलिबन! प्रॉस्पेरोने कॅलिबनला नोकर म्हणून कामाला ठेवले. सिकोरॅक्स चेटकिणीने 'ॲरियल' या जीवात्म्याला स्वत:चा गुलाम करून बांदिस्त करून ठेवलं होतं. प्रॉस्पेरोने ॲरियलची सुटका केली. वनवासात आल्यापासून प्रॉस्पेरोनं अभ्यासानं अद्‌भुत शक्तींवर विजय मिळवून जादूगिरीत अत्युत्तम प्रावीण्य मिळवलेलं होतं.

ज्याच्यावर अन्याय झाला आहे असा प्रॉस्पेरो, त्याची सुंदर कन्या मिरांडा, ज्याने अन्याय केला तो अँटोनियो, राजा अलोन्सो, राजपुत्र फर्डिनँड, जीवात्मा ॲरियल, गोन्झॅलो, जंगली कॅलिबन, दारुडे खलाशी, आणि इतर व्यक्ती यांच्या परस्परसंबंधातून हे नाट्य उलगडत जातं. बऱ्याच घटना घडतात. फर्डिनँड, मिरांडाच्या प्रेमात पडतो. अलोन्सोचा भाऊ सेबॅस्टिन याने राजाचा खून करावा असा कट अँटोनियो रचतो, पण ॲरियलमुळे तो कट यशस्वी होत नाही. दारुड्या खलाशांच्या नादाने कॅलिबन प्रॉस्पेरोच्या खुनाचा कट रचतो. ॲरियल पावा व पखवाजातून मोहित करणारे सूर निर्मितो, या सुरांचा मागोवा काढताना कॅलिबन व त्याचे दारुडे खलाशी मित्र खुनाचा कट विसरतात.

प्रॉस्पेरो फर्डिनँडच्या वागणुकीनं खूष होतो. मिरांडाचा हात त्याच्या हातात देतो. कॅलिबनच्या कटाची माहिती ॲरियल प्रॉस्पेरोला देतो. प्रॉस्पेरो संतप्त होतो. कॅलिबनला तो दलदलीत बंदिस्त करतो. राजा अलोन्सो, व त्याच्या सर्व सहकाऱ्यांना जंगलात बंदिस्त करण्याची आज्ञा प्रॉस्पेरो ॲरियला देतो. या सर्वांना बंदिवासात टाकल्यानंतर ॲरियल त्यांची दयनीय अवस्था प्रॉस्पेरोला सांगतो. राजा अलोन्सो, अँटोनियो, या सर्वांना प्रॉस्पेरो बोलावून घेतो व स्वत:ची हकिकत व अँटोनियोचे काळे कृत्य नेपल्सच्या राजापुढे उघड करतो. कॅलिबन व त्याच्या मित्रांनाही तो सोडून देतो. प्रॉस्पेरो राजाला सांगतो. "तुम्ही नेपल्सला परत जा. तेथे फर्डिनँड व मिरांडा विवाहबद्ध होतील व मग मी मिलानला परत जाईन." जीवात्मा ॲरियलची गुलामगिरीतून प्रॉस्पेरो मुक्तता करतो. ॲरियलला हवं असलेलं स्वातंत्र्य मिळतं व नाटक संपतं.

**कॅलिबन :** कॅलिबन हा प्रॉस्पेरोचा गुलाम सेवक. हा बुद्धिहीन पशुतुल्य मनुष्य. सिकोरॅक्स

या चेटकिणीला पिशाच्च्यापासून झालेला मुलगा! 'कॅलिबन' हा कॅनिबॉल या शब्दाची अक्षरं फिरवून शेक्सपियरनं तयार केलेला शब्द. कॅनिबॉल ( Cannibal) हा शब्द त्या काळी नुकताच वापरात येत होता. मॉंटेनचा 'ऑन कॅनिबॉल्स' हा सुप्रसिद्ध निबंध प्रकाशित झाला होता. मॉंटेनचा हा निबंध 'दि टेम्पेस्ट' या नाटकाचा एक आधार (Source) समजला जातो. हा कॅलिबन आहे तरी कसा? मनाने व शरीरानं ओबडधोबड! माणसापेक्षा खाली आणि पशूपेक्षा वर या स्तरावर (कॅलिबनचं अस्तित्व. तो माणसातील जनावरांच्या प्रवृत्तींचं प्रतिनिधित्व करतो. विवेक आणि लालित्य हे मानवाला मिळालेले दोन गुण माणसाला उदात्त बनवतात) कॅलिबनजवळ या दोन गुणांचा पूर्ण अभाव होता. परंतु त्याच्या बुद्धीच्या नैसर्गिक मर्यादा त्याचा अधमपणा सौम्य करतात! सुधारणा होणे ही गोष्ट त्याच्या कुवतीपलिकडची असल्यामुळे तो नाटकातील इतर व्यक्तिरेखांपेक्षा, म्हणजे अँटोनियोपेक्षा कमी दोषी असतो. ॲन्टोनियोच्या बुद्धीची कुवत उत्तम असून तो स्वत:ला इव्हिलच्या हवाली करतो. कॅलिबनजवळ तर कितीतरी स्वाभाविक त्रुटी, व अवगुण असतात. निसर्गत: हिणकस असलेला माणूस हा बुद्धिमान पण विकृत माणसापेक्षा बरा या तत्त्वाचं कॅलिबन हे उदाहरण शेक्सपियरनं निर्माण केलं आहे. एका सुनितात शेक्सपियरने लिहिलं आहे, "रानटी तणाहून अतिशय वाईट जास्त दुर्गंध देणाऱ्या लिली!"

कॅलिबन हे संस्कारविरहित निसर्गाचं, नागड्या निसर्गाचं प्रतीक आहे. कॅलिबन जरी जन्मत: मूर्ख असला तरी त्याला प्रॉस्पेरोच्या अद्भुत शक्तीची जाण आहे. शेक्सपियरनं कल्पनेच्या कुंचल्यानं विनोद व काव्य यांचा वापर करत कॅलिबनच्या व्यक्तिरेखेत गडद रंग भरून ती व्यक्तिरेखा जिवंत केली आहे. कॅलिबन ही शेक्सपियरची मौलिक, स्वतंत्र व जोमदार निर्मिती आहे.

**प्रॉस्पेरो :** 'दि टेम्पेस्ट' नाटकातील वनवासात राहाणारा हा मिलानचा ड्यूक. तो त्याच्या पाशी असलेल्या शक्तिशाली जादूने या नाटकातील प्रत्येक व्यक्तिरेखेच्या नशिबावर नियंत्रण ठेवतो. प्रॉस्पेरोची शक्ती इतकी पूर्ण, त्याचं ज्ञान इतकं व्यापक, त्याचा न्याय व दया याचा मिलाफ इतका बेमालूम की बऱ्याच समीक्षकांना तो ईश्वराची प्रतिकृती वाटतो. तर काही समीक्षकांच्या दृष्टीनं प्रॉस्पेरो हे दैवी न्यायाचं रूपक. या नाटकात प्रॉस्पेरोचं एक भाषण आहे. त्या भाषणात प्रॉस्पेरो आपल्या अद्भुत शक्तीचा आपण शपथपूर्वक त्याग करणार आहोत असं अश्वासन देतो. शेक्सपियरचं हे शेवटचं नाटक! शेक्सपियर आपल्या अद्भुत लेखणीला आता विश्रांती देणार हे जणू प्रॉस्पेरोच्या भाषणातून ध्वनित झाल्याचं समीक्षकांना जाणवतं.

शेक्सपियरनं निर्मिलेल्या व्यक्तिरेखात प्रॉस्पेरोला अनन्यसाधारण स्थान प्राप्त झालं आहे. त्याने निर्मिलेल्या सर्व व्यक्तिरेखांमध्ये प्रॉस्पेरो ही एकच व्यक्तिरेखा अशी आहे की जिचे स्वत:च्या नशिबावर नियंत्रण आहे. प्रॉस्पेरोच्या या निम – दैवी स्थानामुळे नाटकात घडणाऱ्या घटनांपासून तो अलग राहातो. व प्रेक्षकांना तो काही अंशी परका वाटतो. या सर्वाचा परिणाम

म्हणून प्रॉस्पेरोजवळ गुण व शहाणपण असूनसुद्धा ही व्यक्तिरेखा प्रेक्षकांना न रुचणारी वाटते.

बहुसंख्य आधुनिक वाचकांना प्रॉस्पेरोतील नैतिक पंतोजी विचलित करतो. प्रॉस्पेरोला विनोद बुद्धी नाही असं वाचकांना वाटतं. फर्डिनँड, अेरियल, कॅलिबन यांना प्रॉस्पेरोनं दिलेल्या कडक वागणुकीचा वाचकांना खेद वाटतो. तो सर्व गोष्टी स्वत:ला हव्या तशा, मनासारख्या करून घेतो. यात वाचकांच्या वरील भावनेचा उगम असू शकेल. नाटकातील व्यक्तिरेखांच्या अंतर्मनातील संघर्ष पाहाण्याची, शोधण्याची आधुनिक वाचकांना सवय झालेली असते तसा संघर्ष प्रॉस्पेरोत त्यांना दिसत नाही. नाटक सरू होण्यापूर्वीच प्रॉस्पेरोच्या जीवनातील झगडा व अंतर्मनातील संघर्ष होऊन गेलेला असतो. परंतु प्रॉस्पेरोचा अंतिम निर्णय महत्त्वाचा! शत्रूशी वागताना सूडा-ऐवजी तो सद्‌गुणांची कास धरतो, या त्याच्या नाट्यपूर्ण निवडीमुळे प्रॉस्पेरो ही एक उदात्त व्यक्तिरेखा होते. माझ्या डोक्यात 'दि टेम्पेस्ट' सतत घोळत असते. असं आयरिस मरडॉकने म्हटलं आहे म्हणून दि टेम्पेस्टबद्दलचे व प्रॉस्पेरो, कॅलिबनबद्दलचे टिपण दिले आहे. दि टेम्पेस्ट हे ओढून ताणून 'दि फिलॉसॉफर्स प्युपिल' या कांदबरीला लावू नये हा आयरिस मरडॉकने दिलेला इशारा तितकाच महत्त्वाचा आहे.

**गुड आणि ईव्हिल :**

ख्रिश्चन तत्त्वज्ञानातील या दोन संज्ञा आयरिस मरडॉकच्या वाङ्‌मयात वारंवार वापरलेल्या आढळतात. तिच्या मुलाखतीतही या संज्ञांचा उच्चार वारंवार येतो. गुड आणि इव्हील या संज्ञांची व्याख्या, व्याप्ती, व अन्वयार्थ याबद्दलचा वांद गेली कित्येक शतके पाश्चिमात्य तत्त्वज्ञानात चालू आहे. आणि त्याबद्दलचा निर्णय अजूनही दृष्टिपथात नाही. प्रत्येक तत्त्ववेत्त्यांनी या शब्दांचा वेगवेगळा अर्थ लावून या शब्दांची व्यापकता वाढवली आहे. त्याची थोडक्यात माहिती पुढीलप्रमाणे : गुडला मराठीत 'चांगले' किंवा 'सत्' हा प्रतिशब्द देता येईल. एखाद्या गोष्टीचे जे लक्षण स्तुत्य किंवा प्रशंसनीय असते त्याला तत्त्वज्ञानात 'गुड' म्हणतात. ज्या गोष्टी अंगभूतपणे किंवा स्वयंभू चांगल्या असतात त्यांना 'इन्ट्रिझिक गुड' (स्वयंभू चांगले) म्हणतात. नैतिक सद्‌गुण, आरोग्य, मैत्री, संगीत ही त्याची काही उदाहरणे असू शकतील. ज्यावेळी चांगलेपणा हा त्या गोष्टींच्या बाहेर असतो म्हणजे त्या गोष्टींच्या परिणामांवर असतो त्यांना 'एक्स्ट्रिंझिक गुड' म्हणतात. 'बहिर्निष्ठ चांगले' असे त्याचे मराठीत रूपांतर होऊ शकेल. उदा. – शल्यचिकित्सा. वैद्यकशास्त्र या आरोग्य टिकवणाऱ्या व वाढवणाऱ्या गोष्टी, म्हणून शस्त्रक्रिया, वैद्यकीय उपचार हे 'बहिर्निष्ठ चांगले' यात मोडतात. काही 'गुड' नैतिकतेशी संबंधित नसते पण मानवी क्रियांशी संबंधित असते. उदा. – नियमित व्यायाम घेणे. काही गोष्टी मानवी क्रियांशी संबंधित नसून सुद्धा 'गुड' असतात. उदा. – चांगले हवामान. वरील गोष्टी 'नॉन मॉरल गुड' मध्ये मोडतात. मॉरल गुड किंवा गुडनेस याचा उगम माणसाच्या वर्तनात होतो. मॉरलगुड किंवा नैतिक चांगलेपणाची व्याख्या करणे कठीण असून हा अत्यंत वादग्रस्त विषय आहे.

बहुसंख्य पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांनी 'हाय्येस्ट गुड' (Highest good) 'अत्युच्च चांगले' ही कल्पना मांडली आहे. अत्युच्च चांगल्याचा संबंध 'सुखाच्या अनुभूतीशी येतो. विविध तत्त्वज्ञांचे याबद्दलचे विचार येथे देणे अशक्य आहे.

**ईव्हिल :**

ईव्हील ही संज्ञा पाश्चिमात्य व ख्रिश्चन तत्त्वज्ञानाशी संबंधित आहे. ईव्हिल'ला 'अशिव', 'असत्' हे मराठी प्रतिशब्द आहेत. परंतु नुसता प्रतिशब्द देऊन 'ईव्हिल'चा अर्थबोध होत नाही म्हणून हे स्पष्टीकरण. मनुष्य व प्राणिमात्रांना जे हानीकारक ते ईव्हिल! मॉरल ईव्हिल (नैतिक ईव्हिल) व नॅचरल ईव्हिल (नैसर्गिक ईव्हिल) असे पारंपारिकरीत्या ईव्हिलचे दोन प्रकार आहेत. नैतिक ईव्हिल माणसाच्या वर्तनातून निर्माण होते तर नैसर्गिक ईव्हिल हे माणसाच्या वर्तनावर अवलंबून नसते. धरणीकंप, ज्वालामुखी ही नैसर्गिक ईव्हिलची उदाहरणे आहेत.

'प्रॉब्लेम ऑफ ईव्हिल' हा मोठा गुंतागुतीचा कठीण प्रश्न तत्त्वज्ञांपुढे आहे.

परिपूर्ण व सर्वशक्तिमान अशा ईश्वराने जग निर्माण केले मग त्यात ईव्हिल आलेच कसे, याचे स्पष्टीकरण देणे कठीण आहे. कारण त्यामुळे ईश्वर या संकल्पनेलाच हात घालावा लागतो. पाश्चात्त्य तत्त्वज्ञांना हा पेच गेले कित्येक शतके पडला आहे. म्हणूनच ईव्हिलच्या प्रश्नाचे पडसाद वाङ्मयात सतत उठताना दिसतात. नैतिक ईव्हिल हे सकारात्मक (पॉझिटिव्ह) नसून चांगले-पणाचा अभाव म्हणजे नैतिक ईव्हिल असे स्पष्टीकरण काही तत्त्वज्ञ देतात. काहींच्या मते नैतिक ईव्हिल हे सकारात्मक व जोमदार असते. सॉक्रेटिस म्हणतो, ईव्हिलची निर्मिती माणसाच्या मनातील गोंधळातून व अज्ञानातून होते. ईव्हिल कृती करणाऱ्या माणसाला ईव्हिलचे परिणाम जर माहीत असतील तर तो तसे वागणार नाही असे सॉक्रेटिसचे मत आहे.

**ओरिजिनल सिन** ( Original sin) **:**

'मूळ पाप' (ओरिजिनल सिन) ही ख्रिश्चन संकल्पना आहे. नैतिक ईव्हिलची निर्मिती मूळ पापापासून झाली. ईश्वराने केलेले नियम मोडणे म्हणजे 'पाप' व मानवाने केलेले कायदे मोडणे म्हणजे गुन्हा! ॲडॅम आणि इव्हने मोहाला बळी पडून ईश्वराच्या नियमाचे उल्लंघन केले. जे फळ खाण्यास बंदी होती ते फळ खाल्ले आणि मूळ पाप घडले. मानवी मनाच्या दुबळेपणातून नैतिक ईव्हिलची अशी निर्मिती झाली. व ती पुढे मानव- जातीत चालू राहिली.

**डेव्हिल :**

ईव्हिलचा सर्वोच्च जीवात्मा (सुप्रिम स्पिरिट) म्हणजे डेव्हिल! डेव्हिल किंवा सैतान (Saitan) माणसाच्या मन - बुद्धीत शिरून त्याला ईव्हिल वर्तन करावयास लावतो. ज्युइश, ख्रिश्चन व मुस्लिम ईश्वरशास्त्रात डेव्हिल ही संकल्पना मानलेली आहे.



अनुक्रमणिका

'दि फिलॉसॉफर्स प्युपिल' ही आयरिस मरडॉकची पाचशे सत्तावन पानी गाजलेली कादंबरी. या कादंबरीचा सारांश देण्याचा प्रयत्न केला आहे. लेखिकेच्या प्रतिभेचा विलास आणि कथानकाचा विकास या सारांशात आणणे अशक्य ! फुलाने बहरलेल्या आणि डवरलेल्या प्रचंड वृक्षाचे सौंदर्य एका छोट्या फांदीत कसे मावणार?

'दि फिलॉसॉफर्स प्युपिल' या कादंबरीच्या संदर्भातील आयरिस मरडॉकची मुलाखत सोबत देत आहोत. या कादंबरीच्या कथानकाचा सारांश व त्या संबंधीची टिपणे या अंकात दिली आहेत. ही टिपणे आयरिस मरडॉकची मुलाखत समजण्याससुद्धा उपयोगी पडतील.

### फिलॉसॉफर्स प्युपिल

एका निवेदकानं कादंबरीचं निवेदन केलं आहे. त्याचं नाव आहे 'एन' फॉर नॅरेटर ! कादंबरीच्या प्रारंभकात दोन प्रकरणं. पहिलं प्रकरण 'एक अपघात' तर दुसरं प्रकरण 'आमचं शहर' या प्रकरणात निवेदक शहराची ऐतिहासिक माहिती सांगत गावाची सद्यस्थिती व कादंबरीतील व्यक्तिरेखांची ओळख करून देतो. या दोन प्रकरणात प्रारंभक संपतं. त्यानंतर प्रदीर्घ प्रकरणे म्हणजे 'आमच्या शहरातील घटना' ! कादंबरीतील सर्व नाट्य यात उलगडत जातं. 'नंतर काय घडलं' हे शेवटचं छोटसं प्रकरण वाचकांची जिज्ञासापूर्ती करणारं.

#### एक अपघात

पावसाळ्याचे दिवस. रात्रीचे अकरा वाजले होते. जॉर्ज मॅकफ्रे आपल्या आईला भेटून परत निघाला होता. त्याच्याबरोबर त्याची बायको स्टेला होती. पावसाळी आकाशात वीज चमकावी तशी क्षुल्लक कारणावरून जॉर्ज व स्टेला यांच्या वादाची ठिणगी उडाली आणि भांडणास सुरुवात झाली. जॉर्जचा स्वभाव तापट, उतावळा आणि आक्रस्ताळा रागाच्या भरात तो काय करेल याचा नेम नव्हता. म्हणून स्टेला त्याला म्हणाली 'जॉर्ज मी गाडी चालवते.' पण जॉर्ज तिच्या अंगावर खेकसला व त्यानं भन्नाट वेगानं गाडी चालवायला सुरुवात केली. स्टेला आणि जॉर्ज यांचं विवाहानंतर फारसं कधीच पटलं नव्हतं. खटके उडत. स्टेला पडतं घेई. स्टेलाचं जॉर्जवर अतिशय प्रेम होतं. जॉर्जचा स्टेलाबद्दलचा तिटकारा दिवसेंदिवस वाढत चालला होता. जॉर्ज डायना या वेश्येच्या प्रेमात पडला होता. डायनाला त्यानं एक छोटासा फ्लॅट तिला घेऊन दिला होता. स्टेलाला या सर्व गोष्टींची कल्पना होती.

पावसाची रिपरिप चालू होती. मध्यरात्रीला गाडी एखाद्या पिसाळलेल्या प्राण्यासारखी रस्त्यावरून धावत होती. स्टेलानं काहीही बोलावं आणि जॉर्जनं त्याचा भलताच अर्थ घ्यावा असं चाललं होतं. जॉर्जच्या रागाचा पारा चढत होता. समोर छोटासा पूल होता. खालून कालवा वाहात होता. दलदलीच्या कालव्यात आज पाणी भरलं होतं. जॉर्जने रागाच्या भरात स्टेलाच्या

थोबाडीत मारली. 'जॉर्ज गाडी थांबव' स्टेला ओरडली. 'नरकात नरकात' असं ओरडत त्याने पक्ष्याची मान मुरगळावी तसं स्टिअरिंग जोरात फिरवलं. वेगात असलेली गाडी गरकन फिरली आणि रस्ता सोडून कालव्याच्या दिशेनं धावू लागली. दगड, गोटे धोंड्यावरून गाडी वेड्या-सारखी सुटली. वरून अभद्र पाऊस पडत होता गाडी खडबडीत दगडांवरून थरथरत चालली होती. गाडीवर पडणाऱ्या पावसाचे थेंब अस्ताव्यस्त उडत होते. पावसातून धावत येणाऱ्या कुत्र्यानं अंग, डोकं थर्रकन् हलवून उडवावे तसे. जार्जला घुसमटत आहोत असं वाटत होतं. त्याचं डोकं गरम होऊन जड झालं होतं. जॉर्जला वाटलं हार्ट अॅटॅक येऊन आपण मरणार. त्यानं चालत्या गाडीचा दरवाजा उघडला आणि तो गाडी बाहेर अर्धवट फेकला गेला. तोंडावर गार पावसाचा हबका बसला. गाडीच्या थंड पत्र्यावरून त्याचा हात हळूहळू सरकत सुटत होता. दगड, धोंडे माती गवत याचा स्पर्श आणि गंध. धाडकन आवाज, धपकन पाण्यात पडल्याचा आणि किंचाळ्या ! त्याने डोळे उघडून पाहिलं तर वरती पुलाच्या कठ्ठ्यावर काळा डगला घातलेली एक आकृती उभी होती, डेव्हिलसारखी. बऱ्याच झालेल्या पावसामुळें कालव्यात पाणी खळाळत होतं. पुलावरच्या दिव्याच्या प्रकाशात पाण्यात जाणारी गाडी चकाकन होती. तो धावला, पोहत गाडीपर्यंत पोचला. गाडी दलदलीत अडकली होती. गाडीच दरवाजा उघडाच होता. पाणी आत शिरत होतं, बेशुद्ध स्टेलाला त्यानं बाहेर काढलं आणि तो कसाबसा तिला किनाऱ्यावर घेऊन आला. पुढं काय झालं त्याला कळलं नाही. अॅम्बुलन्स आली. स्टेलाला रुग्णालयात ठेवलं होतं. जॉर्जला मलमपट्टी करून घरी सोडण्यात आलं होतं.

स्टेला रुग्णालयात असताना तिला भेटायला येणारी पहिली व्यक्ती म्हणजे जॉर्जचा धाकटा भाऊ ब्रायंन याची बायको गॅब्रियल. जॉर्ज, जॉर्जची आई, भाऊ ब्रायन सर्व स्टेलाला येऊन भेटून गेले होते.

**आमचं शहर**

अेनिस्टन हे इंग्लंडमधील एक गरम झऱ्याचं शहर. पृथ्वीच्या पोटातून उकळतं पाणी वर घेऊन येणारे हे नैसर्गिक झरे. धरतीच्या उदरातून मायेची ऊब घेऊन येणारं हे पाणी ! या पाण्यामुळे बरेच रोग बरे होतात असा लोकांचा समज. गावातले लोक आरोग्याच्या आशेनं आणि ययाती करणाच्या अपेक्षेनं रोज या गरम कुंडात पोहण्यासाठी येतात. या गरम झऱ्याभोवती बांधलेले तरण तलाव, बसण्याउठण्यासाठी बांधलेल्या खोल्या, विश्रांतीसाठी आणि गाव-गप्पांसाठी उपयोगात येणारं उपहारगृह, यामुळे निसर्गाच्या झऱ्याभोवती निर्माण झालेलं इमा-रतींचं कडं म्हणजे एनिस्टन शहराचं धगधगतं केंद्रस्थान होतं. पृथ्वीच्या पोटातील घडामोडीतून खळबळत वर येणारं उकळतं पाणी आणि एनिस्टन समाजात घडणाऱ्या खळबळी यांचं एक अनामिक नातं होतं. एनिस्टन शहरात घडणाऱ्या महत्त्वाच्या घटनांची ही गरम झऱ्यांची वास्तू साक्षीदार होती.

या शहराची, तेथील समाजाची आणि मॅकफ्रे कुटुंबाची निवेदक माहिती सांगतो. ही कादंबरी

मॅक फ्रे कुटुंबाभोवती गुंफली आहे.

जॉर्ज मॅकफ्रेच्या कुटुंबाचा पूर्वापार पिढ्यांच्या चामड्याचा मोठा व्यापार होता. कुटुंब सधन होतं. जॉर्जचा बाप ॲलन मॅकफ्रेला कुटुंबाच्या पारंपारिक धंद्यात रस नव्हता. ॲलनच्या वडिलांनी कारखाना विकून टाकला. ॲलन मॅकफ्रे डॉक्टर झाला. दुसऱ्या महायुद्धात त्याने डॉक्टर म्हणून सैन्यात काम केलं. गावातील प्रसिद्ध वकिलाची मुलगी अलेक्झँड्रा हिच्याशी ॲलनचा विवाह झाला. तिला अलेक्स म्हणत. अलेक्स ॲलनला जॉर्ज व ब्रायन हे दोन मुलगे झाले. ॲलन अत्यंत चळवळ्या, अस्वस्थ मनुष्य. त्याला इतर स्त्रियांशी गुप्त संबंध ठेवण्यात आनंद वाटत असे. फिओना गेटस् या तरुणीच्या तो प्रेमात पडला. अलेक्सने ॲलनशी घटस्फोट घेतला. ॲलन – फिओना ला टॉम हा मुलगा झाला. टॉम तीन वर्षांचा असताना फिओनाचा ल्युकेमियानं बळी घेतला. ॲलनच्या संमतीनं अलेक्सनं टॉमचा ताबा घेतला. टॉम, जॉर्ज व ब्रायन अलेक्स–जवळ वाढत होते. ॲलन डॉक्टरी व्यवसायासाठी हाँगकाँगला गेला व तेथे एका प्रयोगशाळेत गूढ अपघातात मेला.

टॉम हा जॉर्ज व ब्रायन यांचा धाकटा सावत्र भाऊ. टॉम दोघांपेक्षा खूपच लहान अलेक्सचा तो अत्यंत लाडका होता. यामुळे जॉर्ज त्याचा द्वेष करत असे. पण ब्रायन मात्र वडील भावाप्रमाणे टॉमची काळजी घ्यायचा.

स्टेला हेनरिक् या ज्युइश आणि हुशार मुलीशी जॉर्जचा प्रेमविवाह झाला. लग्नानंतर स्टेलानं शिक्षण सोडून दिलं. 'रुफस' हा जॉर्ज व स्टेलाचा मुलगा. घरी घडलेल्या गूढ अपघातात रुफस मेला. गावातील काही लोक म्हणतात की पुत्रशोकामुळे जॉर्ज चिडचिडा झाला, तर काही लोकांच्या मते जॉर्जच्या विचित्र स्वभाव व वर्तनामुळे रुफसचा मृत्यू ओढवला.

ब्रायनने गावातील 'बोकॉकस्' या मोठ्या दुकानाच्या मालकाच्या मुलीशी गॅब्रियलशी विवाह केला. ब्रायन व गॅब्रियल यांचा मुलगा ॲडम मॅकफ्रे !

कथेतील घटनांच्या वेळी अलेक्स सहासष्ट वर्षांची, जॉर्ज चव्वेचाळीस वर्षांचा, ब्रायन एकेचाळीस, टॉम वीस, व ॲडम आठ वर्षांचा !

जॉन रॉबर्ट रोझेनॉव एनिस्टनचा रहिवासी. त्याचे आईवाप रशियातून येऊन इंग्लंडमध्ये स्थायिक झाले. कथेतील घटनांच्या वेळी तो वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध आणि महत्त्वाचा तत्त्वज्ञ झाला होता. अमेरिकेतील विद्यापीठात, लंडनच्या महत्त्वाच्या विद्यापीठात प्राध्यापक म्हणून त्याने मानाच्या जागा भूषवल्या होत्या. निवृत्तीनंतर तो एनिस्टनला राहावयास येणार ही बातमी एनिस्टनमधील अभिजनांच्या चर्चेचा विषय झाली होती. जॉर्ज– स्टेलाच्या अपघातानंतर जॉन रॉबर्ट रोझेनॉवचं एनिस्टन शहरात आगमन होतं. जॉर्ज एके काळी जॉन रॉबर्टचा विद्यार्थी होता. जॉर्जला जॉनचं प्रचंड आकर्षण होतं.

**आमच्या शहरातील घटना**

जॉन मॅकफ्रेच्या अपघाताबद्दल बऱ्याच उलट सुलट वदंता गावात उठल्या होत्या. पुलाच्या

कठ्ठ्यावर उभी असलेली काळ्या डगल्यातील व्यक्ती म्हणजे शहरातील चर्चचा फादर ब्राउन होता. त्यानेच धावपळ करून ॲम्बुलन्स बोलावली होती.

स्टेला रुग्णालयात असताना गॅब्रियलला म्हणाली "मी उगाचच काहीतरी बोलले, त्यामुळे जॉर्जचा रागाचा पारा चढला आणि हा अपघात झाला. मी गप्प बसले असते तर हे सर्व टळलं असतं." स्टेलाच्या या बोलण्याने गॅब्रियल चकित झाली होती. स्टेलाचं जॉर्जवरचं हे जगावेगळं प्रेम पाहून, तिला स्टेलाची कीव करावी का तिला रागावून जागं करावं असा संभ्रम गॅब्रियलला पडला होता. रुग्णालयातून स्टेलानं स्वत:च्या घरी न जाता तिनं ब्रायन व गॅब्रियल यांच्या घरी काही दिवस विश्रांतीसाठी जायचं असं ठरलं होतं.

ब्रायन हा स्वार्थी पुरुष होता. तो त्याच्या मनाला येईल तसेच वागायचा व गॅब्रियल ही त्याच्या मनाप्रमाणे वागायची. गॅब्रियलला प्रवासाची खूप आवड तर ब्रायनला प्रवासाचा तिटकारा, म्हणून त्या दोघांनी कधी प्रवास केलाच नाही. गॅब्रियलला पार्ट्या देण्याची हौस तर अशा तऱ्हेचं व्यक्तीचं सामाजिक जीवन हे वरकरणी व वायफळ असा ब्रायनचा विश्वास. त्यामुळे त्याच्या घरी पार्ट्या कधी झडल्याच नाहीत. बरेच वेळा ब्रायन स्वत:च्या विचारात मग्न असायचा. त्याच्या व्यक्तिगत व्यथा हा त्याचा नरक होता. त्याच्यातही एक जॉर्ज दडलेला होता असं शहरातील काहीजणांचं मत होतं.

जॉर्जच्या मनातून तत्त्वज्ञान शिकायचं होतं. तो महाविद्यालयात असताना! यासाठीच जॉन रॉबर्टच्या पाठी होता. 'तत्त्वज्ञान शिकण्याची बौद्धिक ताकद तुझ्यात नाही' असं जॉर्जला स्पष्ट शब्दात जॉन रॉबर्टनी सांगितलं होतं. जॉन रॉबर्ट अमेरिकेला गेल्यानंतर, जॉर्जने त्याच्या पाठोपाठ अमेरिका गाठली. पण तेथेही जॉन रॉबर्टने जॉर्जची डाळ शिजू दिली नाही. जॉर्ज चडफडत, हात हालवत इंग्लंडला परत आला. आपल्या जीवनाचा सत्यानाश जॉन रॉबर्टने केला व तोच आपला उद्धार करेल अशी जॉर्जची खात्री होती. जॉर्जचे सर्व जगाशी संबंध बिघडले होते व त्याचंमूळं या वैफल्यात होतं असा जॉर्जचा समज होता.

जॉर्जची आई अलेक्स. आता सहासष्ट वर्षाची, परन्तु अजून बांधेसूद तारुण्यातील सौंदर्याचे अवशेष अजूनही तिच्या शरीरावर, चेहऱ्यावर उरले होते. तिच्या तरुणपणी जॉन रॉबर्ट हा एनिस्टन शहरातील बुद्धिमान तरुण तत्त्वज्ञ म्हणून प्रकाशात येत होता. अलेक्स त्याच्या प्रेमात पडली होती. पण तसं सांगण्याचा धीर तिला झाला नव्हता. अलेक्सने घरी मेजवानीचा बेत आखून जॉन रॉबर्ट व तिच्या इतर मित्रमैत्रिणींना घरी बोलावलं होतं. तिची मैत्रीण लिंडा त्या पार्टीला आली होती. जॉन रॉबर्ट लिंडाच्या प्रेमात पडला व तिच्याशी विवाहबद्ध झाला. अलेक्स उदास झाली. पण तिच्या करारी स्वभावानं तिला साथ दिली व तिनं ॲलन मॅकफ्रेशी विवाह केला. तो यशस्वी झाला नाही. जॉन रॉबर्ट लिंडाला घेऊन अमेरिकेला गेला. तेथे त्यांना एक मुलगी झाली. लिंडासुद्धा लवकरच मेली. जॉन रॉबर्टने स्वत:च्या कन्येला अमेरिकेतच ठेवली होती. ती मोठी होऊन तिलाही मुलगी झाली. जॉन रॉबर्टची कन्याही फार वर्ष जगली नाही. जॉन रॉबर्टच्या कन्येची मुलगी म्हणजे हॅटी ! जॉन रॉबर्टची नात हॅटी हीच फक्त त्याच्या वैवाहिक

जीवनाच्या बेरीजवजाबाकीचं चालतं बोलतं उत्तर उरलं होतं. जॉन रॉबर्ट एनिस्टनला परत येणार, कदाचित् स्थाईक होण्यासाठी ही बातमी अलेक्सला कळल्यानंतर ती मोहरून गेली होती!

स्टेला ज्या दिवशी रुग्णालयातून ब्रायनकडे राहायला आली, त्याच दिवशी टॉम मॅकफ्रे अचानक लंडनहून आला. टॉम लंडनला उत्तम विद्यापीठात शिकत होता. टॉम सुटीत अलेक्सकडे राहाणार असा ब्रायनचा समज होता. एनिस्टनमधील एक सधन जोडपं अमेरिकेत दोन महिन्यासाठी गेलं होतं; टॉम त्यांच्या घरी राहून त्यांचं घर सांभाळणार होता. स्टेलाची स्थिती पाहून टॉमने ब्रायनला विचारलं 'स्टेला आजारी आहे का ?' ब्रायन म्हणाला, "जॉर्जनं तिला कालव्यात बुडवण्याचा प्रयत्न केला." टॉमला आपण काय ऐकतो आहोत हेच कळेना. गॅब्रियलने विषय बदलला. स्टेला आपल्या खोलीत विश्रांतीच्या निमित्ताने निघून गेली. टॉम म्हणाला "खरंच की माझ्याबरोबर एमा आहे." ब्रायन म्हणाला, "अरे मग तिला आत बोलाव." टॉम इमान्युअेलला आत घेऊन आला व म्हणाला "हा माझा मित्र इमॅन्युअेल. आम्ही त्याला एमा म्हणतो." सगळ्यांचा भ्रमनिरास झाला. गॅब्रियल व ब्रायनला वाटत होतं टॉमने त्याची मैत्रीण बरोबर आणली आहे. टॉम आणि एमा सुटी घालवण्यासाठी घेतलेली मजेदार जबाबदारी पुरी करण्यासाठी निघून गेले.

जॉन रॉबर्टचं एनिस्टनमध्ये आगमन झालं होतं. त्याच्या जुन्यापुराण्या वाड्यात तो उतरला होता. जॉन रॉबर्ट हा त्याच्या परीनं देखणा आहे, का तो जगातला एक कुरूप प्राणी आहे याबद्दल कोणाचंच एकमत नव्हतं. तो उंचनिच आणि धिप्पाड पण आता सुटला होता. मोठं डोकं वरून सपाट, खाली उतरलेलं कपाळ, छोटे कुरळे केस आता राखाडी रंगाचे झाले होते. डोळे मोठे पण चौकोनी, हलक्या पिवळ्या– करड्या रंगाचे, तेजस्वी. चेहरा पसरट, गालाची हाडं उंच, मोठं नाक, मांसल भले मोठे ओठ, कपडे निष्काळजीपणे घातलेले.

तो स्वत:च्या दिवाणखान्यात फेऱ्या मारत होता. सकाळचे दहा वाजले होते. अलेक्सला पत्र पाठवून, त्यानं आज अकरा वाजता तिला बोलावलं होतं. जॉन रॉबर्टचं पत्र वाचून अलेक्स हरखून गेली होती. सव्वादहालाच बेल वाजली, जॉन रॉबर्टने जरा चिडूनच दरवाजा उघडला. जॉर्ज मॅकफ्रे दरवाजात उभा होता. जॉनच्या कपाळाला आठी पडली. जॉर्ज माफी मागत आत शिरला. जॉर्जने जॉन रॉबर्टशी वितंडवाद घालावयास सुरुवात केली. जॉर्ज अद्वातद्वा वाटेल ती विधानं करत होता, तर जॉन रॉबर्टची उत्तरं एक दोन शब्दात असा संवाद घडत होता.

"तुम्ही माझ्या आयुष्याचा सत्यानाश केलात, याची कल्पना आहे तुम्हाला? जर त्यावेळी तुम्ही मला तत्त्वज्ञान शिकण्यापासून परावृत्त केलं नसतं तर मी आज माझ्या जीवनात काहीतरी करु शकलो असतो. तुम्ही ठेवलेल्या उच्च मानकापर्यंत मी कधीच पोचू शकणार नाही या धसक्यातून मी कधी बाहेर येऊ शकलो नाही. म्हणूनच तुम्ही माझं आज काही देणं लागता" जॉर्ज म्हणाला.

"मी तुझं काहीही देणं लागत नाही" जॉन रॉबर्ट.

"गुड आणि इव्हिल यातील माझी श्रद्धा तुम्हीच नष्ट केलीत. माझ्यापासून माझ्यातला मी तुम्हीच चोरून घेतलात. 'ज्यावेळी तुम्ही तत्त्वज्ञानात भव्यदिव्य असं काही करता तेव्हाच तुम्ही तत्त्वज्ञान विषय करता, नाहीतर तुम्ही काहीच करत नाही' असं तुम्हीच सांगायचेत", जॉर्ज तावातावाने बोलत होता.

"तू तुझ्या भ्रमात आहेस जॉर्ज" जॉन रॉबर्ट.

"मी तुमच्यापुढे लोटांगण घालतो. कॅलिबनचा सुद्धा उद्धार केला पाहिजे, त्याला वाचवलं पाहिजे असं तुम्ही एका व्याख्यानात म्हणाला होता. विसरलात तुम्ही?" जॉर्ज म्हणाला.

"होय" जॉन रॉबर्ट.

एवढ्यात बेल वाजली. जॉन रॉबर्टनी दरवाजा उघडला. दरवाज्यात अलेक्स उभी. अकरा वाजले होते. जॉर्जला पाहून ती अस्वस्थ झाली. जॉर्जने काढता पाय घेतला. अलेक्स सुंदर कपडे घालून आली होती. तिचा सुवास अलगदपणे दिवाणखान्यातील जड वातावरण हलकं करत होता. जॉन रॉबर्टने पहिल्या काही मिनिटात भेटीचा उद्देश स्पष्ट केला. जॉन रॉबर्ट म्हणाला "अलेक्स तुझ्याकडे दोन मोठी घरं आहेत. एक घर बंदच आहे. ते बंद घर तू मला भाड्यानं देशील का?"

अलेक्स खूष झाली. ती म्हणाली, "अवश्य देईन."

जॉन रॉबर्ट– "मग भाड्याचं करारपत्र पाठवून दे."

मुलाखत संपली होती. अलेक्सला वाटलं होतं, खूप गप्पा होतील, जुन्या आठवणींना उजाळा मिळेल. माझं मन मी मोकळं करेन. पण तसं काही घडलं नाही. अलेक्स घरी परतली.

जॉन रॉबर्ट शेजारच्या आपल्याच घरात राहावयास येणार याचा मात्र तिला अतोनात आनंद झाला होता. जे घर भाड्यानं द्यावयाचं होतं, त्याची साफसफाई, रंगरंगोटी तिने करून घेतली. वकिलाकडून भाडेपत्र तयार करून जॉन रॉबर्टकडे पाठवून दिलं. अलेक्स उत्सुकतेनं जॉन रॉबर्टच्या पत्राची वाट पाहात होती ते पत्र काही दिवसात आलं. त्या पत्रात जॉन रॉबर्टने लिहिलं होतं– "तू पाठवलेले भाडेपत्र मिळाले. त्या सर्व अटी मला मान्य आहेत. भाड्याचा आकडाही योग्य आहे. माझी नात हॅटी व तिची दाई त्या घरात राहातील. मी काही दिवसात अमेरिकेला परत जात आहे."

अलेक्सच्या तळपायाची आग मस्तकाला पोचली. कागदाचा बोळा करून तिने फेकून दिला. जॉन रॉबर्ट येथे येऊन राहाणार नाही व दोन भलत्याच पोरी आपल्या घरात राहाणार या विचारानं ती अस्वस्थ झाली. आता भाड्याचे करारपत्र परत मागवता येणार नव्हतं वेळ निघून गेली होती.

ऋतूबदलाचे दिवस होते. वसंत ऋतूचं आगमन होत होतं. नव्या जीवांचे नवे अंकुर जमिनीतून वर येत होते. निर्मितीच्या वेणा आणि बदल यांनी वातावरण भारलं होतं. याच दिवसात जॉन रॉबर्टची नात हॅटी व तिची दाई पर्ल, अलेक्सच्या स्लिपर हाउसमध्ये राहावयास आल्या होत्या.

जॉन रॉबर्टनं हॅटी करता पैशाची व्यवस्था केली होती. कर्तव्यात तो कधी मागे पडला नव्हता, पण नातीशी असलेल्या संबंधात प्रेमापेक्षा परखडपणा जास्त होता. हॅटी अमेरिकेत होती तेव्हा सुद्धा जॉन रॉबर्ट अधूनमधून तिला पाच दहा मिनिटं जाऊन भेटत असे, एवढेच! हॅटीला कशी वाढवायची याच्या सर्व सूचना त्याने पर्लला दिल्या होत्या. पर्लचा पगारही उत्तम होता. एनिस्टन शहरातील फादर ब्राउन याने हॅटीला जाऊन भेटावं, तिच्यावर लक्षं ठेवावं, तिला चांगलं शिकवावं यासाठी सुद्धा फादर ब्राउनला त्याने पैसे देऊ केले होते. पण फादर ब्राउनने पैसे घेण्यास नकार दिला होता. फादर ब्राउन व जॉन रॉबर्ट यांची मैत्री नव्हती. पण ईश्वर व शास्त्रीय विषयावर दोघांच्या चर्चा झाल्या होत्या. जॉन रॉबर्टवर जॉर्ज मॅकफ्रेची श्रद्धा असल्यामुळे जॉनने कनवाळूपणे जॉर्जशी बोलून त्याला सुधारण्याचा प्रयत्न करावा असं फादर ब्राउननं सुचवलं होतं. जॉन रॉबर्टने या गोष्टीला स्पष्ट नकार दिला होता.

ब्रायन-गॅब्रियलच्या घरी भलत्याच गोष्टी घडत होत्या. विश्रांतीसाठी आलेली स्टेला एक दिवस घर सोडून गेली ती परत आलीच नाही. ब्रायनला वाटलं ती जॉर्जकडे गेली असेल पण तसंही नव्हतं. जॉर्जने शोधण्याचा प्रयत्नही केला नाही. जॉर्ज आणि जॉन रॉबर्ट यांच्या भेटीनंतर, जॉर्ज वेड्यासारखा भन्नाट जीवन जगत होता. स्टेला गेल्यापासून जॉर्जच्या घराचा उकिरडा झाला होता. जॉर्जचे दाढीचे खुंट वाढले होते. मळक्या कपड्यात जॉर्ज शहरात भटकताना दिसत असे. तो डायनाकडेसुद्धा फिरकला नव्हता. स्टेला परांगदा झाली होती.

टॉम सुटीत ज्यांच्या घरी राहात होता, तिथं अचानक एक पत्र आलं. टॉम चकित झाला, त्यानं घाईघाईनं पत्र फोडलं. पत्र जॉन रॉबर्टचं होतं. जॉन रॉबर्टला त्याच्या वाड्यावर येऊन टॉमनं भेटावं असं पत्रात लिहिलं होतं. टॉम नियोजित वेळी जॉन रॉबर्टच्या वाड्यावर जाऊन पोचला. त्या जुन्यापुराण्या दिवाणखान्यात त्या जुन्या खोडाबरोबर टॉमची भेट झाली. जॉन रॉबर्टने गंभीर सुरात टॉमची, वयापासून त्याच्या लैंगिक आवडीनिवडीपर्यंत सर्व गोष्टींची चौकशी केली. वय आणि ज्ञान यांच्या जोडीला जॉन रॉबर्टच्या व्यक्तिमत्वातच असा काही अधिकार होता, जो टॉमला सतत जाणवत होता.

"माझी नात सतरा वर्षांची आहे. तिला संरक्षणाची गरज आहे" जॉन रॉबर्ट म्हणाला.

"काय, संरक्षण, अहो कितीतरी मुली समाजात स्वतंत्र वाढतायत, शिकातायत संरक्षण वगैरे गोष्टी केव्हांच संपल्यायत" टॉम.

"ती नेहमीच संरक्षित व सुरक्षित वातावरणात वाढली आहे" जॉन रॉबर्ट.

"मी तिच्या खोलीबाहेर रोज जाऊन झोपावं अशी तुमची अपेक्षा आहे का?" टॉम.

"नाही. तू तिच्याशी लग्न करावंस अशी माझी इच्छा आहे." जॉन रॉबर्ट.

"काय मी तिच्याशी लग्न करावं, अहो काय बोलताय काय, मी तिला बघितलंसुद्धा नाही. आज विसाव्या शतकात, या मुक्त समाजात, आता अशी लग्नं होत नाहीत, विवाह ठरवून होत नाहीत," टॉम भराभर बोलत होता.

"जगाच्या कितीतरी भागात लग्नं ठरवूनच होतात आजही. समाजातील चालीरीती त्रिकालाबाधित नसतात." जॉन रॉबर्ट.

"पण मीचं का? कितीतरी तरुण पडले आहेत की जगात आणि दुसऱ्याची नशिबं अशी नियंत्रित करण्याचा तुम्हाला काय अधिकार?" टॉम.

"फार मुलगे बघण्यात गोंधळच जास्त होतो. तू आनंदी, सुखी, समाधानी वृत्तीचा तरुण आहेस असं मी ऐकलं आहे. माझी नात सुखी व्हावी अशी माझी इच्छा आहे" जॉन रॉबर्ट शांतपणे म्हणाला.

"अहो. पण मी सेकंड क्लास मध्ये पास होणारा, माझा विषय इंग्लिश वाङ्मय, मी वीस वर्षाचा, मला चांगलं लेखक व्हायचंय, तुम्ही एखादा तत्त्वज्ञानाचा विद्यार्थी निवडा," टॉम.

"बेताच्या बुद्धीची माणसं शांत निवांत जीवन जगतात. म्हणून माझी इच्छा तू तिच्याशी लग्नं करावं अशी आहे" जॉन रॉबर्ट.

टॉम विचारात पडला, त्याला काय बोलावं हेच सुचेना. असा प्रसंग त्याच्या आयुष्यात कधी आला नव्हता.

"पण माझे इतर मुलींशी संबंध....." टॉम पुटपुटला.

"त्या अनुभवाचा तुला इथं उपयोग होईल" जॉन रॉबर्ट.

"मी पुन्हा केव्हा तरी विचार करून सांगेन" टॉम.

"विचार हा आता इथेच करायचा आहे. यावर घालवण्यासाठी माझ्याकडे जास्त वेळ नाही. मला ही जबाबदारी लवकर पुरी करायची आहे" जॉन रॉबर्ट.

"म्हणजे ती जबाबदारी माझ्यावर ढकलायची आहे," टॉम.

"तिच्यासाठी मी पैशाची व्यवस्था केली आहे. मला तुझ्याकडून एक वचन हवं आहे," जॉन रॉबर्ट.

"कसलं वचन? मी तुमच्या नातीशी लग्न करीन ह्याचं. ते शक्य नाही." टॉम

"नाही. तू माझ्या नातीशी लग्न करण्याचे प्रामाणिक प्रयत्न करशील असं वचन मला हवं आहे. प्रयत्नाचं वचन. विवाहाचं नाही." जॉन रॉबर्ट.

"पण तुम्ही माझ्यावर व तिच्यावर अशी सक्ती करू शकत नाही" टॉम.

"मी तुमच्यावर विवाहाची सक्ती मुळीच करत नाही पण तुम्ही दोघांनी एकत्र यावं आणि त्या दिशेने प्रामाणिक प्रयत्न करावा असं मला वाटतं" जॉन रॉबर्ट.

"बरं. मी तसं करीन" टॉमच्या तोंडून हे शब्द केव्हा गेले हे त्याचं त्याला कळलं नाही.

"ठीक आहे, आपली मुलाखत संपली. ही भेट कधी झालीच नाही. आपण दोघं भेटलो, बोललो, हे फक्त आपल्या दोघांतच राहिलं पाहिजे असं वचन तू मला देशील व पाळशील," जॉन रॉबर्ट कोट चढवत म्हणाला.

"पण मी तिला कसं, कुठं भेटायचं, काय बोलायचं ?" टॉम.

"हा सर्वस्वी तुझा प्रश्न आहे. ते तू ठरवायचं आहेस. यात मी गुंतू इच्छित नाही, तू तिला भेटशील एवढंच मी तिला कळवीन" जॉन रॉबर्ट.

"आम्ही दोघे भेटलो आणि माझा तिच्याशी शारीरिक संबंध आला तर" टॉम.

"याबाबतीत मी चर्चा करू इच्छित नाही" जॉन रॉबर्ट त्रस्त होऊन म्हणाला. ज्याची त्याची नीतिमूल्यं ज्याने त्याने ठरवायची असतात असं त्याला सुचवायचं होतं.

जॉन रॉबर्ट उठून उभा राहात म्हणाला "मी बाहेर पडत आहे मी डावीकडे जाणार आहे तू उजवीकडे जा."

जॉन रॉबर्ट घराबाहेर पडला त्याने मागे वळूनही बघितलं नाही. टॉम विरुद्ध दिशेला चालू पडला. आपण काय करून बसलो हेच त्याला कळलं नाही. तो मनात कोठेतरी सुखावला आणि दुखावला होता. मधेच अनामिक भीती डोकं वर काढत होती. तो घराजवळच्या नाक्यावर पोचला. समोरून एमा येत होता. जॉन रॉबर्टला आपण या गोष्टी गुप्त ठेवण्याचं वचन दिलं आहे असं एमाला सांगून त्याने एमाला सर्व हकिकत सांगितली !

स्टेलाचं काय झालं? तिच्या कुटुंबीयानी तिची चौकशी केली नाही, पण वाचकांना स्टेला कुठं गेली असेल याची काळजी लागणं साहाजिक आहे. ब्रायनचं घर सोडून स्टेला निघाली ती तडक निवेदकाच्या घरी पोचली. निवेदक हा एनिस्टनचा रहिवासी ! स्टेलाला वाटत होतं आपण गुप्त राहावं. स्टेलाची सासू अलेक्स हिचं इंग्लंडमधील समुद्रकिनारी एक घर होतं. ते तिनं गेल्याच वर्षी विकलं होतं. त्या घराचा नवा मालक स्टेलाच्या ओळखीचा होता. तिथे एक खोली भाड्यानं घेऊन राहायचं असं स्टेलानं ठरविलं. मनाच्या आणि शरीराच्या जखमा भरून येईपर्यंत स्टेलानं अज्ञातवासात राहाण्याचा विचार पक्का केला होता.

टॉम आणि हॅटीची पहिली भेट स्लिपर हाऊसमध्ये झाली पण ती भेट अयशस्वी ठरली. भेटायला येणारा टॉम दुसऱ्याच्या सांगण्यावरून आला आहे हे हॅटीला जाणवत होतं. टॉम व हॅटीची दुसरी भेट ते सर्वजण समुद्रकिनारी सहलीला गेले असताना झाली. टॉम, एमा, ब्रायन-गॅब्रियल जॉर्ज, अलेक्स सर्वजण समुद्रकिनारी पिकनीकला गेले होते. हॅटी आणि पर्ल पाहुण्या म्हणून बरोबर होत्या. येथे सुद्धा टॉम आणि हॅटीच्या गप्पा रंगल्या नाहीत. मनाच्या तारा जुळल्या नाहीत. याच सागराच्या सान्निध्यात स्टेला अज्ञातवासात राहात होती. तिनं या सगळ्यांना घरातूनच बघितलं होतं. जॉर्जला बघून तर ती फारच व्यथित झाली होती. याच माणसाच्या क्रोधामुळे आपण मरणार होतो व याने आपल्याला पाण्याबाहेर काढून मग लाथ मारली होती या गोष्टी ती विसरली नव्हती.

ज्या दिवशी एनिस्टन शहराची जत्रा होती. त्या रात्री भलतीच धमाल झाली. जत्रेच्या रात्री काही लोक पिऊन तर्र झाले होते. टॉम व एमा हे दोघेही त्या घोळक्यात होते. जत्रा संपल्यानंतर हे टोळकं घरी परतताना टॉम म्हणाला, 'स्लिपर हाऊसमध्ये पार्टी आहे, चला आपण तिकडे जाऊ या ! दारूच्या बाटल्या हातात घेऊन रात्री अकराच्या सुमारास सर्वजण आरडाओरडा

करत स्लिपर हाउसच्या हिरवळीवर पोचली. हॅटी आणि पर्ल दोघीजणी घाबरून गेल्या. त्यांनी आतून दरवाजे बंद करून घेतले. बराच गोंधळ झाला. जॉर्ज मागच्या दरवाज्याने हॅटीच्या खोलीत घुसला. कोणीतरी खिडक्यांवर दगड मारले. सर्वजण पळून गेले. नंतर पोलीस आले. दुसऱ्या दिवशी एनिस्टनच्या वर्तमानपत्रात बातमी छापून आली. हॅटी टॉमचे संबंध, हॅटीच्या खोलीत जॉर्ज. तत्त्वज्ञ जॉन रॉबर्टने हॅटीचा टॉमशी विवाह व्हावा म्हणून केलेली योजना. हॅटीची दाई पर्लच्या कौटुंबिक भानगडी या सर्व गोष्टी तिखटमीठ लावून वर्तमानपत्रात छापून आल्या. सगळी गुपितं फुटली. जॉन रॉबर्ट संतापला. त्याने टॉमला बोलावून त्याची यथेच्छ निर्भर्त्सना केली. हॅटीला घेऊन तो त्याच्या जुन्या वाड्यात राहाण्यास आला. हॅटीच्या कौमार्याबद्दलसुद्धा जॉन रॉबटने संशय घेतला. हॅटीने पर्लशी असलेले संबंध पूर्णपणे तोडावे अशी जॉन रॉबर्टची इच्छा होती.

परंतु वाइटातून काहीतरी चांगलं निघतं त्याप्रमाणे जॉन रॉबर्टच्या हॅटीबद्दलच्या भावना हॅटीला कळल्या. जॉन रॉबर्टने हॅटीपुढं आपलं मन मोकळं केलं. हॅटीबद्दलचं त्याचं उत्कट प्रेम त्याच्या बोलण्यातून उघड झालं. हॅटी सुखावली. जॉन रॉबर्ट ही एक नवी व्यक्ती असं तिला वाटू लागलं. तिचे आजोबा तिला पुन्हा नव्या रूपात परत मिळाले. हॅटी त्यांच्या सतत जवळ राहावी, अमेरिकेला जाऊ नये, यासाठी टॉमशी तिचं लग्न व्हावं म्हणून जॉन रॉबर्ट प्रयत्न करत होता हे तिला उमगलं होतं. परंतु जे चांगलं निघालं ते खरोखरच चांगलं होतं का हा प्रश्नच होता. गुड आणि इव्हिल चा शतकानुशतकाचा प्रश्न ! जॉन रॉबर्ट आणि हॅटी यांच्यात पुढे काय घडलं हे पाहाण्याआधी, जॉर्ज, स्टेला, डायना, अलेक्स, टॉम यांचं काय झालं ते पाहू.

जॉर्ज कधी डायनाकडे तर कधी स्वत:च्या घरी राहात असे. जॉन रॉबर्टशी संवाद साधण्याचे त्याचे सर्व प्रयत्न फसले होते. जॉन रॉबर्टबद्दलचा तीव्र असंतोष त्याच्या मनात धुपसत होता. डायनासह स्पेनच्या समुद्रकिनारी एका छोट्या खेड्यात स्थायिक होण्याचा निर्णय जॉर्जनं घेतला होता. अलेक्सला सर्व सांगून जॉर्ज स्वत:च्या घरी परतला. दरवाज्यातच स्टेला भेटली. स्टेलाला बघताच जॉर्ज संतापला. दोघांच्या भांडणास सुरवात झाली.

"जॉर्ज तुला माझ्याशी वैवाहिक जीवन जागयचं आहे की नाहा?" स्टेला.

"नाही. मी डायनाबरोबर स्पेनला स्थायिक होण्याचा निर्णय घेतला आहे. तुझं तोंड पाहाण्याची सुद्धा माझी इच्छा नाही. तू काय करणार आहेस?" जॉर्ज.

"कदाचित् मी इथेच राहीन, किंवा टोकियोला वडिलांकडे जाईन, नाहीतर कॅलिफोर्नियाला जॉन रॉवर्टकडे जाईन" स्टेला उत्तरली.

जॉन रॉबर्टचं नाव काढल्याबरोबर जॉर्ज भडकला." जॉन रॉबर्टकडे जाऊन तू माझ्याबद्दल बोलणार , स्टेला तूच माझा सत्यानाश केलास, तूच डेव्हिल आहेस. जरा कुठं मला बरं वाटायला लागलं होतं तो तू परत येऊन सर्व घाण केलीस," असं बोलून जॉर्ज डायनाकडे

निघून गेला. स्टेलानं घर उघडून परत घराचा ताबा घेतला.

टॉम मॅकफ्रे हॅटीच्या शोधात फिरत होता. त्याला जत्रेच्या रात्री घडलेल्या प्रकाराचं स्पष्टीकरणं हॅटीला द्यायचं होतं. हॅटीचा आपल्याबद्दल गैरसमज होऊ नये असं त्याला सतत वाटत होतं. हॅटीबद्दलचं त्याचं आकर्षणही वाढलं होतं.

अलेक्स तिच्या घरी झालेल्या अपघातात जिन्यावरून पडली होती.

अेमा स्वत:च्या आईला भेटायला बेल्जीयमला गेला होता.

जॉन रॉबर्ट व हॅटी एक दिवस एकत्र राहिली. एकत्र राहाणं किती कठीण आहे हे एका दिवसात-जॉन रॉबर्टला उमजलं. 'ही कोणती प्रेमाची जातकुळी' असं हॅटीला वाटत होतं. तिच्या स्वातंत्र्याला कुंपण घालणारं जॉन रॉबर्टचं प्रेम तिला विचित्र वाटत होतं. "मी असाहाय्य आहे, मी एक बळी आहे हे तुला कसं कळत नाही. आपल्या दोघातला फरक तुला अजून जाणवत नाही का? तू बोलतेस, विचार करतेस, हुशारीनं वागण्याचा प्रयत्न करतेस, मी अस्वस्थ होऊ नये म्हणून धडपडतेस. पण माझं जगच निराळं आहे. मी वेदनाग्रस्त आहे. मी मृत्यूच्या सान्निध्यात, समीप आहे" जॉन रॉबर्ट.

"मृत्यू?" हॅटी

"याचा अर्थ मी भयंकर रोगानं आजारी आहे असा नाही. पण मृत्यूच्या वेदना, निरोप घेण्याच्या वेणा सुरू झाल्या आहेत" जॉन रॉबर्ट.

"आपण परत त्या घरात जाऊन राहू." हॅटी.

"नाही ते आता शक्य नाही. तू आता येथून लवकरात लवकर निघून जा." जॉन रॉबर्ट

मृत्यूच्या छायेत वावरत असलेला जॉन रॉबर्ट व आयुष्य अथांग आहे असं वाटणाऱ्या तारुण्यात असलेली हॅटी यांचा संवाद चालू होता. हॅटीला समजत नव्हतं माझ्यावर इतकं प्रेम असणारा जॉन रॉबर्ट आता मला घरातून घालवायला का निघाला आहे? हॅटीला याचा उलगडा होत नव्हता. त्या दोघांचा वादविवाद चालू असताना दरवाजा ठोकल्याचा धाडधाड आवाज आला. जॉन रॉबर्टने दरवाजा उघडला. समोर टॉम उभा होता.

"हॅटी कुठं आहे?" टॉम

जॉन रॉबर्टच्या पाठीच हॅटी उभी होती. जॉन रॉबर्टने हॅटीचं बखोटं धरून तिला दरवाजातून बाहेर ढकलली. ती टॉमच्या अंगावर जाऊन कोसळली. जॉन रॉबर्टने दरवाजा धाडकन लावून घेतला. हॅटी ओक्साबोक्सी रडत होती. टॉम तिला घेऊन स्लिपर हाऊसमध्ये गेला. थोड्याच वेळात जॉन रॉबर्टने जुना वाडा सोडला. त्याने गरम कुंडाच्या संकुलातील एक खोली भाड्यानं घेतली व तो तेथे राहाण्यास गेला.

जॉन रॉबर्ट तिथं राहायला गेल्यानंतर दुसऱ्याच दिवशीची घटना. जॉर्ज जॉन रॉबर्टचा शोध घेत तेथे पोचला. मध्यान्हीची वेळ होती. जॉर्ज चोरपावलानं जॉन रॉबर्टच्या खोलीवर गेला. दरवाजा अर्धवट उघडाच होता. जॉन रॉबर्ट पलंगावर शांत झोपला होता. टेबलावर लेखनाचं साहित्य व

काही लिहिलेले कागद पडले होते. जॉर्ज स्वत:शी पुटपुटला "ही वेळ चांगली आहे. मला हे काम आताच केलं पाहिजे, आता केलंच पाहिजे. श्लीक या तत्त्वज्ञाचा जीव त्याच्या शिष्यानं घेतला होता." जॉर्जने खोलीतील स्नानगृहाचा दरवाजा उघडला. स्नानगृहात रिकामं पाण्याचा मोठं कुंड होतं. तेथे गरम झऱ्याचं पाणी भरण्याची सोय होती. जॉर्जने ते कुंड उकळत्या पाण्यानं भरलं. जॉन रॉबर्टचा पलंग खेचत त्याने स्नानगृहात आणला व जॉन रॉबर्टला पाण्यात बुडवला. पलंग परत खेचत त्याने खोलीत आणला, जमीन, पलंगाचे पाय टॉवेलने पुसून घेतले व तो खोलीच्या बाहेर पडला. त्या संकुलनातून बाहेर पडताना फादर बर्नार्डनं त्याला पाहिलं होतं. फादर बर्नार्ड जॉन रॉबर्टला भेटायलाच येत होता. फादर घाईघाईनं जॉन रॉबर्टच्या खोलीत शिरला. जॉन रॉबर्टचा पलंग रिकामा होता. टेबलावर कागद पडले होते. फादर बर्नार्डने वरचा कागद बघितला. जॉन रॉबर्टने त्याचा मित्र बिल याला छोटसं पत्र लिहिलं होते. त्यात आपण आत्महत्या करत आहोत असं जॉन रॉबर्टने लिहिलं होतं. फादर बर्नार्डने ते पत्र झटकन खिशात घातलं. फादरने आरडाओरडा करून संकुलातील लोकांना गोळा केलं. पोलीस आले. त्यांनी जॉन रॉबर्टच्या प्रेताचा ताबा घेतला.

फादर बर्नार्ड जॉर्जच्या शोधात फिरत होता. डायनाच्या फ्लॅटवर, स्टेलाच्या घरी जॉर्ज सापडला नाही. फादर बर्नार्ड त्याला शोधत माळरानावर पोचला. जॉर्ज गुडघ्यावर चर्चमध्ये बसल्यासारखा बसला होता. मध्येच जमिनीवर डोके टेकून हुंदके देत रडत होता. फादर बर्नार्ड त्याच्याजवळ जाऊन बसला व म्हणाला, "जॉर्ज तू जॉन रॉबर्टला मारलेलं नाहीस. जॉन रॉबर्टने आत्महत्या केली आहे. तसं त्यानं या पत्रात लिहिलं आहे. पत्र माझ्याजवळ आहे. तू आता घरी चल."

जॉर्जला मनोविकृतीमुळे समोरचं काहीच दिसत नव्हतं. तो फादर बर्नार्डला म्हणाला, "मला स्टेलाकडे घेऊन चल !"

**नंतर काय घडलं**

कॉरोनरने 'अपघाती मृत्यू' असा जॉन रॉबर्टच्या मृत्यूबाबत निर्णय दिला. फादर बर्नार्डने ती चिठ्ठी कोणालाच दाखवली नाही. पुरावा लपविल्याचा आरोप नको म्हणून त्याने कॉरोनरच्या चौकशीतही चिठ्ठीबद्दल चकार शब्द काढला नाही.

फादर बर्नार्डला वाटलं जॉन रॉबर्टचा पाय घसरून तो स्नानगृहातील कुंडात पडला असावा. विविध तर्कवितर्क चालू होते. जॉन रॉबर्ट कुंडात स्नान करत असताना गरम पाणी अचानक सोडण्यात आलं त्यामुळे म्हातारा तत्त्वज्ञ बेशुद्ध झाला व पाण्यात बुडून मेला असा काहींचा समज !

निवेदकाच्या मते जॉन रॉबर्ट बरेच दिवस उदास अवस्थेत होता. झोपेच्या गोळ्या त्याने साठवून ठेवल्या असाव्या. तत्त्वज्ञानात आपण अयशस्वी झालो अशी त्याची भावना दृढ होत गेली व त्याने आत्मनाश करून घेतला.

जॉर्ज येण्याआधीच जॉन रॉबर्टचा प्राण गेला होता का? जॉन रॉबर्टने घेतलेले विष किंवा औषध त्याला ठार मारण्याइतके जहाल होते का? जॉर्जने त्याला पाण्यात बुडवल्यामुळे तो मेला असावा का? समजा फादर बर्नार्ड जॉर्जच्या आधी आला असता तर जॉन रॉबर्टवर उपचार करून त्याला वाचवता आले असते का? निवेदक म्हणतो हे प्रश्न कायम अनुत्तरीतच राहाणार आहेत.

पुढे फादर बर्नार्डने धर्मगुरूपदाचा राजीनामा दिला. त्याने निवेदकाला जॉन रॉबर्टची चिठ्ठी दाखवली. फादर बर्नार्ड एनिस्टन सोडून ग्रीसमधील एका खेड्यात निघून गेला.

जॉन रॉबर्टच्या आकस्मिक मृत्यूमुळे हॅटी दु:खी झाली होती. प्रेम म्हणजे आनंद. विघ्न आलेलं प्रेम हासुद्धा आनंद असतो, जोपर्यंत आशा आहे तोपर्यंत. नव्याने गवसलेल्या तिच्या आजोबांवर हॅटीचं प्रेम होतं आणि आजोबा आता पुन्हा कधीच भेटणार नाहीत यावर तिचा विश्वासच बसत नव्हता. जॉन रॉबर्टचे मृत्यूबद्दलचे शेवटचे विचार तिने स्वत:पाशीच ठेवले होते. जॉन रॉबर्टच्या इच्छेप्रमाणे टॉम आणि हॅटी यांचा विवाह झाला. पण विवाहाची गाठ पडण्यापूर्वीच हॅटीच्या कौमार्याची गाठ सुटली होती. जॉन रॉबर्टच्या मृत्यूपत्रानुसार सर्व संपत्ती हॅटीला मिळाली होती.

अलेक्स, ब्रायन गॅब्रियल आता एकत्र राहात होते. अलेक्स अपंग झाली होती. पलंगावर पडून ती खिडकीबाहेर बघत बसे. हॅटीची दाई पर्ल हिच्याबरोबर विवाह न करताच अेमा राहू लागला. पर्लने शिक्षणाची कास धरली होती.

जॉर्जने स्टेलाजवळ राहाण्याचं ठरवलं. त्यामुळे डायनाचं स्पेनला जाण्याचं स्वप्न उद्ध्वस्त झालं. ती पॅरिसला जाऊन स्थायिक झाली. स्टेलाबद्दल तिच्या मनात असूया होती. जॉर्जचा पूर्ण ताबा स्टेलाकडे आला होता. जॉन रॉबर्टच्या मृत्यूच्या धक्क्यातून तो हळूहळू बाहेर येत होता. त्याचा स्वभाव आता बदलला होता. जॉन रॉबर्टने जॉर्जला एक पत्र लिहिलं होतं. ते जॉर्जच्या जिव्हारी लागल्यामुळे त्याने शेवटचे कृत्य केले असं तो स्टेलाला म्हणाला होता. कोणत्या गोष्टीमुळे मनातील सुप्त ज्वालामुखी उफाळून येईल हे सांगणं कठीण!

निवेदकानं आणखी कितीतरी गोष्टी सांगितल्या आहेत पण त्या सर्व इथे सांगणं कठीण निवेदक म्हणतो, "कोणीतरी मला असं विचारेल – काय हो इतक्या सगळ्या व्यक्तींबद्दलच्या एवढ्या सगळ्या गोष्टी तुम्हाला कशा समजल्या? लोकांच्या गोष्टी ऐकणं ही माझी जीवनातील महत्त्वाची भूमिका आहे आणि हे करताना मला एका विशिष्ट महिलेचं साहाय्य लाभलं आहे !

**आयरिस मरडॉक – जॉन हॅपनूडेन चर्चा**

**जॉन** : 'फिलॉसॉफर्स प्युपिल' ही काळ्या कल्पनांनी झपाटलेल्यांची आणि प्रेमाच्या कल्लोळाची खिळवून टाकणारी प्रभावी कथा. या कादंबरीत तू तत्त्वज्ञानाला केंद्रस्थानी बसवले



अनुक्रमणिका

आहेस अशी तुझी ही पहिली कादंबरी. काही समीक्षकानी तुला 'तत्त्वज्ञानविषयक कादंबरीकार' म्हणून लेबल चिकटवून टाकलं, जणू त्यांच्यापुढं धिटाईनं उभं राहाण्यासाठी तू ही कादंबरी लिहिलीस.

**आयरिस :** खरं पाहाता ही कादंबरी आहे शिष्य व शिक्षक यांच्या संबधाबद्दलची. मी आयुष्यभर या दोन्ही भूमिकांमध्ये गुंतलेली आहे. मला वाटलं ही कुतूहलजनक आणि हेलावून टाकणारी कथा आहे. मी जरी सध्या तत्त्वज्ञान या विषयाबद्दल लिहित असले तरी कादंबरीतील ती व्यक्तिरेखा जाताजाता सहज तत्त्वज्ञान सांगते, तो कथेचा भाग नव्हे.

**जॉन :** आणि तरीसुद्धा या कादंबरीतील तत्त्वज्ञ जॉन रॉबर्ट रोझॅनाव, ( तू तत्त्वज्ञानातील जी क्षेत्रे अभ्यासली आहेस – प्लॅटॉनिझम् धरून ) – त्याच क्षेत्रांना कादंबरीत गवसणी घालताना दिसतो.

**आयरिस :** ढोबळ मानानं ते खरं आहे पण ते लक्षणीय नाही.

**जॉन :** एका विशिष्ट प्रकारच्या तत्त्ववेत्यावर दोषारोप ठेवणं असा तुझा या कादंबरी लेखनाचा हेतू नव्हता?

**आयरिस :** नव्हता. पण मला वाटतं तत्त्वज्ञान हा विषयच असा आहे की ज्यामुळे काहीजण निराशाग्रस्त होतात. मानवी मनाला हा विषय कठीण पडतो. तुम्ही जर प्राचीन कालखंडाचे इतिहासकार किंवा भाषातज्ज्ञ असाल तर तुम्ही तुमच्या विषयातलं काहीना काही तरी करू शकता, पण तुम्ही तत्त्वज्ञान विषयात काही उत्तम करत नसाल तर तुम्ही तत्त्वज्ञान विषयच करत नाही असं होतं.

**जॉन :** तत्त्वज्ञानासाठी काटेकोर असं शिस्तबद्ध मन लागतं. नैतिक तत्त्वज्ञानाचा शोध घेण्याचा मार्ग कधी न संपणारा आहे याची सतत जाणीव ठेवणारं मन तत्त्वज्ञाला लागतं, असं तुला म्हणायचं आहे का?

**आयरिस :** तुम्ही स्वत:ची मूल्ये ठामपणे ठरविल्याशिवाय नैतिक तत्वज्ञानाचा अभ्यास करता येत नाही. तू म्हणतोस त्याप्रमाणे सद्गुण (व्हर्चु) हा असाध्य आहे. तत्त्वज्ञान हा गहन विषय आहे. तो आधिभौतिक विषय झाल्याशिवाय राहूच शकत नाही, आणि तत्त्वज्ञानाचा तोच विशेष भाग मला मनोवेधक वाटतो.

**जॉन :** 'फिलॉसॉफर्स प्युपिल' या कादंबरीत एक परिच्छेद आहे. तुझं पूर्वीचं वाङ्मय ज्या वाचकांनी वाचलेलं नाही त्यांना हा परिच्छेद कळणं कठीण. फादर ब्राउन हा स्वत:च्या शंकाकुशंकानी व्यथित आहे. या फादर ब्राउनशी तत्त्ववेत्त्याचा झालेला पहिला, महत्त्वाचा निर्णायक व प्रदीर्घ असा संवाद या परिच्छेदात आहे.

**आयरिस :** होय. मला वाटतं तो संवाद महत्वपूर्ण आहे. त्यात वास्तवातील वादाचे मुद्दे आहेत. अर्थात तो वाद अनिर्णित आहे. तो वादसंवाद कादंबरीतील व्यक्तिरेखांच्या संदर्भात महत्त्वाचा आहे, नाहीत तर मी त्या कथेचा भाग म्हणून तो घेतला नसता.



अनुक्रमणिका

**जॉन :** जॉन रॉबर्ट रोझॅनाव हा प्रॉस्पेरोसारखा, तो दुसऱ्या व्यक्तीवर हुकूमत गाजवतो आणि त्यांचे भाग्य ठरवण्याचा प्रयत्न करतो. विशेषत: हॅटी व टॉम या दोन आशा बाळगणाऱ्या भोळ्याभाबड्या व्यक्तींच्या बाबतीत असं घडतं. या कादंबरीतील जॉर्ज ही व्यक्तिरेखा कॅलिबन-सारखी. जॉर्ज हा जॉन रॉबर्टचा माजी विद्यार्थी. जॉर्ज रागीट आणि आक्रस्ताळा. 'दि टेम्पेस्ट' हे नाटक या कादंबरीसाठी 'मिथ' म्हणून तू किती प्रमाणात बुद्धिपुरस्सर धरलं असावंस याचं मला कुतूहल आहे.

**आयरिस :** 'दि टेम्पेस्ट' माझ्या नेहमीच डोक्यात घोळत असतं. 'द सी' (THE SEA) या कादंबरीतही ते डोकावतं. 'द सी' मध्ये मॅजिकचा (जादूटोण्याचा) म्हणजे 'वास्तवापेक्षा काहीतरी अनपेक्षित घडेल' अशा विचाराचा त्याग करण्याची कल्पना आहे, सत्ताधर्म यातील परस्पर संबंध वगैरे वगैरे ..... याला दि टेम्पेस्टचा स्पर्श आहे.

'फिलॉसॉफर्स प्युपिल' मधील जॉन रॉबर्ट रोझॅनाव ही शक्तिशाली व्यक्ती आहे. आपली स्वत:ची सत्ता वापरल्याशिवाय ती व्यक्तिरेखा आकारच घेणार नाही. तत्त्वज्ञानाचं स्वरूप काय हे सांगणारी ती कादंबरी आहे या समजुतीला फार वजन देऊ नये असं मला वाटतं. मानवी संबंधातील सत्तेचं स्वरूप दाखवणारी ती कादंबरी आहे. 'तो शिक्षक' सत्तावान व संभाव्यतेने विघातक माणूस आहे. अर्थात जॉन रॉबर्ट रोझॅनाव जॉर्जशी चुकीच्या पद्धतीनं वागतो. त्यानी जॉर्जला सोडून द्यायला हवं होतं आणि त्याच्याशी अगदी टोकाला न जाणारं वागणं ठेवायला हवं होतं. पण काही प्रकारच्या तत्त्वज्ञांचं मन तत्त्वज्ञान विषयाच्या संदर्भात फार पराकोटीला जाणारं असतं. हीच भावना त्यांच्या वास्तव जीवनात प्रवेश करते. त्यांना वाटतं की सर्व गोष्टी परिपूर्ण सत्य असाव्यात आणि कोणीही मूर्खपणे गोष्टी करू नये, वागू नये. जॉन रॉबर्टला भावविवश गोंधळाच्या प्रसंगाचा तिटकारा होता. जॉर्ज हा जॉन रॉबर्टला राग येईल याचप्रमाणे वागतो, थोड्या प्रमाणात जॉर्जला हेच हवं असतं. जॉर्जला अशातऱ्हेचे भावनिक नाट्य घडायला हवं असतं, ज्यायोगे त्याच्यात व जॉनमध्ये एक बंध निर्माण होईल.

**जॉन :** जॉर्जला स्वत:च्या जीवनाचा जो विचका झाला आहे त्यापासून मुक्ती हवी आहे. जॉन रॉबर्ट त्याला यातून तारेल असे मिथ जॉर्ज निर्माण करतो?

**आयरिस :** जॉर्ज हा जॉन रॉबर्टनी झपाटलेला आहे. जॉर्जवर त्याचं वर्चस्व आहे. हे एक विशेष प्रकारचं प्रेमाचं नातं आहे.

**जॉन :** जॉर्जने खरोखरच स्वत:च्या बायकोचा स्टेलाचा खून करण्याचा प्रयत्न केला किंवा नाही, याचं प्रत्यक्ष उत्तर कादंबरीत मिळत नाही असं का?

**आयरिस :** तो जॉर्जला आलेला संतापाचा पराकोटीचा झटका आहे (आणि असे झटके जॉर्जला बरेच वेळा येऊन गेले आहेत) स्टेला ज्यावेळी जॉन रॉबर्टचं नाव घेते त्यावेळी जॉर्जला रागाचा झटका येतो, आणि नंतर पुन्हा असंच घडतं. कादंबरीतील निवेदक हे आपल्या निदर्शनास आणतो. जॉर्ज जेव्हा स्वत:ची रखेली डायना हिच्याबरोबर निघून जाण्याचा विचार

करतो आणि स्टेलाला विचारतो तू काय करणार आहेस, त्यावेळी स्टेला म्हणते मी कदाचित् जॉन रॉबर्टला जाऊन भेटेन. तिचे हे उद्‌गार जॉर्जच्या रागाचा भडका उडवतात.

**जॉन :** तू प्रत्येक कादंबरीचे दोन तर्जुमे तयार करतेस हे मला ठाऊक आहे. ही कादंबरी तू कशी लिहिलीस हे तू स्पष्ट करशील का?

**आयरिस :** प्रथम मी डोक्यात कादंबरी पूर्ण करते. मागाहून त्याची लिखित प्रत तयार करते. कादंबरी रचणं हीच सर्वात कठीण गोष्ट. कादंबरी कल्पनेत रचण्याची माझी प्रक्रिया पूर्ण होते त्यावेळी सर्व काही संपतं. व्यक्ती आणि प्रसंग या दोहोंच्या अगदी बारीकसारीक तपशीलात जाऊन मी कादंबरीची मनात रचना करते. त्यामुळे लिखीत प्रत ही या प्रक्रियेच्या अगदी शेवटच्या टप्प्यावर असते.

**जॉन :** तू प्रत्यक्ष लिहायला सुरवात करण्याआधीच प्रत्येक व्यक्तिरेखा आणि प्रत्येक घटना तू तुझ्यापुरती तयार करून ठेवलेली असतेस?

**आयरिस :** होय हे सगळं अगदी एकमेकांशी घनिष्ठतेनं निगडित असतं. व्यक्ती आणि प्रसंग या दोन्ही गोष्टी एकाच वेळी अस्तित्वात येतात. एकमेकांशी असलेल्या संबंधाच्या एक प्रकारच्या आवश्यकतेतून त्या दोन्ही (व्यक्ती व प्रसंग) गोष्टी अस्तित्वात येतात.

**जॉन :** तू ज्या प्रकारे सदा सर्वकाळ उपस्थित असलेल्या निवेदकाचा कथेत उपयोग करून घेतेस, त्याचं मला कुतूहल आहे. हा निवेदक कथेत एक भूमिका बजावतो. 'एन्' असं त्याला म्हणतात. जॉन रॉबर्टला त्याचा तिटकारा असतो. काही व्यक्तिरेखा त्याची निर्भर्त्सना करतात. एका व्यक्तिरेखेने निवेदकाला "दुसऱ्याच्या कामुक हालचाली चोरून पाहाण्यात आनंद मानणारी कर्तृत्वहीन व्यक्ती" असं म्हटलं आहे.

**आयरिस :** पण त्या व्यक्तिरेखांनी निवेदकाचं असं वर्णन करणं बरोबर आहे का? कदाचित तसं नसेलही.

**जॉन :** जॉर्जची बायको स्टेला ही व्यक्तिरेखा तू निर्माण केली आहेस. या व्यक्तिरेखेबाबत कथारचनेच्या दृष्टीने जराशी समस्या असावी असं दिसतं. याचं कारण जॉर्जकडेच लक्ष केंद्रित व्हावं म्हणून कादंबरीत ज्यावेळी काही घटना घडतात त्यावेळी स्टेलाला दूर ठेवण्यात येतं. जॉर्जचा स्वभाव रागीट व आक्रस्ताळा. त्याच्या खाजगी व उघड अशा खळबळ युक्त वर्तनामुळे, त्याला आपल्या पत्नीपासून दूर ठेवणे जरुरीचे ठरतं आणि म्हणून स्टेला ही निवेदकाच्या आश्रयाला आली आहे याचा शोध वाचकाला लागतो, त्यावेळी मात्र वाचक चकित होत असेल.

**आयरिस :** होय. स्टेला ही एक फारशी यशस्वी नसलेली व्यक्तिरेखा आहे असं मला वाअतं. मी स्टेलाबद्दलची समस्या कधीच सोडवू शकले नाही. काही काळ तिला मंचावरून हलवणे भागच होते. कालांतराने ती निवेदकाजवळ आहे असं मला आढळून आलं.

**जॉन :** ज्यावेळी तू ॲनिस्टन हे शहर निर्माण केलंस त्यावेळी वास्तवातील एखादं गरम पाण्याच्या नैसर्गिक झऱ्याचं गाव तुझ्या पुढं होतं का?

**आयरिस :** नव्हतं. अेनिस्टन हे पूर्णपणे कल्पित शहर आहे. त्याची निर्मिती करताना मला अमाप आनंद मिळाला.

**जॉन :** पण स्नानगृहे, गरम पाण्याची कुंड ही तुझ्या पाण्याबद्दलच्या आवडीची आणि ओढीचीच प्रतिबिंबं आहेत.

**आयरिस :** होय. माझ्या प्रत्येक पुस्तकात जलाशय आहेच. या कादंबरीतील जॉन रॉबर्टच्या बुडण्याच्या पार्श्वभूमीचा विचार केला तर मला फार वर्षापूर्वी पाहिलेल्या चित्रपटाची आठवण येते. त्या चित्रपटात तरणतलावात एकाचा खून होतो असं दृश्य आहे. (पाण्यात बुडून नव्हे तर गोळी घालून असं मला स्मरतं). मी जेव्हा चीनला गेले होते त्यावेळी अशीच स्नानगृहे पाहिली होती. माझ्या मनात त्यानी घर केलं होतं. आइसलँडचा फेरफटका करताना मी गरम पाण्याच्या कुंडात पोहले होते. बाहेर कडाक्याची थंडी असताना गरम पाण्यात पोहण्याची मजा और असते. मला पोहायला फार आवडतं. मी समुद्रात पूर्ण निर्भयतेने पोहायची आणि एके दिवशी बुडायचीच मी! तेव्हापासून मी सावध झाले दर्या आणि मी म्हणजे जानी दोस्त आहोत असं मला वाटायचं पण आता मात्र मला वाटतं कोणीही दर्याला घाबरूनच असावं.

**जॉन :** या कादंबरीतील 'एमा' एक अत्यंत विशुद्ध व्यक्तिरेखा आहे.

**आयरिस :** मला एमा ही व्यक्तिरेखा फार आवडते. पण ती निर्माण करायला मला खूप वेळ लागला. माझ्या मनात 'एमा' आइसलँडचा. पण आइसलँडचा मुलगा म्हणून तो कादंबरीत वापरणे संयुक्तिक ठरले नसते. त्याला 'आयरिश' करणं हाच त्या प्रश्नावर तोडगा होता. तो गायक असावा ही कल्पना मात्र माझ्या मनात सुरवातीपासूनच होती.

**जॉन :** एमा अगदी सहजपणे कादंबरीत येतो. पण तो त्याच्या आईला भेटायला बेल्जियमला जातो हा प्रसंग मात्र खटकतो. त्या गाठीभेटीचं काय प्रयोजन होतं हे मला उमगलं नाही.

**आयरिस :** तू म्हणतोस त्या अर्थानं प्रत्येक प्रसंगाचं प्रयोजन असलंच पाहिजे का? त्या आनंदी, आकर्षक, मोहक स्त्रीजवळ त्याला दाखवण्यासाठी मी तो प्रसंग घातला आहे. आपण त्याच्या आईच्या संदर्भात एमाचा आणखी एक पैलू बघतो. तो एक प्रकारचा मॅजिक सिन, मॅजिक प्रतिमा आहे.

**जॉन :** 'दि स्लिपर हाऊस'. जॉन रॉबर्ट याच घरात हॅटीला जवळजवळ बंदिस्त करून ठेवतो. हॅटीबरोबर असते तिची सखी आणि पालक या दोन्ही भूमिका बजावणारी पर्ल. ही पर्ल, आपण जॉन रॉबर्टच्या प्रेमात पडलो आहोत या परिकल्पनेत धुंद असते. त्यामुळे दि स्लिपर हाऊस म्हणजे परिकथेतील राजकुमारींना बंदिस्त करून ठेवलेला मंतरलेला किल्ला आहे असं वाटतं. हे घर म्हणजे एक प्रकारचं प्रॉस्पेरोचं बेट आहे असंसुद्धा ते घर वाचकाला सुचवत असेल.

**आयरिस :** पण येथे टेम्पेस्टचा अवास्तव वापर करू नका, कारण या कथेचं व दि टेम्पेस्टचं नातं फारच धूसर सावलीसारखं आहे. जॉर्ज स्वत:ला कॅलिबन समजतो, हा जॉर्जने स्वत:बद्दल निर्माण केलेल्या मिथचा भाग आहे.





अनुक्रमणिका

**जॉन :** ही कादंबरी म्हणजे दि टेम्पेस्टचं श्रुतयोजन आहे या समजाला मग तू प्रतिरोध करशील का? हॅटी म्हणजे एक प्रकारची मिरांडा, जॉन रॉबर्ट टॉम ही व्यक्तिरेखा फर्डिनँड म्हणून योजतो. वगैरे...

**आयरिस :** हो अगदी पूर्णपणे. मी नुसता प्रतिरोध करत नाही तर मला त्याचा तिटकारा आहे. दि टेम्पेस्ट हे माझ्यात अगदी खोलवर बिंबलेलं आहे, पण म्हणून काही ही कादंबरी त्याच्या बद्दलची होत नाही. ही कादंबरी ज्याबद्दलची आहे त्याबद्दलचीच आहे.

**जॉन :** कादंबरीचा घाट निश्चित करणं आणि व्यक्तिरेखांना स्वतंत्र, संभाव्य असं स्वत:चं जीवन असू देणं, हे करताना जी रस्सीखेच होते त्याचा तणाव तुला जाणवत असेल असं वाटतं.

**आयरिस :** मी ठरवलेल्या घाटाची मला भीती वाटते. तो घाट निश्चितपणे दुसऱ्या कोणत्याही कलाकृतीवरून घेतलेला घाट नाही. त्याच्यावर वर्चस्व आहे ते माझं आणि माझ्या स्वत:च्या पुराकथांचं आणि ते वर्चस्व प्रखर प्रभावी आहे. ही कादंबरी विखुरलेली आहे. तिच्यात बऱ्याच व्यक्तिरेखा आहेत व तेही योग्यच आहे. मला वाटतं या कादंबरीतील बरेच मुद्दे गंभीरपणे विचार करण्यासारखे आहेत. या कादंबरीतील सगळ्या व्यक्तिरेखा अस्तित्वात असणं, हा त्यांचा स्वत:चा हक्कच आहे असे मला वाटतं.

**जॉन :** वाङ्मयीन कलाकृतीवर मिथ आणि आकृतीबंध लादणाऱ्याच्या प्रवृत्तीच्या मगर-मिठीतून हळूहळू सोडवून घेण्यासाठी हा तुझा प्रचंड प्रयत्न आहे का?

**आयरिस :** हाच प्रश्न पूर्वी मला मोठा अडचणीचा वाटायचा. मला आता त्याची तितकी चिंता वाटत नाही, कारण या दोन्ही गोष्टी एकाच वेळी मी जास्त चांगल्या तऱ्हेने करू लागले असेन किंवा त्यावद्दल मी आता बेफिकीर झाले असेन. एका विशिष्ट टप्प्यावर माणूस कमी काळजी करू लागतो !

**जॉन :** आत्माविष्काराचा प्रश्न इथे अगदी प्रस्तुत आहे. इतर माणसांमधील आपुलकीवजा कुतूहल ही लेखनामागची प्रेरणा असू शकेल किंवा स्वत:च्या काळज्या व स्वत:ला पछाडणारे गंड हे मांडण्यासाठी कादंबरीचा उपयोग लेखक करीत असेल.

**आयरिस :** इतर माणसांना जाणून घेण्याच्या कुतूहलापासून लेखनाची सुरुवात होतेच. तसेच कोणताही लेखक स्वत:च्या काळज्या, आशाआकांक्षा याचा वापर त्याच्या लेखनात करतोच. पुस्तक जर अभिजात वाङ्मयाकडे झुकायला हवं असेल तर त्याला लेखकाच्या अबोध मनाची (अनकॉन्शस माइंड) धग लागलीच पाहिजे.

**जॉन :** तुझ्या मते तुझ्या कोणत्या चिंता, आशाआकांक्षा या कादंबरीत प्रकट होतात? तत्त्वज्ञान व कला यांच्या संबंधातील ताणतणावांचा त्याच्याशी काही संबंध आहे का?

**आयरिस :** नाही. मला असा कोणताच तणाव जाणवत नाही. या दोन्ही विषयांचा पाठलाग करताना जीवनातील बराच काळ जातो हाच एक तणाव असतो. ही कादंबरी जास्त करून



अनुक्रमणिका

सत्तेबद्दलची आहे. सत्ता माणसाला अलग पाडते. जॉन रॉबर्ट सत्तेचा दुरुपयोग करतो आणि तत्त्वतेत्याचा हताशपणा त्याला घेरतो. तत्त्वज्ञान हे अशक्यतेला स्पर्श करते आणि हेच तत्त्व-वेत्त्याच्या हुरहुरीचे कारण असते. मला वाटतं सर्वच तत्त्ववेत्त्यांच्या मनात हीच भावना असते. मला वाटतं प्लेटो व कांटला हेच वाटलं की आपल्याला (तत्त्वज्ञांना) योग्य उत्तर सापडणार नाही. मानवी मनाला इजा करणाऱ्या ज्या गोष्टी आहेत त्यावर प्रभुत्व मिळवणं अशक्य असतं. माणसानं चांगलं होणं ही एक अशक्यता असते. माणूस वाईट (ईव्हिल) होणं ही एक अशक्यताच असते. या सर्वांचा पाया कोणता हे नमूद करणे हीसुद्धा अशक्य कोटीतील गोष्ट असते. कांट आणि प्लेटो हे माझे वैयक्तिक देव आहेत. ते याचे उत्तर देण्याच्या जवळपास येतात. त्यांची ईश्वरासारखी मनं याचे आकृतीबंध तयार करतात. (पण तेसुद्धा अगदी शक्य कोटीतील, नाही कारण खऱ्या अर्थानं कोणालाही ते करता येत नाही.)

**जॉन :** काय तत्त्वज्ञाला सत्तेचा हव्यास असतो?

**आयरिस :** होय त्याला सर्वसाक्षी परमेश्वर व्हायचं असतं.

**जॉन :** कादंबरीलेखन हा एका अर्थानं तुला विरंगुळा होतो का?

**आयरिस :** नाही. कादंबरीलेखन हे माझं काम आहे. तो महत्त्वाचा उपक्रम आहे. मला नेहमीच कादंबरीकार व्हायचं होतं. परंतु एक काळ असा होता त्यावेळी मला वाटायचं, आपण पुरातत्त्व शास्त्रज्ञ व्हावं. कलेचा इतिहासकार व्हावं असं वाटत होतं त्यावेळी मी ऑक्सफर्ड-मध्ये होते. मला कलेच्या इतिहासाचा अभ्यास चालू ठेवता आला नाही याचे कारण ऑक्सफर्ड सोडल्याबरोबर सक्तीची सेनाभरती आली. मी सरकारी कोषागार खात्यात कामास लागले. माझा मार्ग विद्याविषयक जगतापासून अलग झाला. दुसरं युद्ध संपत आलं तेव्हा तत्त्वज्ञ होण्याच्या इच्छेनं व ईर्षेनं माझा ताबा घेतला. पुनरुथ्थानाच्या काळातील कलेचा इतिहासकार होणं मला आवडलं असतं. एकेकाळी तर मला चित्रकार व्हायचं होतं. मला वाटतं मी एक बऱ्यापैकी चित्रकार झाले असते, अर्थात मी सर्व आयुष्य त्याला वाहिलं असतं तरच! पण हे एक आधार नसलेलं गृहीतक आहे ! मी अजूनही चित्रं काढण्याचा प्रयत्न करते पण मला त्याचं प्रशिक्षण नाही. ते माझं एक स्वप्न आहे. मला चित्रकारांचा हेवा वाटतो. मला वाटतं ते सुखी लोक आहेत. चित्रकार आपल्या व्यवसायात सतत जगत असतो. कारण 'दृश्य जगत' हाच त्याचा व्यवसाय असतो. ते त्याच्यापुढं सतत असतं. त्याबद्दल चित्रकाराला नेहमीच विचार करता येतो. प्रकाश त्याला स्फूर्ती देत असतो, वगैरे वगैरे. एकंदरीत चित्रकाराचा काळ आनंदात जातो.

**जॉन :** कादंबरीलेखनात तुझा काळ छान जातो का ?

**आयरिस :** होय. कादंबरीलेखनात मला आनंद वाटतो. पण कादंबरी निर्मितीच्या सुरुवातीला मात्र भयंकर वेणा असतात. तुम्ही निर्जीव तुकड्यांशी व्यवहार करत असता. खूप प्रतिक्षा करावी लागते. या निर्जीव तुकड्यांची हालचाल सुरू होईल, त्यांना संजीवनी मिळेल म्हणून वाट पाहावी लागते.



अनुक्रमणिका

**जॉन :** लेखन हे अत्यंत एकाकीपणाचं. यामुळे इतरांशी मिसळण्यात, बसण्या बोलण्यात प्रतिबंध येतो.

**आयरिस :** कधी कधी त्यामुळे रंगभूमीसाठी लिहायला माझं मन मला भाग पाडतं. तेथे कंपनी (सहवास) मिळते. शिक्षकी पेशाचा आनंद मी खूप लुटला आहे. महाविद्यालयीन जीवन मी मजेत उपभोगलं आहे. पण कादंबरीलेखन मी दुसऱ्याच्या सहकार्याने करत नाही.

**जॉन :** चालू असलेल्या लिखाणाबाबत तू कोणाशी चर्चा करत नाहीस, अगदी तुझ्या नवऱ्याशी सुद्धा ?

**आयरिस :** नाही. माझी कादंबरी लिहून पूर्ण झाली म्हणजे मगच तो ती कादंबरी वाचतो.

**जॉन :** तुझा नवरा समीक्षक आहे. समीक्षक म्हणून त्याचा तुझ्यावर काही प्रभाव आहे का?

**आयरिस :** कादंबरीकार या माझ्या व्यक्तिमत्त्वाच्या पैलुवर त्याचा काही प्रभाव आहे असं मला वाटत नाही. परन्तु ज्यावेळी तुम्ही एकत्र बरीच वर्षं रहाता त्यावेळी तुमचं व त्या दुसऱ्या व्यक्तीचं मन संलग्न होतं. म्हणूनच तो माझ्या कादंबरीवर समीक्षात्मक भाष्य करत नाही.

**जॉन :** तुझं तुझ्या आईवडिलांशी कसं जमत होतं ?

**आयरिस :** आमचं उत्तम तऱ्हेनं जमत होतं. मी त्यांची एकुलती एक. मी परिपूर्ण प्रेमात वाढले. त्यामुळे पुढील जीवनातही माझी तशीच अपेक्षा राहिली. सर्व काही असंच राहाणार आहे असं मला वाटत होतं. आमच्या तिघांचा सखोल मिलाफ साधला होता.

माझी जिवलग आई ! ती अजून जिवंत आहे (१९८३ साली). ती उत्तम गायिका होती. डब्लीन हे गानवेडे शहर. वयाच्या अठराव्या वर्षी तिचा विवाह झाला. तिच्या 'करियर'च्या दृष्टीनं ती चुकीची गोष्ट होती. डब्लीनमध्ये तिला शिकवण्यासाठी व्यावसायिक संगीत शिक्षक होता आणि नंतर कुटुंब लंडनला आलं.

माझा पिता अत्यंत चांगला आणि हुशार माणूस. मी अगदी तरुण होते त्यावेळी आम्ही दोघं पुस्तकांवर चर्चा करायचो, ॲलिसची पुस्तकं, आणि इतरही. डाउन परगण्यातील मेंढ्यांची पैदास करणाऱ्या कुटुंबात तो वाढला. त्याचं घराणं प्रशंसनीय होतं. पण ते सनातनी प्रॉटेस्टंट होतं; आणि मला वाटतं त्याला त्यांच्यापासून दूर जायचं होतं. तो प्रादेशिक सेनेत भरती झाला. आणि संपूर्ण पहिलं महायुद्ध त्यानं घोडदळात काढलं. त्यामुळेच तो वाचला. घोडदळांनी धोकादायक मोहिमेत भाग घेतला पण तो धोका खंदकात बसून लढण्याइतका नव्हता. त्याची तुकडी कधी फ्रान्समध्ये, कधी कुराघमध्ये असायची. एके दिवशी डब्लीनमध्ये असताना, तो ट्रॅमनं चर्चला चालला होता. वाटेत त्याला एक सुंदर युवती भेटली, ती पण त्याच चर्चमध्ये चालली होती. आणि जे घडायचं ते घडलं. दोघांचा विवाह झाला. तो तिला घेऊन लंडनला आला. त्यानं नागरीसेवेत नोकरी पत्करली. तो उत्तम नागरी नोकर होता. अगदी खालच्या स्तरावर त्यानं नोकरीस सुरुवात केली आणि वरच्या हुद्यावर पोचला. माझ्या आईवडिलांना ज्या लंडन-मध्ये कोणी ओळखत नव्हतं अशा लंडनमध्ये आम्ही राहात होतो. मी लंडनवासी म्हणून वाढले.

नुकतंच मला असं वाटु लागलं किती विलक्षण, विचित्र आहे हे सगळं. आम्ही त्रिमूर्ती या शिवाय मला कोणी कुटुंबीय नव्हते. मला माझे आयरिश नातेवाईक जवळजवळ माहीतच नाहीत. आता जसं माझं वय वाढत आहे तसं मला वाटू लागलं की आम्ही भटके होतो. मला नुकतच उमजू लागलं आहे की मी एक प्रकारची विस्थापित किंवा देशपार व्यक्ती आहे. मी स्वत:ला विस्थापितांशी सरूप मानते.

**जॉन :** दुसऱ्या महायुद्धानंतर तू संयुक्त राष्ट्रांच्या साहाय्य व पुनर्वसन खात्यात काम करत होतीस, हे काम काळजाला घरं पाडणारं असेल नाही ?

**आयरिस :** होय ते काम असाधारण होतं. ते कार्य विस्थापित व्यक्तींच्या संदर्भातच होतं. त्या व्यक्तीत कितीतरी युगोस्लाव पोलीश लोक होते, त्यांची ओळख पटवायची, त्यांची काळजी घ्यायची. त्यापैकी किती जणांना विशेषत: युगोस्लावना त्यांच्या मायदेशी परत जायचं नव्हतं, आमचा कितीतरी वेळ त्या विस्थापितांना जेवू घालण्यात जायचा.

**जॉन :** त्या कामानं तुझ्या मनावर कोणते ठसे उमटवले? चिंता व कधी न संपणारा त्रास अशा भावना तुझ्या मनात ठसल्या का?

**आयरिस :** गोंधळ आणि म्हाताऱ्या माणसांचं उदास दु:ख माझ्या स्मृतीत गोंदलं गेलं. काही तरुण मंडळींना इंग्लंडमध्ये आणण्यात मी मदत केली. परन्तु तो विस्थापितांचा प्रश्नच एवढा अवाढव्य होता की एक मनुष्य त्यासाठी विशेष काही करू शकत नव्हता. त्यांना जेवू खाऊ घालायचं, त्यांच्याशी गोड वागायचं. एवढंच आमच्या हातात होतं. सबंध समाज पूर्णपणे कोलमडला होता. या सर्वाचा साक्षीदार होणं हेच एक प्रशिक्षण होतं.

**जॉन :** तुझ्या कादंबऱ्यांचा वेधक पैलू म्हणजे तू रंगविलेल्या व्यक्तिरेखा, 'अ वर्ड चाइल्ड' मधील हिलरी बर्ड, 'दसि'मधील चार्लस् ॲरोबी, 'द सी' या कादंबरीत चित्रण येतं दडपलेल्या माणसांचं, त्यांच्याच गतकाळानं त्यांना जखडून ठेवलं आहे, विशिष्ट घटना, प्रसंगातून त्यांची सुटकाच नाही अशा व्यक्तीचं !

**आयरिस :** मानवी जीवनाची ही एक ठळक खूण आहे. मानवाचं सर्वसामान्य ते लक्षण आहे. जीवनात काही योजलेल्या गोष्टी चुकीच्या ठरल्यामुळं किंवा एखाद्या टोचणीच्या टाचेखाली माणसाचं जीवन भरडलं जातं. माणसांना चांगलं होण्यास प्रतिबंध करणारं हे एक कारण आहे असं मला वाटतं. माणसं पूर्णत: चांगली का नसतात? आणि ईव्हिल (EVIL) नसूनसुद्धा, किंवा वाईट उद्देश नसूनसुद्धा माणसं वाईट का वागतात ? हा प्रश्न मला नेहमीच सतावतो. शॉपेनहौरबद्दल मला आदर आहे. यानं शोकात्मिकेच्या या अंगाबद्दल चांगले विचार मांडले आहेत. काही माणसं वाईट नसतात पण ती अशा स्थानावर असतात की ती माणसं दुसऱ्याला जास्तीत जास्त इजा पोचवण्यापासून स्वत:ला थांबवूच शकत नाहीत. माणसांची सुप्त खाजगी स्वप्नील जीवनं असतात हे मानवी मानसिकतेचं उघडं लक्षण आहे. माणसांच्या खाजगी जीवनात डोकावणं 'इंटरेस्टिंग' असतं. कादंबरीकार माणसांच्या खाजगी जीवनात डोकावण्याचा प्रयत्न



अनुक्रमणिका

करून मानवी जीवन आकलन करण्याचा प्रयत्न करतो. वाचक मला म्हणतात की तू तऱ्हेवाईक, चमत्कारिक व्यक्तिरेखा चितारतेस. परन्तु दुसऱ्यांचे वैयक्तिक सुप्त विचार, गंड, व फँटसी या थक्क करणाऱ्या असतात. माणसं या गोष्टी उघडपणे सांगत नाहीत. काही अंशी त्यांना ओशाळं वाटतं, तर 'खाजगी जीवन' किंवा खाजगी गुप्तता ही काही अंशी स्वाभाविक, योग्य व उचित असते.

**जॉन :** मला वाटतं तू पूर्वी कधीतरी मनोविश्लेषणांच्या त्रुटीबद्दल टीकाटिपणी केली होतीस.

**आयरिस :** होय, पण सैद्धांतिक अंगानं नव्हे. मी बराच फ्रॉइड वाचला असला तरी मी फ्रॉइड अभ्यासला आहे आणि मला त्याच्यात त्रुटी सापडल्या आहेत असा याचा अर्थ नाही. मला फ्रॉइड वाचायला आवडतो, कारण त्याच्यात नाना कल्पना सापडतात. तो महान आणि कुतूहलजनक विचारवंत आहे. मनोविश्लेषणाचा असाही एक परिणाम होतो की तुम्ही स्वत:वरच जास्तीत जास्त लक्ष केंद्रित करता. पण स्वत:च्या मनोदु:खावरचा उत्तम उपाय म्हणजे दुसऱ्याला मदत करणं. मला वाटतं मनोविश्लेषण हा एक प्रथमोपचार म्हणून उपयोगी पडतो. एका अर्थानं विश्लेषणज्ञ (ॲनालिस्ट) हा बोथट शस्त्रासारखा असतो, पण तो दुसऱ्याच्या मनाची काळजी घेणाऱ्याचं काम चांगलं करू शकतो. (मनोरुग्णालाही) तुलाही काही किंमत किंवा महत्त्व आहे अशी भावना मनोरुग्णात कुशल विश्लेषणज्ञ निर्माण करतो. कितीतरी लोकांना आपली समाजात किंमत (महत्त्व) नाही असं उगीचच किंवा सहजच वाटतं. विश्लेषणज्ञ एखाद्या धर्मगुरूची भूमिका बजावत अशा माणसांच्यात आशा निर्माण करू शकतो. विश्लेषणज्ञ काय करतो याचं स्पष्टीकरण सैद्धांतिक तत्त्वात देता येत नाही. परन्तु कुशल विश्लेषणज्ञाला सिद्धान्त साहाय्यक असतात हे मात्र ठाऊक असतं. मनोविश्लेषणज्ञ व रुग्ण यांच्यात जे खरं घडतं ते अत्यंत खाजगी व भावनिक असतं. दोन व्यक्तींमधील ते एक गुप्त नातं असतं.

**जॉन :** कादंबरीकार म्हणून तू गुपितं उघडी करतेस याबद्दल तुला रुखरुख वाटते का ?

**आयरिस :** मी दुसऱ्यांची गुपितं उघडी करते. माझी नव्हे. प्रत्येक कलावंत स्वत:च्या कलाकृतीत थोड्याफार प्रमाणात दिसतो. त्या अर्थानं मीसुद्धा माझ्या कलाकृतीत दिसत असेन. परन्तु मी फक्त कथेतील व्यक्तिरेखांची गुपितं उघडी करते.

**जॉन :** तू तुझे वैयक्तिक नव्हे तर सैद्धांतिक पूर्वग्रह तुझ्या कादंबरीत प्रकट करतेस का?

**आयरिस :** माझे सैद्धांतिक पूर्वग्रह माझ्या कादंबरी लेखनात फारसे येत नाहीत. पण काही व्यक्तिरेखांच्याद्वारे ते प्रकट होतात. तेसुद्धा चर्चेच्या स्वरूपात. खूप सैद्धांतिक विचार कादंबरीत मांडणे हा उघड धोकाच असतो. पण मला त्याचा विशेष मोह पडत नाही. कादंबरीत खच्चून सिद्धान्त भरून एखादा लेखक ते पुस्तक चांगलं करेल. परन्तु विविध गोष्टींचं ज्ञान असणं हे मात्र कादंबरीकारासाठी आवश्यक असतं. हुशारी, विचार आणि बहुविध गोष्टींचं आकलन हे सर्व फायद्याचं ठरतं.

**जॉन :** फ्रॉइडच्या कार्याची कोणती क्षेत्रं तुला महत्त्वाची वाटतात ?

**आयरिस :** सुपर इगो, इड, यासारख्या काही गोष्टीत खोल सत्यांश आहे. फ्रॉइड स्पष्टपणे कबूल करतो की काही विचार मी प्लेटोपासून उचलले आहेत, फ्रॉइडच्या ह्या विचारांशी मी सहमत आहे. 'ॲनॅम्नेसिस' (स्मृत्येतिहास) चा किंवा 'पुन:स्मृतीचा सिद्धान्त' हा 'अबोध' (अन्‌कॉन्शस) जाणिवेपलिकडच्या मनाचा सिद्धान्त आहे. इरॉस ही अशीच एक संकल्पना; इरॉस म्हणजे मूलभूत शक्ती, ऊर्जा, ज्यात कामवासनेचा अंतर्भाव असतो. इरॉस, चांगली किंवा वाईट होऊ शकते. हे सर्व प्लेटोमध्ये येतं जे फ्रॉइडनं घेतलं.

**जॉन :** फ्रॉइडने दिलेल्या स्वप्नांच्या स्पष्टीकरणाबद्दल तुझं काय मत आहे. फ्रॉइडसुद्धा तयार केलेल्या, मुद्दाम सुलभ उत्तरं शोधलेल्या, व्यवस्थित आकार दिलेल्या 'पॅकेज्ड' (व्यवस्थित-पणे बांधलेल्या) कथा लिहितो.

**आयरिस :** मला वाटतं स्वप्नांना कितीतरी स्पष्टीकरणं असतात. एकदा तुमच्या डोक्यात फ्रॉइडचा विषाणू शिरला म्हणजे मग तुम्ही त्याच दृष्टीनं सगळ्या गोष्टींकडे पाहाता, पण हेही खरं की स्वप्नात निखळ अपघाती योगायोग (अक्सिडेंट) असतात. प्रत्येकाला नाना प्रकारचे गंड, भीती असते. पण त्या सर्वांना कामवासनेचं स्पष्टीकरण देता येत नाही. मला वाटतं स्वप्नांमधील कपोल कल्पित गोष्टी व तपशील चकित करणारे असतात.

**जॉन :** तू तुझी स्वप्नं कधी नमूद करून ठेवतेस का ?

**आयरिस :** कधी कधी नमूद करून ठेवते. स्तिमित करणाऱ्या गोष्टींचा शोध आपण स्वप्नात लावतो. ज्या गोष्टी कोणीही रोजच्या जीवनात निर्माण करू शकणार नाही अशांचा उदय स्वप्नात होतो. निद्रानाशावरचा एक उपाय म्हणजे स्वत:साठी एक स्वप्न निर्माण करणं. मला बहुधा छान झोप लागते, पण मला अवेळी जाग आली तर मी एक स्वप्न निर्माण करते. त्याची सुरुवात कॉन्शसली– सबोधतेने किंवा जाणिवेनं होते आणि पुढे ते स्वप्न अन्‌कॉन्शसली– अबोधावस्थेत चालू राहातं.

**जॉन :** एखादं उदाहरण देशील का?

**आयरिस :** मला नाही वाटत मी उदाहरण देईन.

**जॉन :** तुला कधी (ल्युसिड) स्पष्ट व संयुक्तिक अशी स्वप्नं पडली आहेत का ?

**आयरिस :** हो पडली आहेत. आपण स्वप्नाला मार्ग दाखवू शकतो आणि तसा मार्ग दाखवणं फार मजेदार असतं.

**जॉन :** 'तुला कशाची भीती वाटते' हा तत्त्वज्ञाला विचारण्यासाठी उत्तम प्रश्न आहे, असं तू एके ठिकाणी लिहिलं आहेस. मी तुला आज तोच प्रश्न विचारतो.

**आयरिस :** तुम्ही कसे वागता यावर काही अवलंबून नसतं किंवा याला विशेष महत्त्व नसतं असा मला शोध लागेल, किंवा नैतिकता ही (सुपरफिशियल फिनॉमेनन्) अनावश्यक असे घटित आहे, असं मला समजेल याची मला भीती वाटते. मला नाही वाटतं हे कोणाला शोधून काढता येईल. हे शोधून काढण्याची अशक्यता हा नैतिक तत्त्वज्ञानाचा खोलवरचा गाभा

ठरेल असा भाग आहे. माझा देवावर विश्वास नाही, परन्तु नैतिकता ही मानवी जीवनाचा मूलभूत आधार आहे असं मला वाटतं.

**जॉन :** 'फिलॉसॉफर्स प्युपिल' या कादंबरीत जॉन रॉबर्ट, गुड अँड ईव्हिल यांच्या पलिकडे जाण्याच्या शक्यतेचा विचार मांडतो.

**आयरिस :** होय.जॉन रॉबर्टला या समस्येत रस आहे आणि जॉर्जही त्या प्रश्नाला चिकटून आहे.

**जॉन :** तू वैवाहिक प्रेमाकडे व वैवाहिक जीवनाच्या साफल्याकडे नैराश्यमय दृष्टीनं बघतेस, त्या व्यक्तिरेखांना सुखी म्हणून फेटाळून लावतेस असं काही समीक्षकांना वाटतं त्याबद्दल तुला काय म्हणायचं आहे?

**आयरिस :** कादंबरी एक नाट्य आहे आणि खळबळ असेल तेव्हांच नाट्य घडतं. संपूर्ण सुसंवादी, सुरेल जीवन नाट्य निर्माण करेलच असं नाही. काही पुस्तकं मात्र सुख– आनंदानी भरलेली असतात. पुस्तकं मला सुखानं तेजाळलेली वाटतात! वास्तविकत: माणसाचं जीवन कटू काळानं भरलेलं असतं पण सर्वसाधारण कादंबऱ्यात सुख ओसंडत असतं म्हंणून कादंबरी हा एक (कॉमिक) विनोदी वाङ्मयप्रकार आहे असं मला वाटतं.

**जॉन :** परन्तु सुखात्मिका ही वाङ्मयीन घाटामुळे निर्माण होण्याची शक्यता असते माणसाची स्वत:बद्दलची प्रतिमा व त्याचं जीवनातील वर्तन या दोघांमधील दिसणाऱ्या विरोधाभासाचं चित्रण या वाङ्मयीन प्रकारात होतं.

**आयरिस :** माझ्या व्यक्तिरेखांची चेष्टा किंवा विडंबन करण्याचा माझा उद्देश नाही. माझ्या वाङ्मय प्रकारात सुखात्मिका खोलवर रुजलेली आहे. विषयवस्तू काहीही असो, कलेचा जोम आणि ऊर्जा तुम्हाला आनंदी करते.

फिलॉसॉफर्स प्युपिलमधील हॅटी, टॉम ही प्रफुल्ल व आनंदी माणसं आहेत. त्यांच्यात ज्या प्रकारचा जोम, उत्साह आहे तो त्यांना सुखी बनवणारच. मला वाटतं अेमाच्या बाबतीतही हे खरं आहे.

परन्तु आपला कल (डेमॉनिक) राक्षसी माणसांनी प्रभावित होण्याकडे असतो.

**जॉन :** तू कुठे तरी म्हटलं आहेस की सैतानी वृत्तीच्या व्यक्तिरेखांमध्ये अवैध मोहकता असते.

**आयरिस :** हे वास्तव जीवनातही खरं आहे. आपल्या जीवनाचं नाट्यीकरण करणं व आपल्यालाही नियतीला सामोरं जायचं आहे असं वाटणं हे सर्वसामान्य मानवी मनाला पडणारे मोह आहेत. जीवनातील चमकृतिजन्य घटक हाच मोठा धोकादायक असतो आणि तोच धर्माचा व चांगुलपणाचा शत्रू असतो. पुस्तकातील सैतानी व्यक्तिरेखांशी आपण सरूप आहोत असं वाचकांना वाटतं याचं कारण सैतान आपल्याला मोहात पाडतो आणि चांगुलपणा सोडण्याच्या मोबदल्यात एक शक्ती देतो, असा समज खोलवर कुठेतरी मुरलेला असतो. हा चांगुलपणा

बहुतेक वेळ मंद किंवा निस्तेज असतो असाही लोकांचा एक समज असतो.

**जॉन :** कलात्मकतेच्या व नैतिकतेच्या कारणांमुळे एखादा आकृतिबंध लादण्याबाबत तू साशंक असतेस, कारण तो आकृतिबंधच वास्तव जीवनाची बदनामी करणारा लिखित पुरावा होईल असं तुला वाटत असावं अशी माझी कल्पना आहे.

**आयरिस :** बंदिस्त आकृतिबंधाचा कादंबरीतील व्यक्तिरेखा संकुचित करण्याकडे कल असतो. मला हे विशेषत: 'अ सिवीयर्ड हेड' या माझ्या कादंबरीत जाणवलं. ही कादंबरी म्हणजे एका रस्त्याचं संपणं. प्रखर पुराकथा लेखनात वापरल्यास लेखन यांत्रिक व विस्मयशून्य होतं. चांगलं लेखन हे विस्मयकारक गोष्टींनी व नित्यनूतन नवलाइनं उसळणारं असतं. ज्या दिशेची कधी अपेक्षाही केलेली नसते तिकडे असं लेखन वाचकाला घेऊन जातं. लेखनासाठी मिथ व घाट या दोहोंची कल्पना असायलाच हवी. पण आकृतिबंध जर पुस्तकातील भाव-भावना ठरवू लागला तर लेखकानं आकृतिबंधाच्या विरुद्ध दिशेनं काम केलं पाहिजे. मानवी बुद्धीला अगम्य अशा चमकृतीजन्य जगतात घडणाऱ्या घटनांसारखं असणार नाही असं काहीतरी लेखकानं निर्मिलं पाहिजे. म्हणजेच लेखकानं सुलभ– स्वाभाविक असं काहीतरी निर्मिलं पाहिजे.

**जॉन :** कला हा नीतीमूल्यांकडे नेणारा धागा असतो असं तू लिहिलं आहेस. कादंबरीला काही प्रमाणात प्रबोधनात्मक किंवा बोधपर स्वरूप असावं असं तुला वाटतं असं मी गृहीत धरतो. परन्तु काही उपपत्तीकारांच्या मते कादंबरी म्हणजे अटकळीच्या खेळापेक्षा जास्त काही नाही. याबद्दल तुला काय म्हणायचं आहे?

**आयरिस :** होय माझ्या कादंबरीत एक प्रकारचा पंतोजी असतो. मला वाटतं कादंबरीकारानं सत्यशील असावं. हीन दर्जाच्या कांदबऱ्यातून सत्तेची दिवास्वप्नं, भयावह लैंगिक आकर्षकता अशा गोष्टी रंगविलेल्या असतात, आणि ते खरंच भीषण असतं. आकस्मिकता हा जीवनाचा एक पैलू कसा असतो, माणसाची स्खलनशीलता कशी असते, एखाद्यानं चांगलं असणं म्हणजे काय, हे रंगविणं कठीण असतं. येथेच लेखकाची सत्यशीलता कामी येते. लेखकाची सत्य-शीलता, लेखकाला खोटं सांगण्यापासून परावृत्त करते.

**जॉन :** कादंबरीत कितीतरी घटक असतात, व्यक्तिरेखांचं चित्रण असतं, प्रसंगांच्या नमुनाकृती असतात, मिथ व नीतीशास्त्र यांचा वापर असतो, अशा कितीतरी गोष्टींचे तरंग असताना, कादंबरीकारानं सत्यकथनाची महत्त्वाकांक्षा बाळगणं धाडसीपणाचं ठरेल.

**आयरिस :** या सगळ्या गोष्टी एकमेकात मिसळलेल्या असतात. निकृष्ट दर्जाचा चित्रकार खोटं सांगतो, कारण त्यानं भेदक नजरेनं 'बघितलेलं' नसतं; ज्याप्रमाणे रेमब्रॉंट 'बघतो' त्याप्रमाणे. 'सत्य व न्याय' या दोन गोष्टी 'बघण्यात' अनुस्यूत असतात. कलावंताच्या दृष्टीशी या दोहोंचा संबंध येतो कारण कलावंताला योग्य परीक्षा असलीच पाहिजे. मला नाही वाटत हे तू म्हणतोस त्याप्रमाणे धाडसीपणाचं आहे. जर योग्य प्रकारे काम केलं तर हा एक विनम्रतेने करावयाचा व्यवसाय आहे. पण कलानिर्मितीत ॲरॉसच्या (लैंगिक प्रवृत्तीच्या) प्रभावाने कोणीही

वाहत जाण्याची शक्यता असते. आदर्शात, सत्य व आनंद एकत्र खेळतात, ज्यावेळी हे सर्व व्यवस्थित चालतं त्यावेळी ती आनंदाची स्थिती असते.

कलाकृती आपणा सर्वांना आनंद देतात. अगदी किंग लियर हे नाटकसुद्धा तुम्हाला अशक्य कोटीतलं वाटेल पण भयानक गोष्टीबद्दलची कलाकृती तुम्हाला आनंद देईलही.

**जॉन :** तुझ्या सत्प्रवृत्त व्यक्तिरेखा, उदाहरणार्थ 'फेअरली ऑनरेबल डिफीट' मधील टॅलीस किंवा 'नन्स अँड सोल्जर्स' मधील कौंट आणि अॅन या दोन सद्वर्तनाची महत्त्वाकांक्षा धरलेल्या व्यक्तिरेखा, अशा सद्वर्तनी व्यक्तिरेखा कुचकामी माणसे ठरण्याची शक्यता असते. अशा व्यक्तिरेखा नैतिकतेचे परीस बनून, जवळ जवळ प्रतीकं होतात ! सद्गुणी, सद्वर्तनी व्यक्तिरेखा, तटस्थपणे, उदासीनपणे वागतात त्यामुळे अशा व्यक्तिरेखा नीरस होण्याची शक्यता असते.

**आयरिस :** हाच तर विरोधाभास आहे. 'फेअरली ऑनरेबल डिफीट' मधील 'टॅलिस' ही रूपकात्मक व्यक्तिरेखा आहे. तो ख्रिस्तासारखा आहे. टॅलिसचा कट्टर शत्रू 'ज्युलियस' याने सुद्धा हे ओळखलं आहे. टॅलिस प्रतीकात्मक व्यक्तिरेखा आहे. चांगलं (गुड) असणं हे त्याचं कामच आहे. सद्गुणी, सद्वर्तनी व्यक्तिरेखा प्रभावी नसते असा विचार करण्याकडे तुझा कल दिसतो. पण टॅलिस ही व्यक्तिरेखा प्रभावी आणि समर्थ आहे. 'नन्स अँड सोल्जर्स' मधील दि कौंट ही व्यक्तिरेखा उदात्त व निष्पाप (सात्विक) व्यक्तिरेखा आहे पण चांगल्या व्यक्तिरेखेच्या तंतोतंत अर्थाने ती चांगली होत नाही. पण निश्चित अर्थानं चांगल्या व्यक्ती रोजच्या जीवनात भेटत नाहीत.

**जॉन :** सिमॉन वेलला तू दिलेला सखोल प्रतिसाद सर्वज्ञात ( उघड ) आहे. त्याबद्दल मी तुला विचारणार आहे.

**आयरिस :** हो मला ती फार आवडते.

**जॉन :** याचं मुख्य कारण असं असू शकेल की एक प्रकारच्या आशाविरहित वाटेवरचा तिनं सांगितलेला उपाय (जो अमॉर फॅटी या संकल्पनेत अनुस्यूत आहे) हा जीवन नाकारणारा म्हणून मानता येईल.

**आयरिस :** मुळीच नाही. या मार्गानं स्वत:च्या निर्मितीक्षमतेवर नियंत्रण आणणं याला प्रचंड आत्मिक बळ लागतं. रोजचं व्यावहारिक जीवन हे एक स्वप्नील भटकणं असतं. तेथे स्वत:चा सतत बचाव करावा लागतो, स्वत:च्या मार्गातून दुसऱ्याला बाजूला ढकलावं लागतं. (मेडिटेशन) ध्यानधारणा, चिंतन व प्रार्थना यामुळे मनाच्या सामान्य अवस्थांची असत्यता आकलन होण्यास मदत होते असं मला वाटतं. मला 'अमॉर फॅटी' ही कल्पना आवडत नाही. ही कल्पना माझ्या विचारांच्या बरोबर विरोधी आहे. सिमॉन वेल कधी कधी अमॉर फॅटी ही संज्ञा वापरते. मी या संज्ञेचा संबंध स्टॉइसिझम्शी जोडते. या विचारप्रणालीचा मी अजिबात स्वीकार करत नाही. अहंकेंद्रित जीवनाचा प्रवाह फोडून आपण इतर कोणीही आहोत हा आज्ञा

पालनाचा अर्थ सिमॉन वेलला अभिप्रेत होता असं मला वाटतं. मी युंग (JUNG) च्या फारच विरुद्ध आहे. तो इथं शत्रूच आहे. ज्यावेळी तुम्ही अहंचा प्रवाह सोडून बाहेर पडता त्यावेळी तुम्ही सर्व घटनांच्या सापेक्षतेने स्वत:ला ओळखू शकता. म्हणजे तुम्हाला नियतीचा फार अर्थ समजलेला असतो असं नाही. कारण तुम्हाला मिथ ज्ञात नसतं, काय घडतं आहे हेही तुम्हाला माहीत नसतं. तुम्ही आपल्या सभोवतालच्या परिस्थितीशी एका वेगळ्या वाटेनं नातं जोडता व तुम्ही इतर माणसांशी अहंविरहित किंवा नि:स्वार्थीपणे संबंध लावता. स्वयं– नकाराची ती एक तालीम असते, अभ्यास असतो.

**जॉन :** मृत्युसमयी आपण परिपूर्ण तसेच नश्वरही आहोत या दोन्ही भावना आपल्याला झाल्या पाहिजेत अशी कल्पना ज्या बुद्धिझममध्ये आहे, त्या बुद्धिझममध्ये तुला जो रस आहे त्याचा याच्याशी काही संबंध आहे का ?

**आयरिस :** ख्रिश्चन बुद्धिझम हा एक समाधानकारक बऱ्यापैकी धर्म होईल असं मला वाटतं कारण मी ख्रिस्तापासून दूर जाऊ शकत नाही. तो माझ्याबरोबर सतत प्रवास करतो. मी बाल वयात ख्रिश्चन होते. पण ख्रिश्चॅनिटीच्या दैवी पैलूंवर माझा विश्वास नाही. बुद्धिझम हे या सर्व गोष्टींचं बरं चित्र आहे. अर्थात त्यातील पुनर्जन्माबद्दलच्या 'मिथिकल' कल्पना मात्र स्वीकार्य नाहीत. पण बुद्धिझमचा उद्देश अहं नष्ट करणे हा आहे. अहंविरहित जगताची जाणीव करून घेणे हे माणसाचे नियुक्त कार्य आहे. या कल्पनेशी शॉपेनहौर खेळताना दिसतो. बुद्धिझम हा काही दुसऱ्या विश्वातून पडलेला धर्म नव्हे तो संपूर्णत: याच जगातला धर्म आहे. 'इथे आणि आता' अशाच गोष्टी त्यात घडतात. या जगापेक्षा दुसरी अशी काही जागा नाही. पण अहंला नकार द्यायचा हीच सगळ्यात कठीण गोष्ट आहे. परन्तु एकदा तुम्ही अहंला नकार दिला की मिळणाऱ्या ज्ञानप्रकाशानं तुमचं अंधत्व दूर झालेलं असतं. मग तुम्ही तुमच्या सभोवतालच्या परिस्थितीला सुयोग्य प्रकारे प्रतिसाद देता व ती एक चांगुलपणाची उचित स्थिती असते.

चित्रं ही आत्मिक जीवनाची प्रतिमा असते. चित्रकार खरोखरचे बघतो ! तो आवरण काढतो. स्वत:तील अहं काढून टाकलेला माणूस जगाकडे सुस्पष्टपणे बघतो. तो माणूस आजूबाजूच्या माणसांबद्दल विचार करतो. त्यावेळी त्याची 'अहं' विरहित भूमिका जास्त महत्त्वाची असते. कारण संपर्कात येणाऱ्या व्यक्ती याच आकलन करण्यास सर्वात जटिल आणि कठीण असतात.

मला वाटतं जी चांगली माणसं आहेत - माझं म्हणणं तुम्हाला रोमँटिक वाटेल, परन्तु मी अशा एक दोन माणसांना भेटलेली आहे – ही चांगली माणसं आपल्याभोवती असं काही मोकळं अवकाश निर्माण करतात की कोणालाही असं वाटावं, "आपण या माणसांजवळ सुरक्षित आहोत." काही माणसं खरोखरच भयावह असतात. ही माणसं आपल्याभोवतालची सर्व हवा शोषून घेतात. त्यांच्या सान्निध्यात आपल्याला श्वासच घेता येत नाही. अशी माणसं आपल्याला खुजं करतात. म्हणूनच कुशल मनोविश्लेशणज्ञाला (सायकोॲनालिस्टला) 'मोकळं अवकाश' निर्माण करण्याची कला अवगत पाहिजे. जे मार्ग शिष्टसंमत नाहीत अशा मार्गांचा

अवलंब न करता, जो कोणी धीर देणारा आहे त्यानं धीर दिला पाहिजे. कारण सद्व्यक्तीकडे आपण ती व्यक्ती उत्तम परीक्षक आहे म्हणून पाहात असतो. जीवनातील या सर्व गोष्टींच्या आकलनाशी बुद्धिझमचा जवळचा संबंध आहे आणि हे आकलन अत्यंत महत्त्वाचं आहे असा बुद्धिझमचा समज आहे. मला पृथ्वीवर धर्म हवा आहे.

**जॉन :** बुद्धिझमचा मूलगामी अधिनिर्णय असा आहे की सर्व अस्तित्व हे शेवटी ईव्हिल (EVIL) असते व त्याचा सर्वनाश केला पाहिजे आणि नेमका हाच विचार अस्वस्थ करणारा आहे.

**आयरिस :** तुम्ही याचा काय अर्थ लावता किंवा तुम्ही हे कसं समजावून घेता त्यावर हे सर्व अवलंबून आहे. निर्वाण ही एक मिथिकल कल्पना आहे असं मला वाटतं. 'काही नाही' 'नथिंगनेस' या अवस्थेला जाणं असं काही असू शकत नाही. अहंपूर्ण जगत हे आत्मिक जगताच्या दृष्टीनं काही नाही तसेच आत्मिक जगत हे अहंपूर्ण जगताच्या दृष्टीने शून्यवत म्हणजे निर्वाण. सुविकसित बुद्धिझमला त्याच्यातील संकल्पनात्मक मर्यादांची चांगली जाणीव आहे. बुद्धिझममधील मिथ हे काही निराळंच सांगत आहे आणि त्याचं निराळ्या प्रकारे आकलन झालं पाहिजे. तुमचं वर्तमानातील अस्तित्व पुसून टाकणं याचा अर्थ जग अस्तित्वात आहे पण तुम्ही अस्तित्वात नाही असा होतो. सिमॉन वेल ही कल्पना अशी व्यक्त करते– तुम्हाला जग व परमेश्वर एवढेच फक्त एकत्र हवे असतात आणि तुम्हाला त्यापासून वेगळं व्हायचं असतं– मला हे अर्थपूर्ण वाटतं. मला वाटतं या अर्थानं व्यक्तीचा मृत्यू सतत होत असतो. माणूस जीवनात मार्गक्रमण करत पुढे जात असतो आणि अंती शेवटी काहीतरी प्रचंड विशेष घडणार असतं ही कल्पना मला जुन्या प्रकारच्या धार्मिक मिथिकल कल्पनेसारखी वाटते.

**जॉन :** स्व– सुधारणेच्या मानवी क्षमतेबद्दल तुझा दृष्टिकोन अत्यंत संकुचित आहे असं काही समीक्षकांना वाटतं.

**आयरिस :** कोणीही जर आजूबाजूला डोळे उघडे ठेवून पाहिलं तर त्यालाही तसंच वाटेल असं मला वाटतं. माणूस कदाचित् थोडाफार सुधारू शकेल, परन्तु अहंभाव हा भयंकररीत्या शक्तिशाली आणि स्वाभाविक असतो. जर एखाद्यानं चांगलं व्हायचं असं ठरविलं किंवा स्वत:मध्ये खूप सुधारणा करायची असं ठरविलं तर अशी मागणी स्वत:कडून करणं हे निसर्गा-विरुद्ध होईल. ज्याने स्वत:मध्ये बरीच सुधारणा घडवून आणली आहे असा कोणी तुला ठाऊक आहे का ?

**जॉन :** तुझ्या काही कादंबऱ्यात एक प्रकारची उपसंहिता असते. त्यात व्यक्तिनिरपेक्ष प्रेम दाखवलेलं असतं, जे खरं पाहाता अशक्य कोटीतलं असतं. हे प्रेम, मानवी सुखाच्या, आनंदाच्या, सौजन्याच्या कामभावनेच्या पलिकडचं असतं.

**आयरिस :** होय– एखाद्याला अशा भावनेनं पछाडलेलं असतं, त्यामुळे एखाद्याचं जीवन किती बदलेल ही गोष्ट वेगळी, पण मला वाटतं अशी भावना उरी बाळगणं मोलाचं. म्हणून

तर मला तारुण्यापेक्षा उतारवयात ख्रिश्च्यानिटीच्या खूप जवळ गेल्यासारखं वाटतं. नशिबाने जर ख्रिस्त तुमच्या जीवनात असेल तर तुम्ही त्याला धरून चिकटून राहाणं इष्ट.

**जॉन :** तुझ्या मते कलेचं खरं कार्य काय ? सांत्वन, प्रबोधन, का शुद्ध आनंद.

**आयरिस :** शुद्ध आनंद ही संज्ञा तू वापरली आहेस ती योग्य आहे असं मला वाटतं. माणसानं अभिजात कलेबरोबर जगावं व निकृष्ट कलेच्या आहारी जाऊ नये, निकृष्ट कलेची सवय पाडून घेऊ नये. उत्तम कलाकृती हा एक निर्भेळ आनंद असतो. ते सुख असतं. माणूस कलेपासून खूप शिकतो, जगाकडे कसं बघावं, जगाचं आकलन कसं करून घ्यावं, कला सर्वच गोष्टी रसपूर्ण करते. कला हा मननाचा एक प्रकार आहे म्हणून सर्वंकष सत्तेने कलावंतांमध्ये ढवळाढवळ करणे हा महाभयंकर गुन्हा ठरतो. कलावंतांना शासनाच्या व समाजाच्या निर्बंध-विरहित जगू दिलं पाहिजे. समीक्षकांनीसुद्धा त्यांना सोडून दिलं पाहिजे. कलावंतांना समीक्षक धमकावतात आणि असं करणं राक्षसीपणाचं असतं. कलावंत ही तत्त्वत: मुक्त व्यक्ती असते. कला हा मननाचा महान दिवाणखाना असतो. म्हणूनच राजकीयदृष्ट्या कला ही मुक्त असणं महत्त्वाचं ठरतं. कलेमध्ये विविध प्रकारचं मुक्त मनन चालू असतं. कला ही विचाराची एक पद्धती, ज्ञानाची एक पद्धती. अभिजात कला तुम्हाला शिकवल्याशिवाय राहूच शकत नाही पण अशा कलेनं 'शिकवणं' हा हेतू ठेवायचा नसतो. कलावंतांचं नियुक्त कार्य म्हणजे उत्कृष्ट कलाकृती निर्माण करणं. कादंबरी ही स्पष्टीकरणाची एक पद्धती. लेखक व्यक्तिरेखांचं स्पष्टीकरण दिल्याशिवाय राहूच शकत नाही. त्या व्यक्तिरेखांच्या हेतूंची छाननी, निरीक्षण केल्याशिवाय चालत नाही. कादंबरीकार हा त्या माणसांचा (व्यक्तिरेखांचा) परीक्षक असतो, मूल्यमापन करणारा असतो, मूल्यविवेक करणारा असतो, असाच त्याच्यातून अर्थ निघतो. योग्य व न्याय्य मूल्यमापक असणं हे कादंबरीकाराला अत्यंत कठीण असतं. पारंपारिक कादंबरीत ज्या कादंबरी-बद्दल मी सध्या बोलत आहे त्या कादंबरीचा कादंबरीकार हा वस्तुत: (Ipsofacto) स्वत:ची नैतिकता उघड करत असतो आणि त्यानं तसंच केलं पाहिजे.

---

# असा हा वाचनछंद – जर्मेन ग्रियर

– डॉ. मीना वैशंपायन

मी जेव्हा फार लहान होते तेव्हा कुठेही अक्षरं दिसली की मी वाचत असे. त्या अक्षरांचा अर्थ समजत होता म्हणून नव्हे, तर ती अक्षरं ओळखू येतात या आनंदासाठी! सकाळी न्याहारी करताना समोर पडलेल्या वेगवेगळ्या पदार्थांच्या डब्यांवरील, पुड्यांवरील वेष्टनांचं निरीक्षण करणं, त्यावरच्या अक्षरांचा अर्थ लावणं हे मला फार आवडे. 'हं काय बरं याचा अर्थ?' असं मी मोठ्याने म्हणत वाचायला सुरुवात करी. माझ्याकडे कुणीही लक्ष देत नसे पण तरी मी माझं काम सुरू ठेवीत असे. बिस्किटांच्या पुड्यांवरील कागदावर लिहिलेली सगळी रासायनिक नावंदेखील वाचून झाली की बाबांच्या हातातील वर्तमानपत्राकडे माझी नजर वळे. जॅम, मार्मालेडच्या भांड्यावरून वाकून ते वृत्तपत्र वाचण्याचा मी प्रयत्न करी. त्या प्रयत्नात खालून वर अक्षरं लावण्याची मला जी सवय झाली ती अजूनही कायम आहे. आतादेखील सरळ वरून खाली वाचणं मला जितकं सहजपणे जमतं तितकंच उलट खालून वर वाचणंही जमतं.

वाचन हा माझ्यात एकच दुर्गुण तेव्हा होता. (त्यानं पुढं अनेक दुर्गुणांना जन्म दिला) मी जेवता-खाताना, आंघोळ करताना एवढंच काय, प्रातर्विधींच्यावेळी देखील वाचत असे. माझ्या झोपण्याची म्हणून जी वेळ ठरवलेली होती तेव्हादेखील मी वाचतच असे. माझ्या खोलीच्या दाराखालून दिव्याचा प्रकाश दिसू नये म्हणून पांघरुणाखाली पुस्तक घेऊन मी वाचत असे. मात्र बॅटरीच्या प्रकाशात नव्हे. कारण बॅटरी आणण्यासाठी माझ्याकडे पैसे नव्हते. पण त्यावर मी एक उपाय शोधला होता. रोज मी जवळच्या चर्चमधून मेणबत्तीचे उरलेले, शेवटचे छोटे तुकडे आणत असे आणि पांघरुणाखाली पुस्तक लपवून व ते मेणबत्तीचे तुकडे लावून त्या प्रकाशात मी वाचत असे. आज त्या आठवणीने देखील माझ्या अंगावर काटा येतो. या उद्योगामुळे माझ्या पुढच्या केसांची टोके सारखी जळत असत आणि आजही ते तुटके केस अर्धवट उभे राहिलेले दिसतात.

मी घरातील कामे करीत असताना म्हणूनच आई ओरडत असे. 'तू वाचते आहेस. वाचन बंद कर.' घराच्या कोणत्याही भागात ती असली तरी तिला हे कसे समजे कोण जाणे! पण शाळेच्या गणवेशाला इस्त्री करत असताना पोलक्याची कॉलर जळून भोक पडणे असो किंवा 'व्हॅक्यूम क्लीनर' चालवीत असताना खोलीच्या कडांवर तो आपटणे असो, या चुका होतच असत. आईच्या ओरडण्यामुळे या गोष्टी काही टळत नसत. एखाद्या खोलीतील फुलदाण्या किंवा

चांदीची भांडी स्वच्छ करण्याचं काम मला दिलेलं असे. ते काम मी करत असेन अशी अपेक्षा ठेवून आई जर तिथे आली तर टेबलावर घातलेला वृत्तपत्राचा तुकडा वाचण्यात मी गढलेली आहे असं दृष्य हमखास तिच्या नजरेला पडे. माझ्या कानफटांवर मारून घेणं मला कधीच आवडलं नाही. पण अशावेळी मी काही करू शकत नसे. माझ्या नजरेच्या टप्प्यात आलेला कोणताही छापील तुकडा माझ्या नजरेतून सुटत नसे. आतादेखील लोक माझ्याकडे विचित्र नजरेने बघतात याची मला जाणीव असते. कारण लोकलगाडीतही माझ्या हातातील वृत्तपत्राचं वाचन संपवून मी शेजारच्या माणसाच्या हातातील वृत्तपत्र वाचण्यासाठी त्याच्या खांद्यावरून त्या वृत्तपत्रात डोकं खुपसत असते किंवा समोरच्या माणसाच्या हातातील वृत्तपत्र वरपासून खालपर्यंत वाचण्यासाठी मान वाकडी करून तसा प्रयत्न करत असते.

मी वाचायला 'शिकले' असं मला आठवतच नाही. मी पहिलीत असताना Put या शब्दाचा उच्चार चुकीचा करीत असे. 'पुट' ऐवजी तो 'पट' असावा, असं माझं मत होतं. पण तो तसा का नाही याविषयी कुणीच मला समाधानकारक उत्तर देऊ शकलं नव्हतं. त्यानंतर मात्र मला वाचताना काही अडचणी आहेत असं दाखवणं मी सोडून दिलं. वर्गात जेव्हा माझी वाचायची वेळ येई तेव्हा मी शक्य तेवढ्या जलद् गतीने आणि जोरजोराने ओरडून वाचायचा प्रयत्न करी. मग वर्गातल्या 'सिस्टर' – बाई – आम्हाला थांबवून, रांगल्यासारख्या धीम्या लयीत वाचायला लावीत. शाळेच्या दुसऱ्याच दिवशी माझं 'प्रायमर' – पहिलीचं पुस्तक – मी अगदी अथपासून इतिपर्यंत वाचून काढलं. त्यामुळे पुढे वर्षभर इतर मुलांची शब्दांशी चाललेली झटापट आणि शब्दउच्चारणातील अर्थहीनता हे सारं ऐकणं माझ्या नशिबी आलं. त्यावेळी मी पाच वर्षांची होते आणि माझी सहनशक्ती अगदी बेताची – त्या वयाला अनुरूप होती. त्यामुळे मुलं वाचू लागली की मी लगेच एखाद्या शब्दाचा योग्य उच्चार मोठ्याने सांगत असे. वर्गात सगळीजणं 'सर्वज्ञ' म्हणून माझी टिंगल करीत.

आमच्या पाठ्यपुस्तकांची नियमितपणे समीक्षा केली जात होती की नाही किंवा त्यासंबंधीच्या सूचना पाळल्या जात होत्या की नाही याची शंकाच येत असे. 'व्हिक्टोरियन रीडर्स' या पाठ्यपुस्तकमालेतील दुसरं पुस्तक जे १९८९ मध्ये तितक्याच चुकांसकट पुनर्मुद्रित केलं गेलं, ते म्हणजे वेडगळपणाचा नमुनाच होता. मुलांसाठी इतक्या मूर्खपणाच्या गोष्टी, आजवर संग्रहित झाल्या नसतील. त्याची सुरुवात 'जुनं गाणं' नावाच्या कवितेने झाली होती. कविता म्हणण्याजोगं त्यात काही होतं की नाही कोण जाणे!

पऱ्यांच्या प्रदेशात तुम्ही हिंडता का ?
लोक म्हणतात, त्या आता नाहीत.
त्या आपल्यापासून खूप दूर तरी, नाहीतर
खूप जवळ असतात.





अनुक्रमणिका

त्या मृत नाहीत वा हद्दपारही

केलेल्या नाहीत ......वगैरे वगैरे

(रेनॉल्डस्च्या 'The age of innocence' ची भ्रष्ट, धूसर नक्कल असावी बहुधा) सूर्यप्रकाशाच्या रिबिनींपासून इंद्रधनुष्य तयार करणाऱ्या पऱ्या किंवा कुत्र्याच्या छत्र्यांचा आपल्या छत्र्यांसारखा उपयोग करणाऱ्या वनदेवता मला कधीच आकर्षक वाटल्या नाहीत, आवडल्या नाहीत. छोट्याशा कोंबडीच्या पिलाचं वातकुक्कुट कसं झालं याची गोष्ट अथवा आपल्या वडिलांच्या पोत्यात कोंबडीऐवजी दगड सापडला म्हणून होरपळली जाणारी छोटी कोल्ह्याची पिल्लं व त्यांची गोष्ट ऐकून मला चीड येई. बालमानसशास्त्र आणि शिक्षणशास्त्र यांच्या दृष्टीने निष्पाप बालकांच्या वयोगटाला योग्य म्हणून अशा ज्या गोष्टी सांगितल्या जात होत्या त्या वास्तवाशी, निसर्गाशी मिळत्याजुळत्या नसून उलट अधिक क्रूर होत्या. जगाच्या निर्दयी वृत्तीची ओळख, जीवघेण्या स्पर्धाप्रवृत्तीची ओळख एका म्हातारीच्या गोष्टीतून करून दिलेली होती –

"मग मांजर उंदराला मारू लागते.

उंदीर दोर कुरतडू लागतो.

दोर खाटिकाला बांधून टांगू लागतो.

खाटीक बैलाचा जीव घेऊ लागतो.

बैल पाणी पिऊ लागतो

पाणी अग्नि शांत करू लागते.

अग्नि काठी जाळू लागतो.

काठी कुत्र्याला मारू लागते.

कुत्रा डुकराला चावू लागतो.

डुक्कर कुंपणावरून उड्या मारते.

शेवटी ती म्हातारी त्या रात्री घरी येते."

अशासारख्या गोष्टी म्हणजे विद्यार्थ्यांची मस्करी करण्यासारखेच होते.

घरी मात्र मी मोठ्यांसाठी असणारी पुस्तके वाचीत होते. ती माझ्या वयाला न पेलवणारी असली तरी निदान मला बिघडवणारी तरी नव्हती. मी आठ वर्षांची होण्यापूर्वीच माझ्या आईवडिलांच्या पुस्तकांच्या छोट्या कपाटातील सर्व पुस्तके वाचण्याचा प्रयत्न मी केला होता, त्यामध्ये निगली फार्सन यांचं 'The way of a transgressor,' O' Flaherty यांचं 'Famine,' Alan Moorehead यांचं 'The end of Africa,' 'Through The Forbidden Land' हे गुस्ताव क्रिस्त यांचं आणि 'The Counters of Rudolstadt' हे George Sand यांचं पुस्तक अशी विविध पुस्तके होती. जॉर्ज सॅन्ड यांच्या पुस्तकावरून माझ्या आईने माझं हे नाव ठेवलं होतं. शेक्सपियरच्या समग्र वाङ्मयाचे खंड लाल कापडी-बांधणीचे होते. त्यावर अर्धवट

बीभत्सरीतीने कोरलेली चित्रे होती. एक वर्षी मी त्यांचाही अर्थ लावायचा प्रयत्न केला, कारण 'गॉतिए'च्या 'Mademoiselle de Maupin' चे इंग्लिश भाषांतर वाचून माझ्यामध्ये वैषयिक भावना चाळवली गेली होती. 'The Pheonix & the Turtle' या पुस्तकाच्या 'शीर्षकात' असले, तरी त्यात असे कोणतेही सरपटणारे प्राणी नाहीत हे समजण्यापूर्वीच ते पुस्तक माझे पाठ झाले होते.

आतापर्यंत माझ्या कपाळावर अनाकलनीयतेची एक स्थायी स्वरूपाची आठी दिसायला लागली होती. त्यामुळे घरातील वडीलधाऱ्यांनी आता माझ्यासाठी योग्य अशी पुस्तके शोधायला सुरुवात केली होती. शिवाय ती शोधताना एक निकष असा होता की, ती पुस्तके मी एकाच दिवसात वाचून संपवू शकणार नाही.

मी सात वर्षांची झाल्यावर माझ्या आजीने मला 'Alice in wonderland' आणि 'The water Babies' ही पुस्तके दिली. मागच्या खेपेला मी आईकडे गेले तेव्हा त्या जुन्या पुस्तकांना हुंगत बसले होते. ती पुस्तके लाल रंगाच्या मोरोक्को चामड्याच्या बांधणीची होती आणि त्या बांधणीचा तो उंची वास अजूनही कायम होता. 'वॉटर बेबीज' या पुस्तकाचा तो स्पर्श मला सुखावत होता. पण त्या पुस्तकाची तेवढीच गोष्ट माझ्या आवडीची होती. पुस्तकाचा शेवट असा होता –

''मग चिमुकल्यांनो, आपण या नीतिकथेतून काय शिकायचे (इथे प्रश्नचिन्ह नव्हते)

आपण सदतीस वा एकोणचाळीस गोष्टी शिकतो. त्या गोष्टी कोणत्या याची मला नेमकी खात्री नाही. पण एक गोष्ट तरी आपण नक्कीच शिकू शकतो. ती म्हणजे सरड्यासारखे, पालीसारखे प्राणी बघितल्यावर त्यांच्यावर दगड मारायचे नाहीत; आकडीने त्यांना पकडायचे नाही किंवा काटेरी पाठी असणाऱ्या माशांच्या बरोबरीने त्यांना 'फिशपॉन्ड' मध्ये सोडायचं नाही. नाहीतर ते काटेरी मासे त्यांना टोचतील आणि ते प्राणी त्या 'फिशपॉन्ड' च्या बाहेर उड्या मारतील, कुणाच्या तरी कंपासबॉक्समध्ये बसतील आणि ते सारं त्रासदायकच होईल. कारण हे असे जलचर प्राणी म्हणजे दुसरे तिसरे काही नसून जलबाळे असतात आणि ती अगदी मूर्ख असतात, घाणेरडी असतात, शिकवलेलं काही करत नाहीत स्वच्छता पाळत नाहीत .....'' वगैरे वगैरे.

आता माझ्यासारख्या वयाच्या मानाने थोराड असणाऱ्या, जिने हे सरपटणारे, जलचर प्राणी किंवा काटेरी पाठी असणारे मासे किंवा ती 'फिशपॉन्डस्' यातलं काहीच पाहिलेलं नाही अशा मुलीला या सगळ्या वर्णनाचा काय उपयोग ? ज्यावेळी 'जलचर प्राणी' असा शब्द असणारा शब्दकोश मी शोधला, तेव्हा माझी खात्री पटली की, केंब्रिज विद्यापीठातले आधुनिक इतिहासाचे प्रोफसर हे तत्त्वभ्रष्ट, असत्यवादी आहेत. त्यावेळेपासून कल्पित साहित्यावरचा माझा विश्वास जो उडाला तो आजतागायत त्या साहित्याबद्दल माझ्या मनात अविश्वासच आहे.

परीराज्यातील ॲलिस (Alice in Wonderland) हे मात्र वेगळंच प्रकरण होतं. 'कॅरल' यांचं गद्यलेखन अतिशय आकर्षक, नेमकं होतं. याउलट किंग्सले यांचं गद्यलेखन विरूप, खोटं आणि भयाण होतं. 'ॲलिस' हे पुस्तक असं होतं की जे वाचताना पुढे काय होणार याची मी यत्किंचितदेखील फिकीर केली नाही. कारण वाचतावाचता गोष्टी कशा घडत जात आहेत ते अनुभवण्यातच मी गुंगले होते. त्या पुस्तकातल्याप्रमाणेच आपण विचार करावा, बोलावं असं मला वाटत होतं. मी त्यातला एखादा शब्द उचलीत असे आणि दिवसभर त्या शब्दाचा सारखा उपयोग करीत असे. त्यामुळे तो शब्द आपलासा होऊन जाई. Fetch, directly, melancholy, Coaxing, capital अशा कितीक शब्दांशी मी याप्रकारे जवळीक साधली. लुई कॅरलने जरी आपल्या गोष्टीतून नीतिबोध केलेला असला तरीही 'ॲलिस' अतिशय उत्कंठावर्धक, शहाणपणाचे धडे देणारे तरीही चांगलं पुस्तक होतं हे नि:संशय! 'ॲलिस' ला समजून घ्यायला तुम्हाला तिच्यापेक्षाही अधिक समजूतदार, शहाणं आणि प्रेमळ बनणं भाग होतं.

ग्रिम बंधू, हॅन्स ॲन्डरसन वा इतरांच्या अशाच प्रकारच्या लेखनात 'ॲलिस'च्या जवळपास जाईल एवढादेखील बौध्दिक दर्जा आढळत नव्हता. मी एनिड ब्लायटन किंवा बिॲट्रिक्स पॉटर यांची पुस्तके वाचली नाहीत, कारण मला चांगली जाडजूड आणि वास्तव, तपशीलयुक्त पुस्तकेच आवडत. माझे वडील ज्या वृत्तपत्रात काम करीत त्यांच्याकडून मिळालेल्या खास शब्दकोशातून आणि विश्वकोशातून मी एका शब्दाचे अनेक समानार्थी शब्द शोधून काढत असे. ते बहुधा कुणालाच माहीत नसत. त्यापूर्वी माझ्या मनात अनेक शब्दांबद्दल गोंधळ आणि शब्दार्थाबद्दल गैरसमज होते. मला वाटतं अनेक पाहिलेल्या पण न ऐकलेल्या शब्दांचा वापर करणं हे हुषार ऑस्ट्रेलियन मुलांचं वैशिष्ट्य आहे. माझा दत्तकपुत्र वयाच्या २७ व्या वर्षी देखील, 'unwieldly' आणि 'integral' असे म्हणतो.

मी खूप पुस्तकं वाचली, काही पुन:पुन्हा वाचली पण म्हणून त्यापासून मला आनंद मिळाला असं समजणं चुकीचं ठरेल. मी काही आनंदासाठी वाचतच नव्हते. मला वाचनाचं व्यसन जडलं होतं. त्या हावरटपणापायी, तलफेपायी मी वाचत होते. डोक्यात एकामागोमाग एक पुस्तकं भरून ठेवणं एवढंच मला समजत होतं. पानं खाणारी अळी भुकेचा विचार न करता एकामागोमाग एक पानं कुरतडत राहाते तसं माझं झालं होतं. माझं वाचन हा पर्यायी उपक्रम होता. जेव्हा इतर मुलं खेळत असत, व्यायाम करीत असत, एखाद्या विशिष्ट क्रीडाप्रकाराचा सराव करीत असत किंवा सोबत्यांबरोबर हुंदडत असत तेव्हा मी वाचत असे. त्याशिवाय माझ्यापुढे दुसरा पर्याय नव्हता. नाहीतर शरीर, मन थकून जाईल एवढा सुस्तपणा, कंटाळा माझ्या अंगी होताच. वडिलांबरोबर संवादच नव्हता. आईबरोबरचं बोलणं म्हणजे हिशेबीपणाने केलेल्या अतार्किक विधानांचा मारा सहन करणं; माझी भावंडं माझ्यापेक्षा बरीच लहान होती. माझी पुस्तकेच माझी काल्पनिक सोबती होती, माझ्याशी संभाषण करीत होती.

१९४९ च्या नाताळात आईने मला 'डेव्हिड कॉपरफील्ड' ची एक सुंदर प्रत भेट दिली. त्यामध्ये 'फिझ' ची मूळ रेखाटने होती. एखाद्या बागेत वाढलेल्या 'तणा' प्रमाणे मला डेव्हिड कॉपरफिल्ड वाटलंच पण त्याच्यासारखी मीपण स्टीअरफोर्थच्या प्रेमात पडले. डेव्हिडचा हा वाईट दुष्ट देवदूत, त्याचा मधुर आवाज, त्याची सहज आदब आणि गोड चेहरा मला फार आवडला. श्री. मेल यांच्याशी स्टीअरफोर्थची जी गाठभेट झाली त्याचं रेखाटन हे माझ्या या प्रेमाला कारणीभूत होतं. मी त्यावेळी अकरा वर्षांची होते. माझ्या मनात त्यावेळी उठलेल्या भावनाकल्लोळानेच माझ्या वाढत्या वयातील उत्कट भावनांची मला ओळख करून दिली. स्टीअरफोर्थने एमिलीला शीलभ्रष्ट करणे, बायरनच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे असे काम करीत असताना स्वत:चा तिरस्कार करणे, यर्माउथच्या वाळूत बुडून जाणे, शाळेत तो जसा हाताच्या घडीत डोकं खुपसून बसत असे तसाच आताही आपल्या बाहूंवर डोकं विसावून पडलेला तो डेव्हिडला दिसणे, या साऱ्या वर्णनांनी माझ्या मनावर फार मोठा परिणाम केला होता. त्यावेळच्या, तपकिरी रंगाच्या कापडी बांधणीत बांधलेली, त्याच्या बाजूवर रुपेरी अक्षरे कोरलेली, अशा त्या साध्यासुध्या ऑक्सफर्ड प्रतीने माझ्यावर मोठाच प्रभाव पाडला होता. त्यातील श्री. रॉंगचा शोध घेण्यात मी हयात वेचली. दोन वर्षे बायरनवर केलेले पदव्युत्तर पातळीचे संशोधन आणि रॉचेस्टरबद्दलचे दीर्घकाल टिकलेले वेड यांचीसुध्दा माझा मि. रॉंगचा शोध पुरा करण्यास मदत झाली नाही. असं म्हणता येईल की स्टीअरफोर्थच्या मनातील कल्पनांनी मला वाईट गोष्टी करण्यास भाग पाडले.

वाचनातलं खरं सुख मला अजून मिळायचंच आहे. ते मिळण्यासाठी शिक्षणाने आलेली ग्रहणक्षमता, संवेदनाशीलता वाचकाच्या ठिकाणी असली पाहिजे. तसंच पुस्तकही दर्जेदार असलं पाहिजे. मी कोणताही भेदभाव न करता, छापील अक्षरे जणू बकाबक रिचवत असते. त्यामुळे चांगलं आणि वाईट मी एकाच चवीनं वाचते. मी एवढ्या वेगानं, एवढ्या मोठ्या प्रमाणावर वाचते आणि, त्यामुळेच मी शाळेच्या ग्रंथालयातून 'वजनदार' च पुस्तकं घरी आणीत असे. त्यातच एकदा मी 'ब्लेक हाऊस' ची विस्तृत पण अतिशय वाईट पद्धतीने तयार केलेली प्रत आणली. थोड्याशा पूर्वग्रहदूषित मनानेच मी ती वाचायला लागले.

" Michaelvas Term Lately over - - - - - - - "

पहिल्या परिच्छेदाचं वाचन पूर्ण होईतो मी वेगळ्याच तऱ्हेने वाचू लागले होते. त्यातील शब्दांवर मी झुलत होते, त्यातील ऐतिहासिक कमानीमधून मी उड्या मारीत होते; बहिरी ससाण्याप्रमाणे माझी दृष्टी त्यातील उत्तुंग आणि सूक्ष्म आशयाकडे एकदमच भिरभिरत होती. त्या गद्याला एक ताल होता. त्याने माझ्यावर परिणाम केला होता. माझ्या लक्षात आलं की माझी अशा वाचनाची भूक कितीही पुरवली तरी मला काही अपाय होणार नाही. आता आयुष्याच्या अंतापर्यंत मी हे पुस्तक (अशी पुस्तके) वाचत राहीन. पुस्तकांबद्दल तिटकाराच उत्पन्न होईल

अशी शाळेच्या वर्गातली शिकवण आणि माझं स्वत:चं त्याबाबतीतलं विकृत वागणं या दोन्हीतून डिकन्सनं माझी मुक्तता केली. शेवटी मला खऱ्या सुखाची जाणीव झाली.

## जर्मेन ग्रियर

जर्मन ग्रियर ह्या अतिशय उंच, भुऱ्या केसांच्या ५५ वर्षांच्या ऑस्ट्रेलियन लेखिका आहेत. 'स्टम्प क्रॉस बुक्स' नावाची एक संस्था त्या चालवतात. या संस्थेतर्फे स्त्रियांनी लिहिलेल्या अभ्यासपूर्ण दुर्मिळ पुस्तकांच्या आवृत्त्या व तशीच नवी पुस्तकं प्रकाशित केली जातात. केंब्रिजमधील न्यूहॅम कॉलेजमध्ये त्या शिकवतात. 'परिवर्तन' – The Change या नावाचे, 'स्त्रिया व त्यांचे वार्धक्य' या विषयीचे पुस्तक त्यांनी नुकतेच पुरे केले आहे. आपल्या बागेत आठवड्यातून चाळीस तास काम करणे त्यांना आवडते. स्त्रीमुक्तिवादी विचारांना पाठिंबा देणाऱ्या, विचारांना उचलून धरणारं लेखन करणाऱ्या या लेखिका आहेत. स्त्रीमुक्ती चळवळीत त्यांचं कार्य लक्षणीय आहे.

---

इंग्लंडमधील वूर्स्टरशायर या ठिकाणी राहणाऱ्या जॉन बास्करव्हिल याने फर्निचरला वॉर्निश–पॉलिश करण्याचा व्यवसाय करून भरपूर संपत्ती जमा केली. त्याचा व्यवसाय बर्मिंगहॅम येथे होता. मुद्रणकला अधिकाधिक निर्दोष व्हावी यासाठी त्याने आपले सारे आयुष्य खर्च केले. विशेषकरून अक्षर – रेखाटनांमध्ये अक्षरांचे वळण सुबक असावे यासाठी त्याने प्रयत्न केले. एखाद्या अक्षराच्या वळणाचा ठसा आपल्या मनाप्रमाणे होईपर्यंत तो त्यावर शेकडो पौंड खर्च करी. मुद्रणातील नवनवीन गोष्टींबाबत संशोधन करण्यासाठी, छपाईची शाई तयार करण्यासाठी त्याने हजारो पौंड खर्च केले असे सांगितले जाते. त्यातून त्याने वेगवेगळे ठसे, साचे व इतर छपाई साधनांची निर्मिती केली. त्याच्या मुद्रणाची एक विशिष्ट शैलीच तयार झाली. आणि ती शैली त्याच्याच नावाने ओळखू जाऊ लागली. ही शैली अतिशय सुरेख वळणाची आहे. इतर शैलींमधील सर्व चांगली वैशिष्ट्ये त्याच्या शैलीत एकवटलेली आहेत. 'इटॅलिक' पद्धतीच्या मुद्रणात त्याचा हात धरणारा कोणी नाही.

त्याने आपल्या गाडीच्या सर्व बाजूंना आपल्या व्यवसायाची जाहिरात रंगवून घेतली होती. आयुष्यात त्याने व्यावसायिक मूल्यांशी तडजोडी नाकारल्या आणि म्हणून त्याला लोक विक्षिप्त म्हणत. त्याच्या मृत्यूनंतरही एक चमत्कारिक गोष्ट घडली. १७७५ मध्ये त्याच्या मृत्यूनंतर त्याचे दफन केले गेले आणि पुन्हा १८२१ मध्येही केले गेले. काही कारणाने अचानक त्याच्या दफनजागी हलवाहलवी केली गेली. त्याची शवपेटिका त्यामुळे उघडली गेली. त्यावेळी जवळजवळ पन्नास वर्षांनंतरही त्याचा मृतदेह त्याच अवस्थेत संपूर्ण आहे असे आढळून आले. त्याच्या प्रेतावरील कफन तसेच आणि पांढरे शुभ्र होते आणि त्याच्या मृत शरीरावरील फुले कोमेजली होती पण संपूर्ण होती. त्यांच्या पाकळ्या पडून गेल्या नव्हत्या.

---



अनुक्रमणिका

# मिशेल तुर्निए – फ्रायडे

## फ्रायडे

**– डॉ. मंगला सरदेशपांडे**

तीस तोफांचे एक आरमारी जहाज. ३१ जानेवारी १७०९ रोजी, त्या जहाजावरून आलेले सहा हत्यारबंद नाविक आणि त्यांचा अधिकारी एका छोट्या होडीत बसून मुलुखगिरी करण्यास निघाले. मास– आ– तिअेरा या बेटाच्या किनाऱ्याच्या रोखाने, ते निघाले होते. चिली या देशातील सानटिओगा नावाचे जे शहर आहे, त्या शहराच्या पश्चिमेला सुमारे सहाशे किलोमीटर अंतरावर वॉन फरनानडिन या नावाने ओळखला जाणारा बेटांचा समूह आहे. या समूहातले सर्वात मोठे बेट मास– आ– तिअेरा. या बेटाच्या किनाऱ्यावरून, बकरीचे कातडी घातलेली, एक केसाळ व्यक्ती आपणाला हात हालवून खुणावीत असल्याचे पाहून हे होडीतले लोक आश्चर्यचकित झाले. त्या बेटावर उतरण्यासाठी चांगली जागा कोठची असे बोटीवरच्या या हत्यारबंद लोकांनी त्या परक्या व्यक्तीस विचारले. या प्रश्नास उत्तर म्हणून, त्या माणसाने एक जागा दाखविली आणि या लोकांचे स्वागत करण्यासाठी, त्याने खडकावरून खाली उडी घेतली व तो किनाऱ्यावर आला.

या माणसाचे नाव होते, अलेक्झांडर सेलक्रेग. समुद्रावर मुशाफरी करताना तो सेलकर्क या नावाने ओळखला जाई. त्या काळी, अशी प्रथा होती की,जो कोणी जहाजावर चाकरी पत्करी, त्याला आपले आडनांव बदलावे लागे. स्कॉटलंडच्या किनाऱ्यावर लारगो नावाचे एक छोटे बंदर आहे. हा मनुष्य त्या लारगो या छोट्या गावाचा मूळ रहिवासी. इ. स. १७०३च्या वसंतऋतूत, त्याने आपले हे मूळ गाव सोडले व तो लंडनमध्ये दाखल झाला. या ठिकाणी आल्यानंतर त्याने, फाईव्ह पोर्टस् (पाच बंदरे) या नावाच्या जहाजावर नोकरी पत्करली. फाईव्ह पोर्टस् हे जहाज नव्वद टनी व सोळा तोफांचे होते. या जहाजावर एकंदर त्रेसष्ट जण होते. सेंट जॉर्ज या दुसऱ्या एका जहाजाबरोबर, पॅसिफिक महासागरात, चाचेगिरी करण्याच्या उद्देशाने या जहाजाने "इंग्लंडचा" किनारा सोडला होता. सोने व चांदी यांनी भरलेले एक स्पॅनिश जहाज होते. त्याचा पाठलाग, ही इंग्लिश जहाजे करीत होती. सेलकर्क हा त्यावेळी सत्तावीस वर्षाचा होता. तसा तो साधाभोळा अजिबात नव्हता; उलट चांगलाच बनेल व पार पोचलेला खलाशी होता. एकदा याच प्रकारची मुलुखगिरी करताना, त्याला विरुद्ध बाजूच्या चाच्यांनी कैद करून, सॅन्टो डोमिनगचे, बेटावरील चांच्याना विकले होते. तेथे तो एकंदर तीन वर्षे होता. शिकार करून, रानटी गाई– बैलांची कत्तल करून त्याने या

काळात आपली गुजराण केली. गाई- बैलांच्या स्मोक्ड (smoked) मासाला चांगली किंमत येत असल्याकारणाने, सेलकर्कला चांगलाच फायदा झाला होता. त्यांच्या आडनांवाचा अर्थ आहे 'दगडी- डोक्याचा'. हे नाव त्याच्या स्वभावाबद्दल बरचसे सांगून जाते.

इंग्लंडचा किनारा सोडता सोडताच सेलकर्क यांचे 'फाईव्ह पोर्टस' या जहाजाचे कप्तान लेफ्टनंट स्ट्राडलिंग यांच्याबरोबरच्या भांडणास सुरुवात झाली. दिवस गेले तसे हे वितुष्ट विकोपास जाऊ लागले. या दोन्ही जहाजांची- फाईव्ह पोर्टस् व सेंट- जॉर्ज सफर अत्यंत निराशाजनक झाल्या कारणाने, हे वितुष्ट अधिकच उग्र बनले. फेब्रुवारी महिन्यात, मास- आ- तिअेरा या बेटाजवळ, या दोन्ही जहाजांनी नांगर टाकला. जहाजे थांबली होती म्हणून सेलकर्क यांनी या बेटाचा शोध घेतला. या बेटावर काय सुविधा आहेत त्याची पहाणी केली. हे सारे करताना त्याच्या मनात एक विशिष्ट हेतू होता. या ठिकाणी आणखी एक गोष्ट नमूद करणे आवश्यक आहे. सेलकर्क हा एक चांगलाच धट्टाकट्टा व ताकदवान खलाशी होता. बनेल असला तरी एरवी सीधासाधा. शकुन- अपशकुन यावर त्याची श्रद्धा होती. त्याला एक स्वप्न पडले. त्या स्वप्नात, फाईव्ह पोर्टस् आणि त्यावरची माणसे यांचे भविष्य अत्यंत खडतर आहे व ते किती भयाणपणे खडतर आहे याची दृश्ये त्याने पाहिली होती. हे असे असले तरी या आधी 'रॉबिनसन क्रुसो'च्या या बेटाला दिलेल्या पहिल्या भेटीत कोणाच्याही मनाला हेलावणारा काही भाग आहे. या बेटावर मनुष्य वस्ती नसली, तरी मनुष्यवस्तीस अगदी योग्य असेच ते बेट होते. खरे म्हणजे त्या बेटावर पूर्वीही एका माणसाने वास्तव्य केले होते. तो एक Mosquito मॉसक्विटो इंडियन होता. इ. स. १६८० साली एका जहाजाने या माणसाला या बेटावर सोडून दिले होते. दुसऱ्या एका जहाजाने, तीन वर्षे, दोन महिने आणि अकरा दिवसांनी या मॉसक्विटो इंडियनची मुक्तता केली; त्यावेळी त्याची तब्येत अगदी ठणठणीत होती. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास,'फ्रायडे' हा रॉबिनसन क्रुसोच्या अगोदर वीस वर्षे या बेटावर वस्ती करून होता. रॉबिनसन क्रुसो आणि फ्रायडे यांची भेट ही वाङ्मयामुळे अजरामर झाली आहे. या भेटीस आपणास प्रस्तुत असलेला सेलकर्क – व तो इंडियन हे मुकले होते. डॅनिएल डिफो यांच्या प्रतिमेने ही नशिबाने केलेली चूक दुरुस्त केली होती.

सप्टेंबर महिन्यात सेलकर्क आणि स्ट्रडलिंग यांच्यातील बेबनाव शिगेला पोचला. फाईव्ह पोर्टस्‌ने पुन्हा एकदा मास- आ- टिआरा या बंदरात नांगर टाकला. परंतु हे बेट सोडताना, सेलकर्क या स्कॉट खलाश्याला न घेताच बोट निघाली. बंदूक, थोडासा दारू- गोळा, त्याच्या मालकीची भली मोठी पेटी आणि बायबल एवढे साहित्य त्याला देऊन, त्याला या बेटाच्या किनाऱ्यावर सोडण्यात आले. शेवटच्या क्षणी, आपण घेतलेला निर्णय हा मूर्खपणाचा आहे याची जाणीव सेलकर्कला झाली. मूळ जहाजातून, सेलकर्कना देण्यात आलेले साहित्य घेऊन आलेली छोटी होडी, ही किनाऱ्यावरच्या एका लाकडी खुंटाला

बांधलेली होती. दोर सोडून ही होडी पाण्यात मार्गक्रमण करू लागल्याबरोबर सेलकर्क घाबरे- घुबरे झाले. स्ट्रडलिंग यांनी आपणास बोटीवर परत घ्यावे अशी विनंती केली. कप्तानाने ही विनंती मान्य केली, पण त्यासाठी काही अटी घातल्या. बंडखोरीच्या आरोपावरून त्याना दंडा- बेडीची शिक्षा देण्यात येणार होती. तसेच हे जहाज या नंतर ज्या बंदरात जाईल व नांगर टाकील त्या ठिकाणच्या इंग्लिश अधिकाऱ्यांच्या स्वाधीन सेलकर्क यांना करण्यात येईल. या दोन्ही अटी सेलकर्क याना अर्थातच मान्य नव्हत्या. सेलकर्क यांना आपल्या नशिबावर हवाला ठेवून, आलेल्या प्रसंगाला सामोरे जाणे भाग होते. त्यांनी घेतलेला निर्णय हा एका अर्थी चांगलीच गोष्ट ठरली; कारण त्याना स्वप्नात जी पूर्वसूचना मिळाली होती, त्यानुसार थोड्याच दिवसात फाईव्ह पोर्टस्, हे जहाज स्पॅनिश आरमाराच्या तावडीत सापडले. जहाजावरच्या खलाश्यांना, जागच्या जागीच ठार करण्यात आले. राहिलेल्यांची गुलाम म्हणून विक्री झाली. सेलकर्क यांना हे सारे अर्थातच अनेक दिवसानंतर समजले.

सेलकर्कना काही दिवसानी असे आढळून आले की मास- आ- टिआरा हे राहण्याच्या दृष्टीने उत्तम स्थान होते. येथील हवामान समशीतोष्ण होते. फार थंडी नाही व उष्माही नाही. या बेटावर जे काही थोडे रहिवाशी होते. ते मात्र अत्यंत नीच होते, या बेटाजवळ काही जहाजे जरूर थांबत. पिण्यासाठी पाणी भरून घेत, कोबी, इतर भाजीपाला व मास खरेदी करीत. अशा रीतीने या वस्तूंचा जहाजावर जो साठा असे तो पूर्ववत करीत. एकतर ही सर्व जहाजे स्पॅनिश असत. त्यांचे स्पॅनिश असणे एकवेळ परवडले असते, पण ही सर्व जहाजे चाचेगिरी करण्याच्या उद्देशाने स्वदेश सोडून निघालेली असत. हीच मास- आ- टिआरावरील रहिवाशांच्या दृष्टीने अत्यंत वाईट गोष्ट होती. आपला हेतू जणू स्पष्ट करण्यासाठी या जहाजावरून जो स्पेनचा झेंडा फडकाविण्यात येई, त्यावर मानवी कवटी, क्रॉस केलेली हाडे, यांचे चित्र मोठ्या दिमाखाने काढण्यात येत असे. खरे म्हणजे सेलकर्क हे जीवानिशीच जायचे. तसे प्रसंग अनेक वेळा आले. नशीब थोर म्हणून वाचले. दोन गोष्टींनी त्याना सदैव हात दिला. एक त्यांच्या पायात चांगलाच जोर होता. शिवाय त्या बेटाची त्याना खडान्‌खडा माहिती होती. असे होता होता चार वर्षे, चार महिने गेले. मग एक इंग्लिश जहाज त्या बेटाजवळ आले.

'ड्यूक' या नावाच्या एका जहाजाबरोबर, 'डचेस' या नावाचे आणखी एक जहाज होते. ही दोन्ही जहाजे मास- आ- टिअेरा या बेटाजवळ बरेच दिवस मुक्काम करून होती. या काळात त्यानी स्पॅनिश आणि फ्रेंच जहाजे काबीज करण्याच्या आपल्या उद्योगाला पुन्हा एकदा सुरुवात केली. या कामगिरीचे नेतृत्व कॅप्टन वुडस रॉजर्स यांच्याकडे होते. पुढे त्यांनी आपल्या आठवणीही लिहिल्या. त्यात आपली व रॉबिनसन क्रुसो (सेलकर्क) यांची भेट झाल्याचे नमूद केलेले आहे. सेलकर्क यांनी आपण एक उत्तम नावाडी आहोत हे सिद्ध

करून दिले. मास– आ– टिअेरा या बेटावर दारू व तंबाखू या दोन्ही गोष्टी मिळत नसल्याकारणाने सेलकर्क यांना दारू व तंबाखू या दोन्ही गोष्टींबद्दल आत्मीयता नव्हती. कधीतरी एखादे जहाज काबिज करण्यात येई; आणि मग ते कामगिरीवर गेलेल्या जहाजात सामील करून घेण्यात येत असे. या काबिज केलेल्या जहाजावर काम करण्यासाठी कप्तान आणि इतर नौसैनिकांची, खलाश्यांची जरुरी भासे, व त्यांच्यासाठी मग शोधाशोध चालू होई. या सर्वाचा परिणाम, काबिज केलेल्या एका जहाजावरच्या प्रमुखपदी सेलकर्क यांची नेमणूक करण्यात आली. प्रमुखपदाची सूत्रे हाती घेतल्यानंतर या जहाजाचे पहिले नाव बदलून त्याचे नाव इन फ्रीझ (वाढ) असे ठेवले. या जहाजाचा कप्तान म्हणून त्यांनी चांगलीच मर्दुमकी गाजविली. इक्वेडॉर या देशातले, गुआयाक्वील (Guyaquil) हे स्पॅनिश शहर, काबीज करण्याच्या कामात, त्यांनी बुद्धी व शौर्य या दोन्ही गुणांचे प्रदर्शन केले होते. चौदा ऑक्टोबर १७११ पर्यंत सेलकर्क यांना इंग्लंडच्या भूमीवर पाय ठेवता आला नाही. बरोबर आठ वर्षे, एक महिना आणि तीन दिवस मायदेशाबाहेर घालविल्यानंतर सेलकर्क मायदेशी परतले होते.

त्यांच्या मायदेशी परतण्याने चांगलीच खळबळ निर्माण झाली. गमतीचा भाग असा आहे की, या अशा प्रकारची साहसे, व त्याबद्दलच्या कथा या दोन्ही गोष्टींची, तत्कालिन इंग्लंडमध्ये वानवा नव्हती. सेलकर्क यांच्या पूर्वी अनेक बुडालेल्या जहाजांवरचे खलाशी, नाविक अधिकारी इत्यादी लोक, अनेक वर्षे एखाद्या सांदिकोनातल्या बेटावर जीवनाचा काही काळ घालविल्यानंतर परत येत. मी ज्याचा उल्लेख यापूर्वी केला आहे, तो मॉसक्विटो इंडियन हा त्यापैकी एक होता. परंतु सेलकर्क यांच्या हकीकतीने जेवढी खळबळ माजविली तेवढी खळबळ यापूर्वी कोठच्याही कथेने माजविली नव्हती. या ठिकाणी एक मुद्दा खास करून नमूद करून, त्यावर भर देणे जरुरी आहे. एका नव्या 'मिथचे' बीज स्वीकारण्यासाठी, त्याची मशागत करण्यासाठी भूमी अगोदरच तयार झाली होती. या संबंधी मी विवेचनाच्या ओघात, या नंतर आणखी काही सांगणार आहे. या नंतरच्या कालौघात, सेलकर्क हे एक उल्लेखनीय व्यक्ती झाले. अनेक लोक त्यांना भेटण्यासाठी गर्दी करू लागले; आणि त्यातले काही त्यांना अनेक प्रकारचे, अनेक प्रश्न विचारीत. त्यातले जे कोणी अत्यंत विचक्षण होते, ते सेलकर्क यांच्या अत्यंत भयानक एकांतवासाने ज्या काही खुणा अपरिहार्यपणे मागे ठेवल्या असतील, त्याचा शोध घेत. सर रिचर्ड स्टिला यांनी आपल्या संपादनाखाली प्रसिद्ध होणाऱ्या 'इंग्लिशमन' मध्ये असे लिहिले होते की.

"मी ज्या माणसाबद्दल बोलतो आहे, त्याचे नाव आहे अलेक्सांडर सेलकर्क. यांचे नाव जे कोणी चौकस आहेत त्याना परिचित आहे. वॉन फरनाडिन या बेटावर चार वर्षे, चार महिने, एकांतवासात घालविल्याकारणाने त्याला प्रसिद्धी मिळाली आणि त्याचे नाव सुपरिचित झाले. १७११ साली इंग्लंडमध्ये त्याचे पुनरागमन झाल्यानंतर या माणसाबरोबर



अनुक्रमणिका

वारंवार संभाषण करण्याचा आनंद मला मिळालेला आहे. मी त्याला प्रथम भेटलो तेव्हा त्याची एकंदर वागणूक, हातवारे, हालचाली या सर्वात आनंद तर दिसत होता, त्याची नजरही चांगली गहिरी होती व गंभीरही होती. त्या नजरेतून त्याला वाटणारा आनंद व्यक्त होत होता. मला असेही वाटले की या गृहस्थाला अन्य कोणाचाही सहवास अनेक दिवस मिळालेला नव्हता याचा मागमूसही त्याच्या वागण्यात नव्हता, तो आपल्या विचारात गढून गेला असल्याकारणाने, आपल्या अवतीभोवती ज्या सर्वसामान्य गोष्टी होत्या, त्याबद्दल तो काहीही पर्वा करीत नाही असे मला वाटले. त्याला त्या बेटावरून घेऊन येणारे जहाज त्या बेटाला जेव्हा लागले, तेव्हा त्याने त्या जहाजाचे स्वागत कमालीच्या निरिच्छेने केले होते. त्या जहाजावरील माणसांमुळे आपली त्या बेटावरून सुटका करून घेण्याची संधी आहे याच्याशी त्याला कसलेच सोयरसुतक नव्हते. त्याजबरोबर त्या जहाजावरून आलेल्या लोकांना मदत करण्यासाठी आणि ताजेतवाने करून सोडण्यासाठी आपणाला संधी मिळाली याबद्दल मात्र त्या गृहस्थाला फारच समाधान वाटत होते. या जगात आपण परतलो याबद्दल हा गृहस्थ वारंवार दु:ख व्यक्त करतो. तो म्हणाला या जगातील सर्व मौजमजेला त्याच्या एकांतवासातल्या त्या शांततेची पुनर्स्थापना करून देता येणार नाही.''

या बेटावरून परतल्यानंतर सेलकर्क यांच्या नशिबाने पलटी खाल्ली आहे, असा अनुभव त्यांना येईल. त्यांच्या बदललेल्या नशिबामुळे त्यांच्या या पुढच्या आयुष्याला वेगळेच वळण लागेल अशीही कोणी इच्छा व्यक्त केली असेल. सेलकर्क यांनी आपल्या तारुण्यात जे लोकविलक्षण साहस केले, त्याचा त्यांच्या जीवनावर कायमचा ठसा उमटेल. मास– आ– टिअरा या बेटावरच्या उघड्या– बोडक्या कड्यावर उभे असताना, एखादा अनोखा व्यवसाय करावा अशी इच्छा त्यांच्या मनात उत्पन्न झाली असेल. वाङ्मय, तत्त्वज्ञान, धैर्य यांच्याशी तो व्यवसाय संबंधित असावा किमानपक्षी एखादी मानसिक विकृती दर्शविणारा व्यवसाय ते करतील असेही अनेकांना वाटले असण्याची शक्यता नाकारता येत नाही. परंतु डिफो यांच्या दृष्टीने, त्यांना सतत प्रवास करण्याचे आणि एका जागेवर कधीच स्वस्थ न बसण्याचे व्यसन असणे हेच पुरेसे होते. या पॅसिफिक महासागरातील हा महान एकांतप्रिय संन्यासी आणि त्याला समाजाशी परत नव्याने जुळवून घेणे कसे अशक्य झाले. याबद्दल एक कादंबरी लिहावयाची राहिलेली आहे (कालांतराने सेंट जॉन पर्क यांची IMAGES A CRUSOE) 'इमाज आ क्रुसोए' ही उत्तम कादंबरी या विषयावरची प्रसिद्ध झाली. तथापि, सेलकर्क यांच्या जीवनाचा शेवट चारचौघांसारखाच झाला. त्यांच्या आयुष्याची सुरुवात सर्वसामान्य अशीच झाली, तसाच त्यांच्या आयुष्याचा शेवटही सर्वसामान्यच होता. त्यांनी विवाह केला. पुन्हा एकदा जहाजावर दाखल झाले आणि १७२३ साली एच. एम. एस. वेमथ या जहाजावर त्यांना मृत्यू आला.



अनुक्रमणिका

डॅनिएल डिफो हे लेखक अलेक्सांडर सेलकर्क यांना कधी भेटले होते का? ते भेटले होते याबद्दल काहीही पुरावा उपलब्ध नाही. परंतु भेटले नसावेत यावर विश्वास बसेल असे हे कारण आहे. ते निर्णायक असे कारण नाही हे मान्य केलेच पाहिजे. सेलकर्क हे इंग्लंडला १७११ साली परतले. डिफो यांची कादंबरी १७१९ साल उजाडेपर्यंत प्रसिद्ध झाली नव्हती. कादंबरीकाराने आपल्यासमोर जो आदर्श (मॉडेल) ठेवला होता, त्याच्याशी त्यांची ओळख असती, वैयक्तिक असे संबंध असते, तर प्रत्यक्षात साहस घडले तो काळ, आणि ललित वाङ्मयात ते साहस शब्दबद्ध होणे या दोघांच्या दरम्यान इतका काळ लोटला नसता. ती गोष्ट यापेक्षा कमी वेळात व्हावयास हवी होती. लेखक आणि साहसी नावाडी यांची ती अनोखी भेट; व तो त्या नावड्याचा 'आँखो देखा हाल' या दोन्ही गोष्टी एकमेव अशाच आहेत. पण त्यामुळे लेखकाला आपली साहित्यकृती निर्माण करण्याची प्रेरणा मिळाली नसती का? अर्थात हा सारा कल्पनाविलास आहे, इतर काहीही नाही. त्याजबरोबर प्रत्यक्ष घडलेली गोष्ट आणि वाङ्मयीन कृतीत शब्दबद्ध झालेली गोष्ट या दोहोत जी अनेक गोष्टींची तफावत आहे, त्याची नोंद या ठिकाणी घेतली पाहिजे. उदा. गोष्ट घडते ते ठिकाण वेगळे आहे. रॉबिनसन हा पॅसिफिक महासागरातील मास- आ- टिआरा या बंदरावर उतरत नाही. तो ओरीनोकोच्या मुखाशी असलेल्या एका बेटावर म्हणजेच अटलांटिक महासागरातील बेटावर उतरतो. हा बदल का बरे झाला असावा? व्हान फरनानडेन बेटे ही लोकांना अजिबात माहीत नव्हती. या उलट अटलांटिक महासागरातील हा प्रदेश लोकांना माहीत होता. आपली कथा लोकप्रिय व्हायची असेल तर लोकांना अगोदर परिचित असलेल्या जगाच्या भागात, विशेषत: ज्या भागाविषयी अगणित आख्यायिका गोष्टी प्रचलीत होत्या अशा भागात- घडली आहे असे दाखवावे लागेल असे लेखकाला वाटले असेल याबद्दल शंका नाही.

डिफो यांनी आणखी एक बदल केला. त्यानी कादंबरीतल्या नायकाच्या त्या बेटावरच्या वास्तव्याचा काळ चार वर्षे चार महिने न ठेवता, त्याऐवजी तब्बल अठ्ठावीस कलांचेही काही 'हुकूम' असतात. मास- आ- टिआरा या बेटावर सेलकर्क यांचे जहाजाच्या कप्तानाशी जुळत नव्हते म्हणून सोडून देण्यात आले होते. या उलट एक जहाज फुटले, व त्या जहाजावर असलेल्या सर्व लोकांपैकी फक्त एकच जण वाचला. तो मनुष्य रॉबिनसन क्रुसो. हे बदल केल्याकारणाने ही गोष्ट एका वरच्या पातळीवर जाते. अन्य कोणाचेही नाही तर प्रत्यक्ष परमेश्वराचे बोट हलले म्हणून हा नशिबाचा तडाखा क्रुसो यांना मिळाला. ते काहीही असो. इतिहासात घडून गेलेल्या घटनांचे सौंदर्य डिफो यांनी अनेक प्रकारे वाढविलेले आहे. त्यातही सर्वात कल्पक अशी क्लृप्ती कोटची असेल, तर ती माझ्या दृष्टीने तरी फ्रायडे या पात्राची निर्मिती. मी या संबंधात लौकरच विवेचन करणार आहे

या कादंबरीला जे यश प्राप्त झाले, ते आश्चर्यकारक या शब्दाचे जेवढे अर्थ आहेत, तेवढ्या अर्थांनी. गरीव विचारे डॅनिएल डिफो, त्यांनी यापूर्वी गंभीर विषयावरची अनेक

पुस्तके लिहिली होती. त्यांचे साहित्यमूल्यही चांगले वरच्या श्रेणीचे आहे. परंतु या साहित्य-कृतीमुळे त्यांना लोकप्रियता लाभली नाही. या उलट त्याना ती पुस्तके लिहिल्यामुळे मानसिक त्रास झाला, त्यांच्यावर त्या लिखाणाबद्दल खटलेही झाले, त्यांचा छळ झाला. या डॅनिएल डिफोना आपण एकाएकी श्रीमंती व प्रसिद्धीच्या शोधात आहोत असे आढळून आले. ते इतके प्रसिद्ध व श्रीमंत झाले की त्यांनी घाईघाईने रॉबिनसन क्रुसो या कादंबरीला रॉबिनसन क्रुसो यांच्या तोवरच्या साहसांचे वर्णन करणारी एक पुरवणी त्यांनी लिहिली. या कादंबरीची ही संपूर्ण आवृत्ती जो कोणी वाचक प्रथमच वाचीत असेल, तो काहीसा आश्चर्यचकित होईल. कशाने आश्चर्यचकित होईल? या संपूर्ण कादंबरीचा फक्त एक तृतीयांश भाग, रॉबिनसन क्रुसो यांच्या त्या बेटावरील साहसांनी व्यापलेला आहे. बाकीचा राहिलेला सर्व भाग, या जगात त्याने इतर देशात केलेल्या भ्रमणाचा आहे. या भ्रमणाच्या अखेरीस फ्रायडे या मूळ बेटावर परत येतो. पण हे परतणे दुर्दैवी ठरते, कारण त्यांना त्या बेटावरचे 'इंडियन' (भारतीय नव्हेत) – ते कदाचित फ्रायडे यांचे बांधवही असण्याची शक्यता आहे– ठार मारतात.

डिफो यांची ही एक महान कादंबरी आहेच. ही कादंबरी सर्व अर्थांनी प्रचंड प्रमाणात यशस्वीही ठरली. पण हे यश इतर महान साहित्यकृतींसारखेच ठरलेले नाही. त्याही पलीकडे या यशाने या कादंबरीला नेले आहे. या कादंबरीचे यश आणि इतर कादंबऱ्यांचे यश, यात एक मोठा फरक आहे. रॉबिनसन क्रुसो या कादंबरीने अनेकांना स्फूर्ती दिली. कशाकरता स्फूर्ती दिली? कादंबरीलेखन करण्यासाठी. ही कादंबरी समोर ठेवून, असंख्य दुसऱ्या कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. सर्व जगात मूळ कादंबरीत जो विषय आहे, तो गृहीत धरून त्याच्या नव्या नव्या आवृत्त्या तयार झाल्या. इतर अनेक महान साहित्यकृतींच्या बाबतीत असे सामान्यपणे घडलेले नाही. ही कादंबरी मुळातील इंग्रजी भाषेतली, तिचे अन्य भाषात भाषांतर झाले ते काहीही असो, या कादंबरीतल्या कथानकाचे बीज, वाऱ्याबरोबर सर्वत्र गेले. अनेक ठिकाणी हे बीज चांगलेच रुजले व फोफावले. त्या देशातील सांस्कृतिक वातावरणावर, अगदी खोलवर पोचेल असा प्रभाव त्या बीजातून निर्माण झालेल्या साहित्यकृतींनी टाकला. या अनेक साहित्यकृतींतील ज्या साहित्यकृतींनी जगात नाव कमाविले त्यांची नावे येणे प्रमाणे: EDWARD EVERETTE HALE (एडवर्ड एव्हरेट हाल) यांचे 'CRUSOE IN NEW YORK' (न्यूयॉर्कमध्ये क्रुसो) क्रुसो इन न्यूयॉर्क. PERCY B. ST. JOHN (पर्सी. बी. सेंट जॉन) या लेखकाचे 'THE ARTIC CRUSOE' (दि आर्क्टिक क्रुसो– आर्क्टिक प्रदेशात क्रुसो) आणि या कादंबरीचा उल्लेख अर्थातच केलाच पाहिजे. WYSS (विस) यांची 'SWISS FAMILY ROBINSON' (स्विस फॅमिली रॉबिनसन– स्वीस कुटुंबाचा रॉबिनसन). या कादंबरीचा आवर्जून उल्लेख करावयास हवा तो अशासाठी की, या कादंबरीत पिता (फादर) अशी एक व्यक्तिरेखा आहे. हा पिता, या बेटावरच्या लहान

मुलांसाठी उपयुक्त ठरलेली साधनसामुग्री,आपल्या स्वत:च्या मुलांच्या भल्यासाठी हस्तगत करण्याच्या प्रयत्नात प्रामुख्याने गढलेला असतो; असे या कादंबरीत शब्दरेखित करण्यात आलेले आहे. रॉबिनसन क्रुसोचे साहस नजरेवर ठेऊन रचलेली अगदी अलीकडची कादंबरी सेंट जॉन पर्स यांची 'IMAGES A CRUSOE' (क्रुसोची प्रतिमा) ही कादंबरी फारच चांगली उतरली आहे. आणखी एक अगदी अलिकडची कादंबरी. जाँ. गिरोडू (JOHN GIRAUDOUX) यांची 'SUZANNE LE PACIFIQUE' (सुझान ले पॅसिफिक) या कादंबरीत डिफो यांच्या दाढीवाल्या व प्युरीटन पंथी रॉबिनसन क्रुसोची जागा BELLAC बल्लाक गावातल्या एका तरुणीने घेतलेली आहे. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास, डॅनिएल डिफोनंतर येणाऱ्या प्रत्येक पिढीला, रॉबिनसन क्रुसो या व्यक्तीवरची, आपल्या विद्यमान पिढीची कथा सांगण्याची गरज भासली हे स्पष्टच आहे. असे करताना, आपले 'मी' पण (IDENTITY) व अस्मिता नेहमी कशात आहे याचा शोध लावण्याचा प्रयत्नही, रॉबिनसन क्रुसो, या मूळ कादंबरीचे संविधान वापरून होता.

या संबंधात ज्यूल्स व्हर्न यांच्या 'मिस्टीरीएस आयलंड' (१८७४) 'गूढ बेट' या कादंबरीचा उल्लेख केला पाहिजे. या कादंबरीपासून बरेच शिकण्यासारखे आहे. व्हर्न हे रॉबिनसन क्रुसो या कथेचा आदर्श नजरेसमोर ठेऊन, आपली स्वत:ची अशी त्या कथेची आवृत्ती प्रसिद्ध करीत होते, याबद्दल काहीही शंका नाही. सुमारे दीडशे (१५०) वर्षापूर्वी जन्मलेल्या या कथेतील नायकाने डॅनिएल डिफो यांच्या कथानायकाला आव्हान दिले होते. या हेतूनेच व्हर्न यांनी आपले कथानक रचले होते हेही अगदी वादातीत आहे. मूळ कादंबरीतला रॉबिनसन क्रुसो हा जिवंत राहाण्यासाठी जेव्हा संघर्ष करीत होता, तेव्हा त्याच्याजवळ दोन हुकमी पत्ते होते. एक, भर समुद्रात फुटलेल्या जहाजाच्या रूपाने संस्कृतीने त्याला अत्यंत मौल्यवान अशी निरोपभेट दिली होती. दोन,तो अशा एका बेटावर येऊन पडला होता की त्या बेटावर सर्वत्र हिरवीगार अशी हिरवळ,भरपूर वनराजी आणि आता विश्वविख्यात पावलेल्या त्याच्या शेळ्या– बोकड, यापेक्षा अधिक धोकादायक प्राणी त्या बेटावर अजिबात नसणे.

या उलट व्हर्न यांच्या कथेत पाचजण वाचतात. ते एका खडकाळ बेटावर येऊन पडतात. या बेटावर अवतीभोवतीच्या महासागराच्या लाटा एकसारख्या आदळत असतात. या पाचजणांना या परिस्थितीला सामोरे जावयाचे असते. व्हर्न यांचे हे प्रवासी जहाजावरचे प्रवासी वा नोकर नव्हते. ते एका बलूनमध्ये बसून सफर करीत होते. दुसरीही एक अडचण होती. हे बलून जसजसे खाली येऊ लागले, तसतसे स्वत:ला वाचविण्यासाठी या पाच जणांना त्या बलूनला आधार देण्यासाठी खटपट करावी लागली. त्या बलूनला आधार देणारा जो सांगडा होता, तो कोसळू नये म्हणून त्यास कवटाळून ठेवावे लागत होते. या सर्व धडपडीत, आपण समुद्राचा तळ गाठू नये, यासाठी बलूनच्या अगदी तळात जी टोपली

असते, यातच जीवनावश्यक असे बरेच साहित्य ठेवलेले असते– ती टोपलीच फेकून घ्यावी लागली होती. हे पाचही जण त्या खडकाळ बेटावर उतरल्यानंतर या बेटावरच्या पाण्याने भिजले व चिखलाने बरबटले. मग हे अशा प्रकारे चिखलाने बरबटलेले कुत्रे जशी वळवळ करतील, तशीच हे पाचही जण करीत होते. या ठिकाणी आपणास पाच जादूगारांची आठवण होणे हे अपरिहार्य असेच आहे. या पाचही जादूगारांनी आपल्या अस्तन्या सावरल्या आहेत. आपली सर्व बोटं उघडी केली आहेत. समोरच्या प्रेक्षकांना ते सांगताहेत, या मित्रांनो या आणि बघा आमच्या खिशात, हातात काही आहे का? तेथे काहीही नाही याची खात्री करून घ्या. या नंतरचा कथाभाग वाचताना कोणाचेही मन चक्रावून जाईल. कल्पकता, शोधकता आणि प्रज्ञा या सर्वांचेच येथे प्रदर्शन आहे. हे सारेजण मिळून विस्तव– आग पेटवतात. विटा भाजतात, खनिज संपत्ती पृथ्वीच्या पृष्ठभागावर आणतात आणि पोलाद तयार करतात. यापेक्षाही सर्वोत्तम अशा गोष्टी पुढे येणारच आहेत. ते आणखीही पुढे जाऊन नायट्रोग्लीसरीन हे स्फोटक तयार करतात. रासायनिक खतांचे उत्पादन करतात आणि त्यानंतर कोटाच्या शिवणीत सापडलेल्या एका गव्हाच्या दाण्याच्या जोरावर ज्या ठिकाणी पूर्वी फक्त दगड होते, त्या ठिकाणी अमाप असे गव्हाचे उत्पादन करतात. नळ्या फुंकून काचेची निर्मिती करतात, पाण्याच्या दाबावर चालणारे उदवाहन (HYDRAULIC ELEVATOR) तयार करतात. या सर्व अद्‌भुत साहसाचा शेवट, आणखी एका तितक्याच कल्पक व अद्‌भुत कामगिरीने होतो. ते वीज तयार करतात आणि तारा पाठविण्याची साधने निर्माण करतात. रॉबिनसन क्रुसो आणि त्याचे गोठ्यातले बोकड हे केव्हाच मागे पडले आहेत, कर्तृत्वहीन ठरले आहेत आणि सरतेशेवटी हास्यास्पद ठरले आहेत.

या कथेचा मुद्दा एकच आहे. त्याचे असे आहे. अपघातात सापडलेल्या या पाच जणात सायरस स्मिथ नावाचा एक मनुष्य असतो. जूल्स व्हर्न यांनी निर्माण केलेल्या धीरोदात्त नायकातील हा महत्त्वाचा नायक. स्मिथ हे व्यवसायाने इंजिनिअर. हा शब्द सर्वच युरोपिय भाषात एक अद्‌भुत शब्द. इंजिन + कल्पकता या दोन शब्दांच्या सहयोगातून निर्माण झालेला शब्द– इंजिनिअर. तंत्रविज्ञान आणि विज्ञानाचा सामाजिक उपयोग, या दोन्हीही गोष्टींनी प्राप्त करून घेतलेला विजय या शब्दात अनुस्यूत आहे. या पाच माणसांना खर्ची घालून, त्यांची चेष्टा करणे अथवा खिल्ली उडविणे सोपे आहे. तो भाग एक वेळ बाजूला ठेवला तरी विचार मनात येतातच. या पाचातल्या एकालाही कधीही, कसलीही शंका आली नाही; संभ्रम उत्पन्न झाला नाही, त्यातला कोणीही, कधीही निराश झाला नाही, अगतिक झाला नाही. द्वेषाने एकाच्याही मनात प्रवेश केला नाही. रॉबिनसन क्रुसोने विजेचे उत्पादन केले नसेल. पण धार्मिक स्वरूपाचे पेचप्रसंग त्याच्या आयुष्यात येऊन गेले होते. आत्महत्येचा विचारही त्याच्या मनात आला होता. या सर्वापुढे त्याला मानवी असे एक परिमाण प्राप्त होते. तो एक वेगळाच माणूस आहे असे आपल्याला वाटू लागते. या अशा टीकाटिप्पणीला

व्हर्नना पुढीलप्रमाणे उत्तर देता येईल याबद्दल शंका नाही. ते सांगतील,काम करणे हेच सुख, आणि नुसत्या हवेतून जेव्हा काच व सल्फ्युरिक ॲसिड निर्माण करावयाचे असते तेव्हा टिपे गाळण्यासाठीही वेळ नसतो.

व्हर्न हे दुसऱ्याही एकाप्रकारे प्रतिक्रिया व्यक्त करतील. आंतरिक जीवन, या स्वरूपात, व्हर्न यांच्या त्या पाच नायकांकडे फारसे काही नव्हते हेही ते मान्य करतील. परंतु त्यांनी त्या बेटाला जे नाव निवडले होते त्या नावाच्या बेटाला आंतरिक जीवन जरूर होते. बेटाचे नाव होते नेमो (NEMO.) ( या ठिकाणी नॉटलीएस या जहाजासंबंधी चार शब्द सांगणे आवश्यक आहे. हे जहाज ही एक पाणबुडी होती. अमेरिकन इंजिनिअर रॉबर्ट फुलटन यांनी याच नावाची पहिली पाणबुडी १८०० साली बांधली. नेपोलियनला या विषयात फार रस होता. याच पाणबुडीचे नाव जुलस् व्हर्न यांनी आपल्या प्रख्यात ट्वेन्टी थाउजंड लीग्ज अंडर द सी या कादंबरीत वापरले. १८७० साली प्रसिद्ध झालेल्या ही कादंबरीची आता वैज्ञानिक ललितसाहित्यातील अभिजात साहित्यात गणना होते. या कादंबरीत या पाणबुडीचे कप्तान नेमो यांच्या सफरीचे वर्णन आहे) नेमो हे नाव जगतविख्यात नॉटलीएस या जहाजाच्या कप्तानाचे आहे. मनातील अत्यंत गूढ व गुह्य गोष्टींसंबंधी विचार करणारा हा गंभीर प्रकृतीचा तत्त्वज्ञ. खडकाळ किनाऱ्यालगत, हा आपल्या जादूच्या खेळण्यात लपून राहिला होता. व्हर्न यांचा धीरोदत्त नायक स्मिथ हा एकोणिसाव्या शतकातील हिरो (नायक) आहे हे खरे. पण तो विसाव्या शतकासंबंधी स्वप्ने पाहात होता. स्मिथ यांचे अभियांत्रिकी कौशल्य कितीही प्रचंड व कल्पक असेना. पण नेमोशी तुलना करता, तो एक छोटा बच्चा होता. आपल्या पाणबुडीत असलेल्या ऑर्गनवर तो बाख- लिखित व त्याने ज्याना संगीतही दिले होते अशी एका विशिष्ट प्रकारची गाणी वाजवीत होता. या गाण्यांना पाश्चिमात्य जगतात कोराल म्हणतात (CHORAL). तीही अशा वेळी वाजवीत होता की नेमक्या त्याच वेळी त्याची पाणबुडी आणि ते गूढ बेट, या दोघांनाही भूकंप गिळंकृत करीत होता.

रॉबिनसन क्रुसो या साहित्यरत्नाचे पैलू पाडताना 'मिथिकल हिरो' या संकल्पनेला अत्यंत आवश्यक असलेल्या दोन भागांची ओळख पटते. एक, तो ज्याप्रकारे प्रथम अवतीर्ण झाला, त्यातून दुसऱ्या अनेकांना जीवन देण्यासाठी त्याने आपली सुटका करून घेतली. दोन, रॉबिनसन क्रुसो हे व्यक्तिमत्त्व, ज्या लेखकाने निर्माण केले, त्या लेखकाच्या लोकप्रियतेच्या बाबतीत पार मागे टाकलेले आहे. रॉबिनसन क्रुसो यांचे नाव लोकांना आठवते, पण ते व्यक्तिमत्त्व निर्माण करणाऱ्या लेखकाचे नाव फारच थोड्यांना आठवते. रॉबिनसन क्रुसो, हे आता अखिल मानवजातीची मालमत्ता आहेत. ते पाश्चिमात्य जगताच्या आत्म्याचा एक मूलभूत घटक होऊन बसले आहेत.

आपण त्याच्या जीवनाचा कोणताही भाग निवडला तरी आपल्यापैकी प्रत्येकाच्या जीवनात ते हजर आहेतच. आपणा सर्वांपाशी जे जे काही आहे, त्यात 'क्रुसो' ही 'मिथ'

अत्यंत आवश्यक व प्रचलित अशी आहे. कदाचित् या 'मिथने' आपला ताबा घेतला आहे असे म्हणणे अधिक बरोबर ठरेल. 'क्रुसो' या मिथने, आपल्या साहित्याला (भारतीय खासच नाही) किती प्रकारे व कसा आकार दिला आहे? एकांतवास, एकाकीपणा आपण आपल्या आधुनिक समस्या व त्यातील आशाआकांक्षा, व संवेदना, या सर्वाबाबत 'क्रुसो' या 'मिथने' कशा प्रकारे व कोणता साचा तयार केला आहे? यासंबंधी क्षणभर थांबून विचार केला तर ती क्रिया उद्‌बोधक ठरेल.

क्रुसो हा मूलतः 'एकांतवासाचा' हिरो आहे. एका निर्मनुष्य बेटावर अडकून पडलेला, नुसते आईबाप नाहीत म्हणून पोरका नव्हे, तर सर्व मानवजातीपासून दुरावलेला. नैराश्य, वेड, आत्महत्येचे बिचार यांच्याविरुद्ध अनेक वर्षे संघर्ष करीत असलेला, असा हा क्रुसो. माझ्या मनात असाही विचार येतो की विद्यमान पाश्चिमात्य मनुष्य ज्या जखमांमुळे दुःख भोगतो आहे त्यातली सर्वात जास्त घातकी जखम कोणती असेल तर ती 'एकांतवास'. संपत्ती व स्वातंत्र्य या दोन्ही गोष्टींचा उपभोग आपण पाश्चिमात्य भरपूर प्रमाणात घेत असल्याने त्या 'एकांतवासा'चा मानसिक त्रास, आपणास अधिक करून होतो. पाश्चिमात्य मानवाच्या विद्यमान अवस्थेत स्वातंत्र्य, संपत्ती आणि एकांतवास या तीन शक्ती आहेत. एक शतकही उलटले नसेल पण त्या काळात, युरोपियन कुटुंब व धर्म, एकाच गावात अथवा एकाच पंचक्रोशीत एके ठिकाणी राहाणे, आपला वाडवडिलांचा परंपरागत धंदा करणे, या सर्व गोष्टींमुळे युरोपियन समाजातील लोक एकत्र जोडलेले होते. हे बंध चांगलेच मजबूत होते. क्रांतिकारी असे सामाजिक बदल होण्यास त्यामुळे प्रतिबंध होत होता. निवड कशी करायची या स्वातंत्र्यावरही त्यामुळे मर्यादा पडे. आपली पत्नी निवडण्याच्या बाबतीतही पुरुषाला फारसे स्वातंत्र्य नव्हते, आणि एकदा त्याने निवड केली की त्या बाईच्याऐवजी दुसऱ्या कोणत्या बाईबरोबर संसार करण्याच्या बाबतही त्याला फारशी आशा नसे. या कर्तव्याच्या बंधनाबरोबरच आणखीही अनेक बंधने त्या काळातील माणसावर होती. या अशा समाजात जी आर्थिक बंधने निर्माण होतात त्यांच्याशीही पुरुषांना मुकाबला करावा लागे. ही अशा प्रकारची गुलामी एकीकडे माणसास दडपशाहीचा अनुभव देत असली तरी त्याच वेळी दिलासा व उत्साह देणारी ती परिस्थिती आहे असे त्याला दुसऱ्या बाजूने वाटे. आजही तथाकथित अप्रगत देशात, जवळजवळ त्याच प्रकारची परिस्थिती आहे. ते देश व समाज खरोखरच अप्रगत आहेत का? मानवी संबंधाच्या दृष्टिकोनातून विचार करता तसे आढळत नाही वा दिसतही नाही. एखादा परका मनुष्य हसला, तर त्याच्या हास्याला प्रतिसाद मिळाला नाही असे होत नाही. नोहाच्या बेटावरून सोडलेले कबुतर जितक्या वेगाने ऑलिव्ह वृक्षाची डहाळी घेऊन परत आले, तितक्याच झटकन अप्रगत देशात हास्याला प्रतिसाद मिळतो. रस्त्यात एखादे बालक न बोलावताच तुमच्या जवळ येईल आणि आपल्या कुटुंबाबरोबर चहा पिण्यास येण्यासाठी आमंत्रण देईल. रस्त्याच्या कडेला बसलेले मूल, आपल्या

शेजारच्या दगडावर ठकठक करून, तुम्हांस आपल्या शेजारी बसण्यास हाक मारील. या अशा देशातून आलेला कोणीही माणूस मार्सेलिस किंवा ऑरली या विमानतळावर जातो, तेव्हा त्याला लोकांच्या चेहऱ्यावरचे ठोकळेबाज भाव आणि शत्रुत्वाने पुरेपूर भरलेले वातावरण, ही दोन्ही त्याच्यावर चटकन व ताबडतोब आघात करतात.

मुखदुर्बळपणा, थंडपणा, आत्मसंतुष्टता या तीन्ही गुणांनी तयार केलेल्या काचेच्या पिंजऱ्यात आपण स्वत:स कोंडून घेऊन राहावे. अगदी लहानपणापासूनच आपण बरे आणि आपले बरे, परक्याबरोबर कधीही बोलू नये, आणि संशयाचा बुरखा घेऊनच आपण आयुष्य काढावे, अशी आपणास शिकवण देण्यात येते. या सर्वच मानवताविरोधी शिकवणीवर कडी आणखी एका शिकवणीने होते. स्त्री- सुख ही अत्यंत मनस्वी पण धोकादायक गोष्ट आहे, असे आमच्या मनावर बिंबविण्यात येते. नैतिकतेची जागा ही शिकवण घेते. ही अशा प्रकारची समाजापासून अलग पडण्याची क्रिया परमोच्च बिंदूचा पोचण्यासाठीच जणू प्युरिटनिझम (कर्मठ ख्रिश्चन) पंथातील लोकांनी वाट चुकलेल्या मुली, वेश्या, आणि अश्लील वाङ्मयातील आणि त्याच तऱ्हेच्या दुसऱ्या अनेक गोष्टी यांच्याबरोबर कट केला आहे असे वाटावे. समजा मी पॅरीसच्या मेट्रो या भुयारी रेल्वेगाडीतून प्रवास करताना माझ्या शेजाऱ्याच्या हातातील वृत्तपत्रावर दृष्टिक्षेप टाकण्याचे धाडस केले, तर माझा तो शेजारी क्रुद्ध नजरेने माझ्याकडे पाहातो आणि आपले वृत्तपत्र रागारागाने स्वत:च्या खिशात कोंबतो. आता तुम्ही या ठिकाणी हे लक्षात घ्या, ते वर्तमानपत्र त्या शेजाऱ्याचे असते. आपला निढळाचा घाम गाळून मिळविलेल्या पैशातून, ते त्याने विकत घेतलेले असते. आपले स्वत:चे वृत्तपत्र शांतपणे वाचण्याचा त्याचा जो जन्मसिद्ध हक्क आहे व तो कोणासही काढून घेण्याचा हक्क नाही. तो आपल्या या हक्काची अंमलबजावणी करीत असताना, मी त्या ठिकाणी येतो, त्याची ती मालमत्ता (वृत्तपत्र) चोरी करण्याचे कृत्य करताना 'रंगेहात' पकडून घेतो. तुम्हास वाटेल की मी त्या शेजाऱ्याच्या ताटातील पदार्थ खाताना, अथवा मी त्या शेजाऱ्याचे खिसे चाचपताना, वा ते धुंडाळताना त्याने मला पकडलेले आहे- मला ते करण्याचा काहीही हक्क नाही !

या छोट्या घटनेवरून मला एका प्रख्यात पुस्तकाची आठवण होते. त्या पुस्तकाचे नाव आहे 'LIEXIL INTERIEUR : SCHIZODIE ET CIVILISATION'. लेखक रोलँड जाक्कारड (ROLAND JACCARD). हे पुस्तक एकीकडे अत्यंत कडवट अशी भावना मागे ठेवून जाते. दुसरीकडे त्याच्या वाचनाने उभारी व आधारही मिळतो. या पुस्तकात सुरुवातीला एक दृश्य आहे. त्या दृश्यातील प्रसंग रेल्वे गाडीच्या भोजनकक्षात घडतो. प्रत्येक टेबलावर चार माणसे याप्रमाणे एकंदर आठ माणसे, त्या भोजनकक्षात भोजन घेत असतात. कोणीही एकमेकांकडे पाहात नाही, किंवा बोलतही नाही. या कादंबरीतल्या निवेदकाच्या शेजारी एक स्वीड बसलेला असतो. त्या दोघात जे काही घडते, त्याचे हे निवेदकाने केलेले

निवेदन आहे. हा स्वीड मोकळा– ढाकळा भाव असलेला व चांगल्या रेखीव चेहऱ्याचा तरुण. भोजन संपल्यानंतर चेरीच्या फळांपासून तयार केलेले मद्य तो मागवितो. मद्याचा पेला त्याच्यासमोर आल्यानंतर तो साखरेचा एक क्यूब त्या मद्यात टाकतो, आणि निवेदकाकडे पाहून स्मित करतो. निवेदकाने सांगितले आहे की 'मीही त्या स्मिताला स्मित करून उत्तर देतो.' त्या तरुणाने त्यानंतर त्या पेल्यात आणखी एक साखरेचा खडा टाकला, आणि त्यानंतर काही सेकंद तो आपला हात हळूहळू माझ्या दिशेने पुढे करीत होता. बहुधा असे असावे की त्याने खास तयार केलेले खास पेय मी चाखून पाहावे अशी त्याची इच्छा असावी. परंतु आम्हा दोघांमध्ये, आमच्या दोघांच्या शरीराच्या दरम्यान, आम्हाला न ओलांडता येईल अशी भिंत उभी होती. मैत्री व्यक्त करणारे हावभाव एकाएकी थांबविण्यात आले.

संपत्ती व वैभवात जसजशी वाढ झाली, तसतशी सामाजिक बंधनेही एकामागून एक गळून पडली. आपण नग्नावस्थेत, कशाची तरी अपेक्षा करीत, आणि अगदी एकाकीपणे त्या आजूबाजूच्या बिनचेहऱ्याच्या व बिननावाच्या कोणाकडेही मदतीसाठी जाता येणार नाही अशा अवस्थेत उभे आहोत, असे त्या मुक्त मानवास आढळून येते. इटालीत नेपल्स या शहराच्या सीमेवर राहात असलेले भाडेकरू. हे सारे एका गावाचे रहिवाशी असतात. एका सामाजिक उतरंडीत, कुठच्यातरी पायरीवर त्यातील प्रत्येक रहिवाशांचे स्थान नक्की असते. या गावात प्रत्येक जण एकमेकाला ओळखतो. अर्थात याचा अर्थ असाही आहे की प्रत्येकावर दुसऱ्या सर्वांचा पहारा आहे. पण त्या बदल्यात लोकांना आपले शेजारी आपल्या अवतीभोवती आहेत आणि वेळप्रसंगी ते आपणास मदतही करतील याची खात्री असते. हे सारे रहिवासी आपल्या घराची दारे उघडी ठेवून, आणि एकमेकांच्या घरात वेळप्रसंगी जेवावयास जाऊन, जगतात. या उलट पॅरिसचे आहे. एखाद्या आलीशान वस्तीतील, प्रचंड क्षेत्रफळाच्या ब्लॉकमधले रहिवाशी सभ्यतेच्या भिंतीआड लपून बसतात. आपल्या अगदी लगतच्या शेजाऱ्यांची नावे माहीत करून घेण्याच्या चौकसपणा हा औचित्यपूर्ण मानला जात नाही. प्रवास करतानाही दुसऱ्या लोकांबद्दल आपणास हीच बेपर्वाई आढळून येते. रस्त्यावर गाड्या हाकणारे जे ड्रायव्हर आहेत, ते धातूच्या पिंजऱ्यात कोंडल्यागतच असतात. त्यांचा त्या कोठडीतला तो एकांतवास संपावा यासाठी काही मार्ग सापडला तर त्या ड्रायव्हरांच्या आयुष्यात लक्षणीय सुधारणा होईल. रस्त्यावरच्या सुरक्षिततेत वाढ होईल, तो फायदा वेगळाच. दुसऱ्या ड्रायव्हरकरवी आपणावर दडपशाही होते आहे, धाकदपटशा होतो आहे, त्यांचे भूत आपल्या पाठीमागे लागले आहे, असे प्रत्येक ड्रायव्हरला वाटत असते. पण त्या दुसऱ्या ड्रायव्हरजवळ बोलताही येत नसते. मग एखादवेळ तो, त्या दुसऱ्या ड्रायव्हरला शिव्यांची लाखोली वाहात असला, तरी त्या बंद पिंजऱ्यामुळे ती लाखोली त्या दुसऱ्यांच्या कानापर्यंत कधीही पोचत नाही. हजार दोन हजार मीटर अंतरावरच्या मोटारीतल्या



अनुक्रमणिका

ड्रायव्हरबरोबर संभाषण करता येईल, असे एखादे उपकरण तयार करून ते प्रत्येक मोटारीत बसविणे हे तंत्रवैज्ञानिक दृष्ट्या शक्य कोटीतले आहे. प्रथम प्रथम या उपकरणाचा उपयोग मोटारींचे ड्रायव्हर एकमेकांना शिवीगाळ करण्याकरता करतील. एखाद्या ड्रायव्हरने, दुसऱ्या ड्रायव्हरला दिलेल्या शिव्या, अधिक नेमकेपणे, फारच झटकन इच्छित मुक्कामाला पोचतील. हे असे पहिले काही दिवस घडेल. थोड्याच दिवसानंतर ड्रायव्हर या नात्याने एकमेकांशी सभ्यतेने व औचित्याने कसे वागावे, या दृष्टीने नियम तयार होतील आणि गाडी हाकण्याबाबतचा जो दृष्टीकोन आहे, त्यात लक्षणीय सुधारणा होईल.

दुर्दैवाची गोष्ट अशी आहे की, मोटारहाक्यांचा राग शमविण्यापेक्षा रॉबिनसन क्रुसो आपल्या बेटावर असताना त्यास ज्या तीन दैवी शत्रूंनी धमकाविले होते, त्यांचे पारिपत्य करणे हे अधिक कठीण काम आहे. वेड, व्यसन, आणि आत्महत्या हे सारे एकाकीपणाचे परिणाम आहेत– संपत्ती आणि स्वातंत्र्य हा एकाकीपणा धोक्यात येतो. तसेच सुबत्ता आणि कोणत्याही निवड करण्याचे बाबतीतले स्वातंत्र्य, यात जसजशी वाढ होत जाते, तसतसे, एकाकीपणाचे अधिकअधिक बळी रस्त्याच्याकडेला लकटले जातात. याचे कारण प्रगतीची काळी बाजू एकाकीपणा आहे आणि तोच एकाकीपणा सहन करण्याच्या दृष्टीने अनेक लोक कमकुवत असतात.

हा काचेचा पिंजरा तोडलाच पाहिजे, आणि तो तोडण्यासाठी प्रथम त्या पिंजऱ्याच्या अस्तित्वासंबंधी आपण शोध घेतला पाहिजे. तसेच तो पिंजरा अपरिहार्य नाही, तो चांगला नाही, याबद्दल आपली स्वत:ची खात्री पटलीही पाहिजे. कामचलाऊ अशा तात्पुरत्या समूहांची निर्मिती करता येईल. या समूहातील लोक एकमेकांना प्रत्यक्ष भेटण्या अगोदरच एकमेकांना समजावून घेतील. महामार्गावर मोटारगाडी चालविणारांचा समूह अजून स्थापन व्हावयाचा आहे. परंतु मोटरसायकल चालविणारांचा समूह या अगोदरच अस्तित्वात आलेला आहे. कातडी जाकिटे घालणारे हे सरदार परिचित भाषेत एकमेकांना शुभेच्छा देतात, एकमेकांना वेळप्रसंगी मदतही करतात, आणि प्रचंड मेळावे संघटित करतात. काही धार्मिक समूहही अस्तित्वात आहेत. तेझे (TAIZE) हे त्याचे एक उत्तम व उदात्त असे उदाहरण. या अशा कोणत्याही गटाकडे संशयाने पाहाता नये. हे अशा प्रकारचे गट हे एकाकीपणाच्या कवचाला छिद्रे पाडतात. समान भलेपणासंबंधी कर्तव्य असणाऱ्या समाजाने, या अशा गटांना प्रोत्साहन दिले पाहिजे आणि वेळप्रसंगी संघटित केले पाहिजे. या अशा गटांकडे संशयाने पाहाण्यापेक्षाही त्यांच्याशी युद्ध पुकारणे सर्वात वाईट. कायदा आणि सुव्यवस्था या कुप्रसिद्ध समजुतीच्या नावाखाली मूर्खपणाच्या आहारी जाऊन, या गटांशी युद्ध पुकारले जाते. ते कोणत्याही परिस्थितीत टाळले पाहिजे. थोडक्यात संशय बाळगू नये व युद्धही पुकारू नये. मला वेगळीच गोष्ट अभिप्रेत आहे. पॉप संगीताचे जे महोत्सव संघटित केले जातात त्यांचा विचार मला या ठिकाणी प्रस्तुत वाटतो. बुआ ड बुलोन्य हे पॅरिसमधले एक

अत्यंत रम्य ठिकाण. तेथे रात्री मौज– मजेचे उत्सव अनेक वेळा साजरे होतात. या उत्सवात अंतर्भूत असलेला गूढ असा गोंधळ, चोरट्या खाणाखुणा, गुपचूप हालचाली, प्रकाशाचा झोताने, किंवा हास्यकल्लोकाने उजाळा मिळालेल्या प्रेमिकांच्या सावल्या, या सर्वांचा विचारही माझ्या मनात डोकावून जातो. बुआ ड बुलोन्य हे ठिकाण अशा रात्रीच्या वेळी, संपत्ती आणि स्वातंत्र्य, या दोन्हींची, आनंद, हास्य आणि समूह या तिघांबरोबर दिलजमाई झालेली मी पाहातो. ते काहीही असो मला तसे दृश्य पाहावयास आवडते.

रॉबिनसन क्रुसो हा केवळ एकाकीपणाचा बळी नाही, तो एकाकीपणाचा हीरोही आहे. मूल्यांच्या या अशा अदलाबदलीत, जो एकाकीपणा आपला बळी घेतो, जो आपणास वेडेपिसे बनवितो, त्याला एक प्रकारचे प्रतिष्ठेचे वलयही प्राप्त होते. एखादा अक्राळविक्राळ दिसणारा मासा; आपण प्रथमच जेव्हा खातो, तेव्हा त्याला अवर्णनीय असा सुखद सुगंध, आणि चव आहे असे आपणास वाटते, आणि अत्यंत सुखद संवेदनेची त्यातून निर्मिती होते. त्याच सारखी ही प्रतिष्ठेचे वलय निर्माण होण्याची प्रक्रिया आहे. एखाद्या निर्जन बेटावर पळून जाण्याचे स्वप्न कोणाला पडलेले नाही? अनेकांच्या दृष्टीने, सुट्टीचा सुखद विचार पांढऱ्या शुभ्र वाळूचे किनारे, पामवृक्ष, आणि किनाऱ्यावर आदळणाऱ्या निळ्या लाटा या सर्वांच्यापासून अगदी अविभाज्य आहे. रॉबिनसन याला हे सर्व मिळाले होते. त्याच्या या त्या निरभ्र नंदनवनात त्याला थोडक्यात 'स्वत:च करून पाहा' असल्या व्यवसायापलीकडे जाऊन दुसरे काही काम करण्याची आवश्यकता नव्हती. थोडेसे बागकाम, थोडेसे बांधकाम, थोडी मासेमारी करण्यापलीकडे काहीही करण्याची जरुरी नव्हती आणि खरेच क्रुसो कोणालाही आपल्या स्वत:च्या घराच्या अवतीभोवती 'स्वत:च करून पाहा' या प्रकारच्या व्यवसायांचा 'पेट्रन सेंट' आहे.

येथवरच्या विवेचनावरून हे स्पष्ट व्हावे की, क्रुसो यांच्याबद्दल इतक्या प्रमाणात कोणालाही इतका प्रचंड आदर का वाटतो. एकाकीपणाचा,विषेशत: एखाद्या बिनचेहऱ्याच्या व दडपणासमान वाटणाऱ्या गर्दीच्या मध्यभागी आपण सापडलो की मग, आपणा सर्वांनाच त्रास होतो. तथापि क्रुसो हे एकाकीपणाबरोबर जुळवून घेण्याच्या कामात फारच वाकबगार होते. या शिवाय एकाकीपणा हा एक जीवनमार्ग आहे, अशा प्रकारे त्यांची उभारणी करण्यातही ते यशस्वी झाले होते. निदान त्याच प्रकारे डॅनिएल डिफो यांच्या हीरोसंबंधी विचार करतात. रॉबिनसन क्रुसो ही 'मिथ' कोणत्या प्रकारे, प्रत्येकाला आपलीशी वाटते, याबद्दलही तो विचार आपणास बरचेसे काही सांगून जातो. या मिथिकल दिशेने प्रत्येक व्यक्तीच्या हृदयात आपली मुळे चांगलीच खोलवर नेऊन रुजवली आहेत. पण त्याचबरोबर हा 'मिथिकल हीरो' तसा अगदी सर्वसामान्य आणि आधुनिक आहे. असे असूनही मानवतेच्या कमाल उंचीचे शिखर तो गाठतो. एक महत्त्वाचा विरोधाभास या ठिकाणीच नोंदविणे महत्त्वाचे आहे. क्रुसो हा हरएक व्यक्तीची जणू प्रतिकृती आहे. अजरामर अशा

ऑलम्पियनसच्या शेजारीच बसण्यास योग्य असा सुपरमॅन (महामानव) आहे: हे वर्णन फक्त क्रुसो यांना लागू पडते असे नाही. ते स्ट्राशन, डॉन वॉन आणि फाऊस्ट या हीरोनांही लागू पडते. हे सर्व हीरो आपणा सर्वास, ज्या प्रक्रियेला आत्मप्रशंसागान (auto hasiography) म्हणणे मला आवडेल, त्यात सामील करून घेतात. वाचक आपले डोळे तो वाचीत असलेल्या पुस्तकातून वर करून जेव्हा आरशात बघतो, तेव्हा मी किती उंच, किती मजबूत, किती दु:खी असा आरडाओरडा करतो. वाचकाला आपण इतके सुंदर आहोत याची खरोखरच तोवर कल्पना नसते.

ते काहीही असो. क्रुसोच्या एकाकीपणाची वर्षे – ॲलेक्झांडर सेलकर्क आणि क्रुसो यांच्या साहसातील समान असलेली गोष्ट, म्हणजे तो एकाकीपणा. या एकाकीपणावर या कादंबरीतल्या आणखी एका महान संविधानाची छाप पडलेली आहे. ही एकाकीपणाची वर्षे त्या संविधानासाठी सरतेशेवटी आवश्यक अशी पायाभरणी करीत आहेत असे वाटते. फ्रायडे या व्यक्तीचा या कादंबरीतला प्रवेश हेच ते दुसरे संविधान. क्रुसो या हीरोलाच प्रथम मिथ हे परिमाण प्राप्त करून घेता आले. हे असे होणे अनिवार्य होते, हे नि:संशय. मानववंशशास्त्र (anthrapology) हे शास्त्र अगदी अलीकडच्या काळात विकसित झाले असल्याकारणाने, क्रुसो यांची 'मिथ' प्रथम तयार होणे क्रमप्राप्तच होते. मानववंशशास्त्र एकीकडे विकसित होत होते. त्याचवेळी प्रचंड साम्राज्ये व वसाहती यांचे विघटनही होत होते. डॅनिएल डिफो यांच्या दृष्टीने फ्रायडे ही व्यक्ती कोण होती. तशी ती कोणीही नव्हती. एक जनावर, फारतर रॉबिनसन क्रुसो यांच्याकडून, त्यांची म्हणजे क्रुसो यांच्याकडे असलेली, मानवता नावाची गोष्ट आपल्याला मिळेल या आशेने वाट पाहाणारा एक प्राणी. रॉबिनसन क्रुसो हे गोरे युरोपियन असल्याकारणाने सारे ज्ञान आणि शहाणपण त्यांच्याजवळ होते. फ्रायडे या अबलख जनावरावर त्याचा मालक क्रुसो याचा मांड एकदा पक्का झाला, फ्रायडे या जनावरच्या अबलखपणाला योगय वळण लागले, म्हणजे मग एक उत्तम चाकर होण्यापलीकडे फ्रायडे यानी आपल्या आकांक्षा कधीही जाऊ दिल्या नसत्या. मानववंशशास्त्राचे युग अवतरण्यापूर्वी क्रुसो याना फ्रायडेपासून काही शिकता येईल ही कल्पनाच कोणाच्याही डोक्यात कधीही आली नसती. रॉबिनसन क्रुसो या कादंबरीचा खास करून व अगदी यथार्थपणे मिथमध्ये रूपांतर होण्याचा जो गुण आहे तो नेमका याच ठिकाणी स्पष्ट व उघड आहे. रॉबिनसन क्रुसो आणि फ्रायडे यांच्यात जे आदान-प्रदान झाले, ज्या क्रिया-प्रतिक्रिया आल्या त्यांना गेल्या काही दशकातच लक्षणीयता प्राप्त झाली आहे. डॅनिएल डिफो या लेखकाला त्यासंबंधी पुसटतीसुद्धा शंका आली नसती, इतकी योजने, ते त्यापासून दूर होते.

मी या कादंबरीचे पुनर्वाचन करताना पॅरिस शहरातील मानववंशशास्त्राचे जे म्युझियम आहे, नाव 'म्युझे द लॉहम' याचा मला विसर पडत नाही. या म्युझियममध्ये मी असे

शिकलो की 'रानटी' असे कोणी नसतेच. पक्त आपल्या संस्कृतीपेक्षा वेगळ्या संस्कृतीत राहणारे लोक असतात. त्यांचा अभ्यास केला तर ते अत्यंत फलदायी ठरते. क्रुसोचा फ्रायडेकडे पाहाण्याचा दृष्टिकोन कशा प्रकारचा होता? तो अत्यंत कावेबाज असा वंशवादी होता. तसेच तो आपल्या स्वत:च्या स्वार्थाबद्दल बेफिकीर होता. कसे ते पाहा. समजा तुम्हाला पॅसिफिक महासागरातील बेटावर राहाणे भागच असले तर मग स्थानिक परिस्थितीला अनुरूप असा जीवनमार्ग, हुन्नर व पद्धती यांत जे प्रवीण असतील त्या स्थानिक लोकांकडून ते शिकून घेणे हे श्रेयस्कर. एका परक्या वातावरणात व परिस्थितीवर इंग्लिश जीवनमार्ग लादण्याच्या प्रयत्नापेक्षा ते अधिक श्रेयस्कर. मी हे सांगितल्यानंतर कोणाची अशी समजूत होईल की रूसोने निर्माण केलेल्या 'नोबल सॅव्हेज' (उमदा रानटी मनुष्य) या 'मिथ'चे पुनरुज्जीवन व्हावे असे मी प्रतिपादित आहे. परंतु भासते तितक्या प्रमाणात खासच नाही. याची कारणे अनेक आहेत. एकतर युरोपियन माणूस जगाचा शोध घेत होता त्या युगातला रूसो. पण त्याला आपल्या अवतीभोवती कशाचे संशोधन चालले आहे, याबद्दल तिळभरही काळजी नव्हती. त्याने 'नोबल सॅव्हेज' ही मांडलेली संकल्पना ही केवळ अमूर्त कल्पना होती. त्या संकल्पनेचा उपयोग त्याने तत्कालीन समाजावर दोषारोप करण्यासाठी केला. हे मॉटेस्क्यु या प्रख्यात निबंधकारासारखेच होते. जे सद्‌गुण 'सॅव्हेज' या व्यक्तीवर (संकल्पनेवर) लादण्यात येत होते ते गुण अनेक दुर्गुणांची आरशातील प्रतिबिंबे होती. रूसो ज्यांना सुसंस्कृत समजत व त्यांच्यात जे दुर्गुण आहेत असा आरोप करीत, त्या दुर्गुणांचे ते सद्‌गुण हे प्रतिबिंब होते. म्हणूनच त्यानी डॅनिएल डिफो यांच्या रॉबिनसन क्रुसो या कादंबरीची स्तुती केली. तसे करताना ते एका मुद्यावर भर देत होते. ते या कादंबरीची स्तुती अशा कारणासाठी करीत होते की "एमिलचा नैतिक अभ्युदय व्हावा. परंतु कादंबरीची भलावण करताना त्यातील फ्रायडे ही व्यक्ती वगळावी, असे त्यानी उघडपणे सांगितले होते. फ्रायडे या व्यक्तीच्या या कादंबरीतील चित्रणात समाजातले जंतू आणि घरगुती गुलामगिरी या शिवाय दुसरे काहीही नाही असे रूसो यांचे मत होते." एमिलला या बेटावर प्रस्थापित करण्यासाठी घाई करू या. त्याचा आनंदी स्वभाव व जीवन या दोन्ही गोष्टी त्यांच्या स्वत:च्याच मर्यादेत आहेत, याची खात्री ठेवूनच हे काम व्हायला हवे. कारण असा एक दिवस लवकरच येईल की ज्यावेळी त्याला त्या बेटावर कायमचे राहावे असे जर वाटले आणि जर त्याची अगदी एकट्याने राहाण्याची त्याची इच्छा नसली तर मग काय होईल. फ्रायडे हा त्याला आता फारसा स्पर्श करीत नाही आहे आणि त्याने केलाच तर तो अगदी थोडा. हा सध्या पुरेसा असला तरी मागाहून तो पुरेसा आहे असे वाटणार नाही. रूसो याना फक्त सदैव कामात असलेल्या, कधीही शुद्ध न हरवणारा, नाना प्रकारचे हुन्नर अंग असलेला, अनेक क्लुप्त्यांची जाण असलेला आणि समजाच्या मदतीशिवाय आपल्या गरजा भागविणारा रॉबिनसन या हिरोमध्ये रस आहे. रूसो यांच्या हे लक्षात येताना दिसत नाही की

क्रुसो हा त्या निर्जन बेटाचा नाश करतो आहे. तसे करताना अत्यंत अविकसित अशा संस्कृतीची त्या बेटावर तो पुनर्रचना करणार होता. फ्रायडे या व्यक्तीला तो केवळ एक नोकर आहे या भूमिकेत फारच खाली नेऊन त्याला तो चुकीच्या मार्गाला लावीत होता. त्याच प्रकारची वागणूक क्रुसो त्या बेटाचा नाश करताना करीत होता. याहीपेक्षा सर्वात वाईट काय असेल तर क्रुसोकडून सारी कल्पकता आणि नवनिर्मिती करण्याची शक्तीच रूसो काढून घेत होता. क्रुसोने आपली मायभूमी इंग्लंडहून येताना जी काही जुजबी कौशल्ये आपल्याबरोबर आणली होती तेवढीच त्याच्याकडे असावीत यासच रूसोची मान्यता होती.

हे असे असले तरी, माझी फ्रायडे ही कादंबरी, ही मानववंशशास्त्रात्मक कादंबरी नाही. अस्सल अशी मानववंशशास्त्रात्मक कादंबरी अजून लिहिलीच गेलेली नाही. माझ्या कादंबरीचा मुख्य विषय दोन संस्कृतीतील संघर्ष व मिलन हा आहे. या दोन संस्कृतींचे प्रतिनिधित्व या कादंबरीत दोन व्यक्ती करतात. या कादंबरीत चित्रित झालेला संघर्ष व मिलन हे एखाद्या निर्जन बेटावरच जणू एखाद्या प्रयोगशाळेत रचलेल्या व प्रस्थापित केलेल्या परिस्थितीत झालेले आहे. अठराव्या शतकाच्या सुरुवातीच्या काळातील इंग्लंडमधील एका विशिष्ट सामाजिक वर्गातून आलेला रॉबिनसन हा इंग्लिश गृहस्थ, फ्रायडे हा 'आरोकानियन' (ARAUCANIAN) या देशातील इंडियन (भारतीय नव्हे) तोही त्याच कालखंडातील. या दोन्ही संस्कृतीचे अगदी तपशीलात संपूर्ण असे वर्णन करावे लागेल. उदा. या संस्कृतीची अर्थव्यवस्था, कायदा व न्यायदान पद्धत, वाङ्मय, कला, धर्म. . . . इत्यादी इत्यादी. हे केल्यानंतरच या दोन प्रतिनिधीतला (इंग्लिश चिलीतला इंडियन) सांस्कृतिक संघर्ष व मिलन, या दोन्ही संस्कृतीतले अनेक घटक घेऊन तयार होत असणारी नवी संस्कृती या संबंधीच्या निरीक्षणाची नोंद करणे. डॅनिएल डिफो यांनी या विषयाला स्पर्शच केलेला नाही, कारण त्यांच्या दृष्टीने आणि मतानेही त्याकाळी अस्तित्वात असलेली जाड ठसा संस्कृती ही त्या बेटावर फक्त क्रुसो यांच्याकडे होती. त्याच्या जोरावर क्रुसो फ्रायडे या व्यक्तीला चकित करतो. त्याला त्या आश्चर्यात पार गाडून टाकतो. ते कांहीही असो माझी कादंबरी तत्त्वज्ञान या ज्ञानशाखेतील, साहसी कामगिरी आहे. या कादंबरीचे उद्दिष्ट हे सर्वस्वी वेगळ्या प्रकारचे आहे. या कादंबरीचे बीज माझ्या मनात रुजले, ते मी हा दृष्टिकोन मनात ठेवून. निदान माझी तरी त्याबद्दल खात्री आहे. उत्क्रांतीच्या एका विशिष्ट टप्प्यावर दोन संस्कृतीचा संयोग होणे या विषयात मला रस नव्हता. अमानुष अशा एकाकीपणाचे परिणाम कोणाच्याही मनावर सातत्याने होतच असतात. लोखंडावर वा अन्य धातूवर एकदा गंज चढला की सातत्याने कधीही विश्रांती न घेता, त्या धातूवर गंज चढतच असतो. त्यासारखेच एकाकीपणाने होणारे परिणाम असतात. त्यांच्या दबावाखाली व्यक्तीच्या मनातील संस्कृतीच्या अगदी अखेरच्या खुणांचेही जे उच्चाटन होते, त्याच्याशी मला अधिक कर्तव्य होते. या अशा प्रकारच्या एकाकीपणात मानवाच्या जीवनाची जी काही मुळे असतात, त्याचे अस्तित्व

हेच मुळी चव्हाट्यावर येते. त्यानंतर शून्यापासून सुरुवात करून, एका नव्या जगाची निर्मिती करणे, त्याला भाग असते. हे करताना त्याला अंधारात चाचपडावे लागेल. एखादी नवी गोष्ट सापडणे, स्पष्टता व उन्माद, या सर्व गोष्टींच्या रोखाने जाण्यासाठी त्याला आपल्या मार्गाचा मागोवा घेत अडखळत, ठेचा घेत, चालावे लागेल. रॉबिनेसन क्रुसो यांनी एकाकीपणाचे स्नान केल्यानंतरही. त्यांच्यापेक्षा, फ्रायडे हा कौमार्यवस्था न गमावलेला, अधिक प्रमाणात ज्याला संस्कृतीपासून वंचित केलेले आहे, अशी व्यक्ती ठरते. फ्रायडे हा नव्या मानवाच्या प्रसूतिकाळातील दाई व मार्गदर्शक, या भूमिकेत उपयुक्त ठरणार होता. एवंच माझी कादंबरी, एक, नवे शोध लावणारी आणि दोन, भविष्यकाळाकडे दृष्टिक्षेप टाकणारी ठरेल, असे दोन्ही हेतू मनात ठेवून लिहिलेली कादंबरी. याउलट डिफो यांची कादंबरी सर्वस्वी आत्मसंशोधनात्मक होती. मानवाच्या हातात सध्या जे काही मार्ग आहेत त्यांचा वापर करून, मानवाला आपल्या गमाविलेल्या संस्कृतीचे पुनरुज्जीवन कसे करता येईल याचे वर्णन करते; या एवढ्याच हेतूने बंदिस्त अशी कादंबरी.

रॉबिनसन, फ्रायडे आणि ते बेट, असे ते तीन पदरी नाट्य आहे. यामुळेच तत्त्वज्ञानापासून सुरुवात करून, थेट कादंबरीत उडी घेण्यासाठी उत्तम असा उड्डाण फलक (Spring Board) मला प्राप्त झाला होता. पॉल व्हॅलरी या लेखकाचे माझ्यावर ते प्रचंड ऋण आहे. त्याची मला एक दिवस, परतफेड केलीच पाहिजे. हे कर्तव्य एकदा पार पाडले की मग एखाद्या बंडखोर आणि कृतघ्न मुलाप्रमाणे मी प्राप्त संधीचा फायदा घेऊन, त्यांच्याविरुद्ध मी हे आरोपपत्र अत्यंत शांत डोक्याने व चिकाटीने गेले कित्येक वर्षे तयार करीत आहे. मी ज्या प्रकारची कादंबरी लिहिण्याचा प्रयत्न करीत होतो त्या प्रकारच्या कादंबरीचे स्वरूप व व्याख्या पॉल व्हॅलरी यानी प्रथम सांगितली. त्यानी 'MONSIEUR TESTE' या नावाची एक कादंबरी लिहिली आहे. (पॉल– आमब्रोईझ वालेरी (१८७१ ते १९४६); कवी, समीक्षक आणि निबंधकार म्हणून ते जास्त प्रसिद्ध आहेत. मॉंसिएर टेस्ट ही कादंबरी हातावेगळी केल्यानंतर, त्यांनी पंधरा वर्षे लिखाण करण्याचे सोडून दिले होते. या मौनाच्या काळात त्यांनी तत्त्वज्ञान विषयक प्रश्नांचाच जास्त करून विचार व अभ्यास केला. जिनिअस असलेल्या व्यक्तीची प्रकृती आणि नव-निर्मितीची प्रक्रिया या प्रश्नावर त्यानी लक्ष केंद्रित केले होते. त्यातूनच ते भाषाशास्त्र विषयात रस घेऊ लागले. या दोन नवनिर्मिती करणारा जो कलावंत असतो त्याच्या बाबतीत भावना व बुद्धी यांची रस्सीखेच नेहमीच असते. या दोघातली प्रत्येक गोष्ट नवनिर्मितीत आपलाच वाटा मोठा आहे असे सांगते. विश्व, मानव आणि मानवी क्रिया व धडपड यांच्यात परस्परसंबंध काय असतात, ते असणे आणि न-असणे या दोन संकल्पनांच्याद्वारा त्यानी उलगडण्याचा प्रयत्न केला होता. 'न– असणे' या संकल्पनेमुळे 'असणे' ही कल्पना शक्य होते. हा विचार त्यांच्या सर्वच लिखाणात सापडतो. मॉंसिएर टेस्ट हा वैश्विक मेंदूचा अवतार. तो अमूर्ततेच्या विश्वातच अस्तित्वात असतो.

आपल्या ज्या सुप्त शक्ती असतात त्याबद्दल वांझोटे चिंतन तो करतो. आपल्या पूर्णत्वाला गालबोट लागेल, म्हणून या सुप्त शक्तीद्वारा प्रत्यक्ष काही करण्यास तो नकार देतो. त्यांचे सर्वच लिखाण बुद्धिमत्ता, नजाकत छोट्या सुभाषितवजा चमकदार वाक्यांनी भरलेले आहे. या सर्व लिखाणात वर उल्लेखिलेल्या प्रश्नांची चर्चा आढळते. व्हलरी यांच्या आयुष्यातील शेवटच्या वीस वर्षात फ्रेंच साहित्य– त्यांना जगात कवी व निबंधकार म्हणून फार मान होता. खास त्यांच्यासाठी काव्याचे प्राध्यापक हे अध्यासन १९३७ साली निर्माण करण्यात आले होते. मॉसिएर टेस्ट या कादंबरीमुळे मला एका आदर्शाची प्राप्ती झाली. खरे म्हणजे असे आहे की पॉल व्हॅलरी हे स्वतःच एका अत्यंत आदरणीय आणि विरोधाभासांनी भरलेल्या आदर्शाचा पाठपुरावा करीत होते. डेकार्ट यांचा 'डिसकोर्स ऑन मेथड' हा ग्रंथ व्हॅलरी यांनी आदर्श म्हणून आपल्यासमोर ठेवला होता. मॉसिएर टेस्ट या कादंबरीचे मूळ त्यांनी जे लॅटिन घोषवाक्य पत्करले आहे, त्यावरून अगदी स्पष्ट आहे. आँद्रे जीद यांना २६ ऑगस्ट १८९४ रोजी लिहिलेल्या पत्रात व्हॅलरी यांनी लिहिले होते, मी 'डिसकोर्स ऑन मेथड' आज दुपारी पुन्हा एकदा वाचले; आणि खरेच, आधुनिक कादंबरी कशी लिहिली गेली पाहिजे याचा तो ग्रंथ आदर्श आहे. या ग्रंथानंतर, आत्मचरित्रपर भाग तत्त्वज्ञानातून हद्दपार करण्यात आला हे लक्षणीय आहे. याच मुद्यांची पुन्हा एकदा तपासणी होणे आवश्यक आहे, आणि म्हणूनच काय लिहावयास जरूर असेल. तर ते सिद्धांताचे जीवन या विषयावर. भावना, रतिसुख यांच्या जीवनाबद्दल याअगोदरच नको इतके भरपूर लिहून झाले आहे. परंतु हे करण्यात कशाची अडचण असेल तर, मी प्युरीटनपंथी असल्याने, लई लँबर्टमध्ये म्हटल्याप्रमाणे सिद्धांत हा पाखंडी विचारापेक्षाही अधिक काहीतरी आहे यावर भर देतो. डिसकोर्स या ग्रंथाच्या दुसऱ्या भागाच्या पहिल्या परिच्छेदाच्या सुरुवातीमुळे, व्हॅलरीच्या उत्साहाला इतके उधाण आले असावे. मनाला चकित करणारी रोषणाई झाली असावी. डेकार्ट यानी या परिच्छेदात म्हटले आहे, मी त्यावेळी जर्मनीत होतो; कारण अजून युद्ध चालूच असल्याकारणाने मला परत बोलाविण्यात आले होते; आणि बादशहाचा राज्यारोहणसमारंभ आटपून, मी सैन्यात परत दाखल होण्यासाठी निघालो. जबरदस्त अशा हिवाळ्याला सुरुवात झाल्याकारणाने मला एके ठिकाणी थांबणे भागच पडले. त्याठिकाणी संभाषण करण्यासाठी कोणी नव्हते थोडक्यात माझी जागा सोडून जाण्यासाठी मला कारण नव्हते. शिवाय काळजी अगर भावना यांचा भासही सुदैवाने नव्हता. मी खोलीत शेकाटीजवळ बसून माझा मीच संबंध दिवस होतो. त्याठिकाणी माझ्या विचारांची उजळणी करण्यासाठी मला भरपूर फुरसत होती.

आनंद वाटण्याला, मौज मजा करायला उद्युक्त करण्यासाठी ही हकीकत एक कारण ठरेल. या ठिकाणी आपण केवळ पैशाकरिता सैनिकी पेशा पत्करलेल्या माणसाचा विचार करीत आहोत. हॉलंडमधील नास्सो या परगण्यातील राजपुत्राच्या सैन्यात नोकरी केल्यानंतर,

त्यांनी– डेकार्ट– यांनी– त्या सैन्यातली नोकरी सोडली, कारण बव्हेरियातील सरंजामदारांच्या सैन्यात त्याना दाखल व्हायचे होते. इ. स. १८१९चा हिवाळा फारच कडक होता. ड्यॅन्यूब नदीचा अप्पर ड्यॅन्यूब म्हणून जो भाग ओळखला जातो, तेथे त्याना पडशी टेकायला जागा मिळाली. मग ते आपल्याला एका बंद खोलीत घडलेल्या घटना, या दोघातही अतूट असे अंतर निर्माण होते. यामुळेच निरीक्षकाला एका आदर्श अशा स्थानाची प्राप्ती होते. हे सारे विवेचन डेकार्ट यांच्या लिखाणासारखेच आहे. डेकार्टही आपल्या विचारात हरवलेले होते. त्यांच्या ऊबदार खोलीच्या गाभाऱ्यातून त्यांना बाहेरचा तोफांचा गडगडाट आणि तार स्वरात फुंकल्या गेलेल्या तुताऱ्या फारच अस्पष्टपणे ऐकू येत होत्या. परंतु मानवाच्या नियतीसंबधी त्यांचे जे चिंतन चालू होते; त्यात हे सारेच समाविष्ट झालेले होते. या ठिकाणी आपणास, हेगेल या तत्त्वज्ञाची आठवण होइलही: हेगेल यांनी आपला "फेनॉमेनॉलॉजी ऑफ दि स्पिरिट" हा ग्रंथ येना ( JENA) या शहरी इ. स. १८०६ साली पुरा केला. ते हा ग्रंथ हातावेगळा करीत होते, त्याचवेळी नेपोलियनच्या सैन्याची आगेकूच चालू होती. क्षितिजावर लखलखाट करणाऱ्या दारूगोळ्यांचा प्रकाश आणि तोफांचा गडगडाट या दोन्हीही गोष्टी प्रिन्स फॉन होहेनलोदे यांच्या नेतृत्वाखालील प्रशियन फौजेचा नेपोलियनच्या सैन्याने पार धुव्वा उडविल्याची साक्ष होती.

रॉबिनसन क्रुसोची गोष्ट एका वेगळ्या प्रकारची आहे. डॅनिएल डिफो यांनी ती ज्या प्रकारे हाताळली तशाच प्रकारे ती हाताळण्यास अवसर आहे. डोक्यात असलेले साहस व धाडस हे एका अभिजात कादंबरीच्या संदर्भात बसविले गेले आहे, या वस्तुस्थितीची पॉल व्हॅलरी यांनी नोंद केली होती. त्यांच्या HISTORES BRISE हिसटोईर ब्रिसेए या पुस्तकात या गोष्टीचे आराखडावजा एक लहानसे टिपण आहे. "पुस्तकांच्या किंवा नोंदवहीच्या मदतीशिवाय रॉबिनसन यांनी आपल्या स्वत:च्या बौद्धिक जीवनाची पुनर्रचना केली आहे. त्यांनी आजवर जे जे संगीत ऐकले होते, ते सारे त्यांच्याकडे परत येते...... एकांतवास आणि रितेपणा यांच्या गरजा भागविण्यासाठी त्यांची स्मरणशक्ती विस्तारित होते. त्यात ते डोकावून बघतात. त्यांनी आजवर जी जी पुस्तके वाचली होती, त्यांचे त्याना स्मरण होते. आणि त्यांना जे काही आठवते त्यांच्या आधाराने ती स्मरणशक्ती टांचणे करते. ही टांचणे चांगलीच विक्षिप्त आहेत. प्रथम ते प्रवाहाबरोबर वहात जातात आणि मग ते नवनिर्मिती करतात." या व्हलरी यांच्या टाचणात फ्रायडे या व्यक्तीचे नाव फक्त एकदा डोकावले. परंतु इतरांची गैरहजरी अथवा एखाद्या पिशाच्चासारखी हजेरी इतर हा जो इतरां पात्रांच्याबाबतीत प्रश्न होता, तो व्हलरी त्याचवेळी बाहेर थर्टी इयर्स वॉर (तीस वर्ष चाललेले युद्ध) या नावाने युरोपीय इतिहासात ओळखल्या जाणाऱ्या युद्धातला तोफांचा गडगडाट होतच होता. बोहेमिया आणि हंगेरी या विभागांचे बादशहा फर्डीनंड यांचे जर्मनीतील फ्रँकफुर्ट या शहरी 'होली रोमन एंपरर' हा किताब देऊन राज्यारोहणसमारंभ झाला. हा सारा गदारोळ बाहेर

चालू असताना ते COGITO कॉगिटो आणि ONTOLOGICAL ARGUMENT ऑनटालॉजिकल ऑरग्यूमेंटचा शोध लावतात. (COGITO ERGOSUM या लॅटिन वाक्याचे भाषांतर मी विचार करतो, याचा अर्थ म्हणून मी आहे---- I think therefore I am हे कोणाच्याही त्याच्या स्वत:च्या अस्तित्वाविषयी मुलभूत निश्चिती नक्की करण्यासाठी डेकार्ट यांनी केलेल्या प्रतिपादनातील सूत्र. या सूत्राचा आधार सामान्यपणे ते नेहमी घेत. ONTOLOGY – अस्तित्व म्हणजे काय, वास्तव अस्तित्व आणि भासणारे अस्तित्त्व यातील फरक काय याचा शोध घेणारी तत्त्वज्ञान या ज्ञानशाखेची एक शाखा. ) या अशा कादंबरीसदृश्य निवेदनाशी तुलना करता नंतरच्या काळात रती– सुख प्राप्त करून घेण्याकरता रचलेल्या बनावट गोष्टी, या व्हॅलरी याना किती सपक वाटल्या असतील याची कल्पना करणे कठीण नाही.

थोडक्यात प्रश्न काय होता? मेंदूतच होत असलेल्या क्रिया– प्रतिक्रिया आणि लागणारे शोध यांची जी मालिका आढळते,या दोघांचा संबंध, ऐतिहासिक आणि आत्मचरित्रपर अशा आपल्या जीवनचौकटीशी कसा जोडायचा? निबंध आणि कादंबरी यांचे बेमालून मिश्रण कसे करायचे? ते सुद्धा अशा प्रकारे, एखादा निबंध अमूर्तपणे आधिभौतिक, आणि कादंबरी धाडसी गुंडाच्या साहसवादी वर्णनांनी भरलेली, या दोन्हींचे ते बेमालून असे मिश्रण असवायस हवे. या निबंधातील अमूर्त आधिभौतिकता जितकी अधिक, कादंबरीतल्या त्या धाडसी गुंडाच्या साहसांची वर्णने जितकी भरपूर, जितकाच या दोन्ही गोष्टींचा संयोग, मनाला अधिक भुरळ पाडणारा व हुशारीचा.

वरील परिच्छेदातील वर्णन लागू पडेल, अशीच एक साहित्यकृती, पॉल व्हॅलरी यांनी कधी काळी हातावेगळी केली. मॉसिएर टेस्ट या कादंबरीत, त्यांनी केवळ कल्पनेतील वाटावी, अशी एक व्यक्ती निर्माण केली. तिचे मन हेदेखील जगावेगळ. या अशा व्यक्तीला त्यानी अवती – भोवतीच्या जगात व निसर्गात, मुक्त संचारासाठी मोकाट सोडले; आणि मग जे काही झाले, त्याचे व्हॅलरीनी निरीक्षण केले व ते टिपले. मानवी मनाच्या राक्षसी प्रकृतीमुळे तो स्वत: आणि प्रत्यक्ष, यांच्या लक्षात आलाच असला पाहिजे. व्हॅलरी यांच्या हिसटोईर ब्रिसेए या पुस्तकाच्या पहिल्या आवृतीचे मुखपृष्ठ रंगीत आहे. त्यावर पुढील मथळा आहे. "त्यांचे बेट जरी निर्मनुष्य होते तरी त्यांनी डोक्यात एस पिस खोवले. हे असे केल्याने त्यांना असे वाटले होते की त्या पिसाकडे पाहाणारा कोणीतरी ते निर्माण करीत होते."

तोच या गोष्टीचा चमत्कार आहे. क्रुसोच्या त्या बेटावरच्या जीवनाचे अगदी परिपूर्णपणे एकमेकास पूरक ठरतील, असे दोन भाग करता येतात. एक फ्रायडे (भेट) पूर्व भाग, आणि दुसरा त्या भेटीनंतरचा भाग, एकाकीपणाच्या नाटकाने, एका सहकाऱ्यासाठी आवाहन केले होते. परंतु एका सहकाऱ्याचे आगमन झाल्यानंतर, हे आवाहन एकाएकी थांबविण्यात येते.

तथापि जो सहकारी आला होता, तो सर्वस्वी अनपेक्षित, आणि कडवट आणि नैराश्यजनक वाटेल असा नीग्रो होता. असे होते तरी धाडस, साहस, आणि कल्पक शोध या सर्व गोष्टींचे आश्चर्यकारक असे नूतनीकरण होईल, असा विश्वास, दिलासा व खात्री त्या निग्रोच्या आगमनाने रॉबिनसन यांना मिळाली होती. याशिवाय हेही स्पष्ट आहे की क्रुसो यानी ज्या प्रकारचा सहकारी– दुसरा एखादा इंग्लिश– दुसरा एखादा रॉबिनसन– येईल अशी आशा केली होती. तसे घडले असते तर हे कथानक फारच सपक झाले
असते.

मी माझ्या फ्रायडे या कादंबरीत या दोन भागांच्या अगोदर आणखी एक भाग आणला आहे. त्या भागाला 'डुकरांचे चिखलात लडबडणे' असे नाव मी दिलेले आहे. या गोष्टींना त्यामुळे द्वंद्वात्मक स्वयंगतीची (DIALECTICAL) संरचना प्राप्त होते. क्रुसोला अशी आशा होती की त्यांचा शोध कोणा ना कोणाला तरी लागेल. ही आशा फोल ठरली. बेटाजवळून जाणाऱ्या बोटींना त्यांनी खुणा केल्या, संदेश पाठविले, एक होडीही तयार करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. हे सारे प्रयत्न अयशस्वी ठरल्यानंतर नैराश्य आणि खिन्नता यांनी भरलेल्या कालखंडाचाही त्यांनी अनुभव घेतला. हे अनुभव त्यांना येणे, त्या कथानकाच्या तर्कशास्त्रात अनुस्यूत आहे. यानंतर त्यांना एका चिखलाच्या डबक्याचा शोध लागतो. या डबक्यात दिवसा पराकोटीचा ऊष्मा असला तरी त्या वेळात, पेकारीज प्राण्यांचा गट (हे प्राणी डुकरांसारखेच असतात) डुंबण्यासाठी येत असे. या प्राण्यांची नक्कल करून, क्रुसो या चिखलात डुकरांप्रमाणेच लडबडत असत. ते फक्त आपले नाक व तोंड चिखलाबाहेर ठेवी. या सर्व प्रयत्नात 'क्रूर भासेल अशा बेशुद्धावस्थेत गेला होता, त्या चिखलातून जे जीवघेणे वायू बाहेर पडत, त्याने त्याचा एकदा खरोखरच जीव जाण्याची पाळी आली होती.

ही घटना, ही त्या बेटावरील क्रुसोच्या आयुष्यातील अगदी तळातला बिंदू. नंतर मात्र, त्याने आपल्या नियतीवर, आपले स्वत:चे नियंत्रण पुन्हा एकदा प्रस्थापित करण्यास सुरुवात केली. तो डोंगर चढून जातो. आपल्या स्वत:साठी नियमावली तयार करतो. ते बेट हे जणू एक इंग्लिश वसाहत आहे, अशा स्वरूपात त्या बेटाचे संघटन करतो आणि त्या बेटावर शेतीही करतो. मी या कालखंडास 'प्रशासनाचे युग' हे नाव दिले आहे. हे नाव देण्याचे एक कारण आहे. हे कथानक ज्या कालखंडात घडले, तेव्हा इंग्लंडमधील प्युरीटन– पंथी लोक हातात बायबल घेऊन, नव्या जगात तोवर नांगराखाली न आलेल्या व अजूनही निसर्गावस्थेत असलेल्या भूमीवर चढाई करून त्यांचे त्यांनी वसाहतीत रूपांतर करण्यास सुरुवात केली होती. फ्रँकलीन यांच्या 'पुअर रिचर्डस आलमनाक' (गरीब रिचर्डचे पंचांग) या पुस्तकात नियमबद्ध केलेल्या 'धनसंचय ही नैतिकता' या सूत्राकडून या प्युरीटनाना स्फूर्ती मिळाली होती. या पुस्तकात ग्रथित केलेल्या नितिनियमांनी अनिर्बंध भांडवलशाही उद्योग आणि काल्व्हिनिझम– एक ख्रिश्चन धर्मपंथ– या दोहोत असलेले अंतर आता भरून निघाले

होते. या प्युरीटनपंथी नीतिनियमांनी भारावून गेलेल्या या 'प्रशासन युगा'तील क्रुसोंची अशी श्रद्धा असते की, हेच मोक्ष प्राप्त करून घेण्यासाठी, उत्पादक श्रम हीच एकमेव आशादायक कृती. परंतु तो एकाकीपणाच्या अवस्थेत असल्याकारणाने त्याचे श्रम व्यर्थ आहेत, आणि त्यानी उत्पादन केलेले धान्य, सुकवलेले मांस, मासे, फळे, हा शहाणपणाचा गाभा नसून, एखाद्या मूर्ख माणसाने केलेली चूक यांचेच स्वरूप त्या श्रमांना अधिक करून प्राप्त झाले असते.

सुरुवाती सुरुवातीला असे वाटते की हे बेट संघटित करण्याच्या क्रुसोच्या वेड्या प्रयत्नाना, फ्रायडेच्या हजेरीमुळे अर्थ प्राप्त झाला आहे. राज्याचा तो एकमेव 'प्रजाजन' बनतो. क्रुसो यांच्या सैन्यातील एकमेव शिपाई, राज्यपाल क्रुसो यांचा एकमेव करदाता, या सर्व 'मागण्यांना' फ्रायडे मान्यता देतो किंवा निदान तसे भासते तरी. परंतु तोवर त्या बेटाची जी संघटनात्मक संरचना होती ती फ्रायडे यांच्या हजेरीमुळे पुरेशी आहे याचे एक कारण होते. एकतर सरतेशेवटी क्रुसोही आपणा स्वत:कडे फ्रायडेच्या नजरेतून पाहावयास लागला. म्हणूनच आपल्या स्वत:च्या वेडेपणाचे मोजमाप घेणे त्याना भाग पडले. त्याजबरोबर हेही स्पष्ट आहे की फ्रायडेला यातले काहीही समजत नाही. क्रुसोच्या मनात असलेली आणि त्यानी प्रयत्नपूर्वक निर्माण केलेल्या विचारपद्धतीच्या केंद्रस्थानी, फ्रायडेने संशयाचे बीज पेरले. आजवरची क्रुसो यांची विचार पद्धती केवळ आंधळ्या श्रद्धा व समजुती यांच्या आधारानेच उभी होती. यामुळेच फ्रायडे ज्यावेळी अर्धवट अजाणतेपणामुळे क्रुसोने साठविलेल्या दैनंदिन जीवनाला उपयुक्त अशा वस्तूंचा साठा आणि बुडालेल्या जहाजावरून आणलेल्या व वाचविलेल्या संग्रहणीय वस्तू यांच्या नाशास कारणीभूत होतो, त्यावेळी क्रुसो यांची त्याबद्दलची प्रतिक्रिया फारच सौम्य असते. जणू काही ते भविष्यकाळात असे काही होणार आहे अशी अपेक्षा आजवर करीत होते. तसेच या अशा प्रकारचे संकट कोसळावे, अशी जवळ जवळ ते इच्छाच करीत होते.

त्यानंतर, फ्रायडे याच्या इच्छेनुसार सारे काही घडते. फ्रायडे हा आता 'शोधक' बनतो, आणि तो क्रुसो यांना 'शोध' लावण्यासाठी सक्ती करतो. हे शोध लावण्यासाठी क्रुसो यांनी जे मार्ग वापरले होते, त्याचे वर्णन पुढील शब्दात करता येईल. एकतर ते काम त्यानी अत्यंत घाबऱ्या घुबऱ्या मन:स्थितीत केलेले होते. दुसरे क्रुसो यांनी त्या बेटावर जे प्रशासन तयार केले होते ते क्रुसो यांनी मागे ठेवलेली जी संस्कृती होती त्याची अत्यंत काटेकोर प्रतिकृती होती. फ्रायडे, हवेत तरंगणारा, वायुदेवभक्त अशा प्रकृतीचा मनुष्य. बाण, पतंग, हार्प हे वाद्य हे त्यांचे स्थाईभाव. फ्रायडेत जे गुण आहेत, तेच त्यांचा नाश व्हावा या हेतूनेच जणू प्रत्यक्षात कट करतात. याच कारणामुळे, त्या बेटाच्या किनाऱ्याजवळ नांगर टाकून उभे असलेले प्रथम श्रेणीच्या इंग्लिश जहाजाने, जे आकर्षण निर्माण केले होते, त्याचा प्रतिकार त्याना कसा करता आला असता. क्रुसो सर्वप्रथम या वसुंधरेचे जे साम्राज्य आहे त्याचे

नागरीक होते. त्या राज्याशी त्यांची बांधीलकी होती. ते एखाद्या शेतकऱ्याप्रमाणे, संथगतीने हालचाल व काम करणारे, वागण्यात ओबडधोबड. या पृथ्वीतलावरील त्यांचा जो धंदा आहे, त्यातच ते अगदी परिपूर्णतेने जगतात. ते आपल्या बेटावर, मुलाने आईवर जसे प्रेम करावे तसे प्रेम करतात (गुहेतील आतील भागातील प्रसंग) त्यानंतर पती पत्नीवर प्रेम करतो त्याप्रमाणे प्रेम करतात (मँड्रागोरा प्रसंग) हे सारे घडते फ्रायडेची व त्यांची भेट होण्यापूर्वी. फ्रायडे भेटल्यानंतर, मात्र त्यांचे हळूहळू परिवर्तन होते. परिणामी ते सूर्याकडे वळतात. कालांतराने हे परिवर्तन फ्रायडेच्या प्रभावाखाली पूर्णतेला पोचते. 'फ्रायडे' या, माझ्या कादंबरीचे सूत्र हे पुढे दिलेल्या दोन समीकरणाने व्यक्त करता येईल :

पृथ्वी + हवा = सूर्य

पृथ्वीवरील क्रुसो + फ्रायडे = सूर्याजवळील क्रुसो

अशी नोंद घेण्यात आली आहे की, क्रुसोच्या या बेटावरच्या जीवनातील उत्क्रांतीच्या तीन पायऱ्या आहेत. प्रख्यात तत्त्वज्ञ स्पिनोझाने आपल्या एथिक्स (नीतिशास्त्र विचार) या ग्रंथात मानवी ज्ञानाच्या तीन पायऱ्यांचे वर्णन केले आहे. पहिल्या प्रकारचे- पायरीचे ज्ञान हे भावना आणि पंचेंद्रिये यांच्या मार्फत आपणास मिळते. वैयक्तिकता / आत्मप्रचीती , संलग्नता आणि तातडी ही त्या पहिल्या प्रकारच्या ज्ञानाची पद्धत आहे. दुसऱ्या प्रकारचे ज्ञान हे विज्ञान आणि तंत्रविज्ञान यात अंतर्गत आहे. याप्रकारचे ज्ञान हे बुद्धिप्रामाण्यवादी असले तरी ते वरवरचे आणि क्षणभंगुर,दोन गोष्टींना जोडणाऱ्या दुव्यासारखे आणि जवळजवळ सर्वच वेळ केवळ उपयुक्ततावादी असते. फक्त तिसऱ्या प्रकारच्या ज्ञानातून, परातत्त्वाचा (abolute)चा गाभा काय आहे यावद्दल अटकळ प्राप्त होते. एथिक्समध्ये वर्णन केलेल्या ज्ञानाच्या एकामागोमाग येणाऱ्या तीन ज्ञानप्रकारांचे, चांगल्या प्रकारची पुनर्निमिती, डुकराचे 'चिखलात लडबडणे, प्रशासकीय बेट आणि सूर्य उन्माद या तीन अवस्थात आहे. पहिल्या आणि तिसऱ्या अवस्थेत जी जवळीक आहे, ती ज्ञानाच्या पहिल्या आणि तिसऱ्या प्रकारातही आहे. या दोघातही तातडी आहे. निरीच्छता आहे. या उलट दुसरी अवस्था- बुद्धिप्रामाण्यवादी विज्ञान आणि मानवी बुद्धीच्या साहाय्याने चाललेले प्रशासकीय बेट- आहे.

अर्थात, ही समांतरता बुद्धिपुरस्सर आणलेली नाही. या ठिकाणी मी एक महत्त्वाची गोष्ट नमूद करू इच्छितो. माझ्या दृष्टीने गॉसपेल्सनंतर सर्वात महत्त्वाचा ग्रंथ कोठचा असेल तर तो एथिक्स. या ग्रंथाने दिलेले पाठ माझ्या मनात चांगलेच खोलवर गेलेले आहेत. मी हेही सांगितले पाहिजे की एकापेक्षा अधिक धर्मात आणि तत्त्वज्ञान पद्धतीत या तीन अवस्थांचा, अभिजात आकृतीबंध प्रतिबिंबित झालेला आढळेल. जीवनाच्या अत्यंत सामान्य पातळीवरही- अगदी सामान्य व दैनंदिन जीवनातही- याच आकृतीबंधाशी बहुतांशी जुळणारा आकृतीबंध दाखविता येईल. प्रत्येक स्त्री- पुरुषाला तीन मार्गानी जीवन जगण्याची मुभा असते. निखळ

निष्क्रीय आणि दिवस जातील तसे कमी आनंद देणारे जीवन. उदा. मद्य व ड्रग्ज यांचे सेवन अथवा तत्सम इतर गोष्टी करणे. सतत काम आणि सामाजिक महत्त्वाकांक्षा यांचे जीवन किंवा निखळ कलात्मक आणि धार्मिक चिंतनात घालविलेले जीवन. हरघडीचे अस्तित्व आणि स्पिनोझाप्रणीत आधिभौतिकता यांच्या दरम्यान जी जी दरी आहे, ती क्रुसोच्या तीन जीवनअवस्थांनी भरून निघते.

एका वाचकाने मला एकदा उम्मेखून विचारले की ज्या माणसाने– डॅनिएल डिफोने– मला हे फ्रायडे पुस्तक लिहवयास स्फूर्ती दिली, त्याच्या स्मृतीला मी माझे पुस्तक का अर्पण केले नाही? क्रुसोच्या निर्मात्याला माझी आदरांजली वहाण्याच्या दृष्टीने मला किमान तेवढे तरी करणे सहज शक्य नव्हते का? मी हे कबूल करतो की हा विचार माझ्या मनात कधीही आला नाही, कारण फ्रायडे या पुस्तकाच्या प्रत्येक पानावर डॅनिएल डिफोच्या इंग्लिश आदर्श साहित्यकृतीला आदरांजली वाहण्यात आली आहे, हे अगदी उघड आहे. वस्तुस्थिती अशी आहे की मी एक वेगळीच अर्पणपत्रिका मनात योजिली होती. मी ती अर्पणपत्रिका सरतेशेवटी त्याज्य ठरविण्याअगोदर कितीतरी दिवस त्याची मी वारंवार उजळणी करीत होतो. माझी मूर्ख अशी आदरांजली वाहण्याला मला परवानगी आहे का हे विचारण्यासाठी कोणताही मार्ग उपलब्ध नव्हता. तसेच ही संकल्पित आदरांजली ज्यांच्यासाठी होती तो फारच महान आणि आदरांजली वाहण्यापलीकडचा, फारच दूरवर होता. फ्रान्समध्ये देशांतर करून आलेल्या सर्व कामगारास मला हे पुस्तक अर्पण करण्याची माझी इच्छा होती. तिसऱ्या जगातून युरोपकडे बोटी भरभरून आलेले असंख्य, कसलीही कटकट न करणारे, शांतपणे सारे सहन करणारे, अल्जेरियन, मोरोक्कन, ट्युनिसिएन, सेनगलिज, आणि पोर्तुगीज हे सर्व मिळून तीन लाख; यांच्यावर आपला फ्रेंच– फ्रान्स अवलंबून आहे. आपण त्यांची दखलही घेत नाही. त्यांच्याबद्दल काही ऐकतही नाही. त्याना मतदानाचा हक्क नाही. कामगार संघटना बांधण्याचा हक्क नाही. त्यांचा प्रतिनिधी कोणीही नाही. म्हणूनच फ्रान्समध्ये छापून जे प्रसिद्ध होते, किंवा आकाशवाणीद्वारा प्रसारित होते, त्या दोहीतला बहुतांश भाग, हा त्यांच्यासंबंधी असावा, नव्हे त्यांच्याच मालकीचा तो आहे असे मानले तर ते तर्काला व बुद्धीला धरून आहे असे म्हणावे लागेल. आपला संपन्न फ्रेंच समाज या 'फ्रायडेजवर' भिस्त ठेवून आहे. या फ्रेंच समाजाने, या फ्रायडेजच्या तपकिरी रंगाच्या शरीरांना, आपली जाडजूड व रुंद अशी ढुंगणे टेकून त्याना साफ मुके केले आहे. त्या बिचाऱ्यांच्या तोंडून शब्दही फुटणार नाही अशा अवस्थेत आणून ठेवले आहे. हे फ्रायडेज फ्रान्समधले रस्ते झाडतात, स्ट्रॉबेरीज वेचतात, बंगल्यासमोरची हिरवळ कापून, ती हिरवळ नीटनेटकी ठेवतात, ओझी वाहून नेतात, आणि वेळप्रसंगी आपल्या दाराशी येऊन भिक्षाही मागतात. तथापि आम्ही फ्रेंच लोक अशा पद्धतीने वागतो की जणू त्यांना कोणालाही काही सांगायचेच नाही, किमानपक्षी निदान आम्हा गोऱ्या फ्रेंच नागरिकांना काही सांगायचे नाही. असे आहे तरीही त्यांनी

आमच्या शाळांत जाऊन शिक्षण घेतले पाहिजे. डेकार्ट, कार्निएल, आणि पाश्चर यांची सुसंस्कृत भाषा कशी बोलावी याचे शिक्षण घेतले पाहिजे. सर्वात महत्त्वाची गोष्ट कोणती असेल तर- आपण फ्रेंच लोक क्रुसोप्रमाणेच आंधळे व मूर्ख आहोत- ते फ्रायडेज कोण आहेत व ते कोठून आले, याचा विसर आम्हास सोईस्करपणे पडावा. आपण त्या सर्वांच्या मुसक्या बांधल्या आहेत. पण फ्रान्समधल्या एकंदर लोकसंख्येतला तो महत्त्वाचा व आवश्यक भाग आहे ही गोष्ट आम्ही गोरे फ्रेंच दृष्टिआड करतो. त्यांना गोऱ्या फ्रेंच समाजात जवळजवळ काहीच सहानुभूती दाखविली जात नाही. तसेच त्यांच्या बाबतीत क्वचितच सहिष्णुता दाखविण्यात येते. हे सारे जरी होत असले, तरी ते सर्व लोक, आपल्या या फ्रान्समधील फ्रेंच समाजाचा सर्वस्वी व पूर्णपणे आवश्यक असा भाग आहेत. फ्रान्समध्ये खराखुरा कामगारवर्ग अस्तित्वात असलाच, तर तो फक्त फ्रायडेजचा. या सर्व परिस्थितीबद्दल सावधान! या मुक्या मेंढरागत जनतेची कानठळ्या बसविणारी गर्जना होऊन, त्याजबरोबर असंतोष उफाळून वरती येईल. म्हणूनच पुन्हा एकदा सावधान !

---

आपल्या आत्म्याचं जे गूढसत्त्व असतं त्याला जागं करण्यामध्येच संगीताचं सार साठवलेलं असतं. ते शब्दातीत आणि अवर्णनीय असतं. आविष्काराची जी ठरीव, निश्चित साधनं असतात त्यातून ते सत्त्व व्यक्त होऊ शकत नाही. कल्पनांच्या आविष्कारासाठी आपण कधी शब्दांचा आश्रय घेतो. निश्चित, नेमक्या वस्तूंच्या, प्राण्यांच्या आविष्कारासाठी कधी चित्रकला, शिल्पकला यांचा आश्रय घेतो. पण जिथे या सर्व 'सांत' गोष्टींचा निश्चित उद्देश असणाऱ्या कलांचा ठरीव वस्तू साधनीभूत असणाऱ्या कलांचा शेवट होतो आणि जिथे विज्ञानदेखील तोकडे पडते तिथे संगीताच्या या सारभूत सत्त्वाला सुरुवात होते. म्हणून या कलेला 'धार्मिक' म्हणता येईल. कारण इथे श्रद्धा असावी लागते. ते 'आतून' जाणून घ्यावे लागते.

– मार्सेल प्रूस्त

---

कोणत्याही ललित निबंधात साहित्यातील अशुद्ध गोष्टींना, भेसळीला थारा नसतो. कधी मेहनतीच्या बळावर, कधी निसर्गाने उदार हस्ते दिलेल्या प्रतिभेच्या बळावर तर कधी दोन्हीच्या मिश्रणातून हा ललित निबंध निर्माण व्हावा. तो पाण्यासारखा निर्मळ, शुद्ध असावा. कंटाळवाणेपणापासून, थिजलेपणापासून, असंबद्ध, विसंगत गोष्टींपासून तो निबंध मुक्त असावा.

–व्हर्जिनिया वुल्फ–

---





अनुक्रमणिका

# साहित्य आणि संशोधन

## स्वयंप्रकाशी ताऱ्यांचे शोधनाट्य (भाग २)

**–नाना जोशी**

चरित्रलेखकाच्या चांगल्या भल्या मोठ्या टेबलाची कल्पना करा. चरित्रलेखकाला इतर लेखकांपेक्षा मोठ्या टेबलाची अगर डेस्कची जरुरी असते. त्याच्यावर कागदपत्रं, पुस्तके, जन्म-मृत्यूचे दाखले, वंशावळी, करारनाम्यांची छायाचित्रे, वकिली युक्तिवाद, आणि मूळ मुद्याला बगल देणे, अतिशयोक्ती, कल्पनारम्यता, बुद्धिपुरस्सर केलेला खोटेपणा, आणि दिखाऊ नम्रता, ...... या सर्वांनी ओतप्रोत भरलेली पत्रे, त्यानंतर प्रशस्तीपत्रे, छायाचित्रे, हस्तलिखिते, प्रासंगिक टिपणे, नोंदवह्या, रोजनिश्या, बँकेची चेकबुके, वृत्तपत्रातील कात्रणे, थोडक्यात सांगावयाचे म्हणजे जुने खोके साफ केल्यानंतर, अथवा एखाद्या डेस्कचे खण मोकळे करून त्यातल्या सर्व वस्तू जमा करून आणल्या तर जे दृश्य दिसेल त्यासारखेच चरित्रकाराच्या टेबलावरच्या वस्तूंची अवस्था असते. या चरित्रलेखनाला उपयुक्त असणाऱ्या सर्व साहित्यात वरकरणी तरी काहीही ताळमेळ नसतो. या चरित्रलेखनाच्या सर्व साहित्यात चरित्रनायकाच्या समकालीनांनी लिहिलेल्या आठवणी, – काही वेळा त्यांची संख्या किती प्रचंड असते – या आठवणींबरोबरच समकालीनांच्या नोंदवह्या, रोजनिश्या, त्यांची पत्रे, या सर्वांच्या जोडीला समकालीनांनी इतर लोकांची लिहिलेली चरित्रे यांचाही समावेश करावा लागेल. या सर्व साहित्याचा त्या प्रचंड टेबलावर चांगलाच मोठा ढीग असतो. हे सर्व साहित्य जमा करायला किती तरी वर्षांचे श्रम खर्ची पडलेले असतात. चरित्रलेखकाने एकत्रित केलेल्या ह्या सामुग्रीने त्याच्या मनात व हृदयातही प्रवेश केलेला असतो. चरित्र – नायक मृत्यू पावलेला असेल तर या जमविलेल्या साहित्यात एक विलक्षण फरक होतो. त्याच्या मृत्यूपूर्वी त्यातले महत्त्वाचे काय, याबद्दल निर्णय घेणे त्या मानाने सोपे असते. त्याच्या मृत्यूनंतर ही सारी सामुग्री त्यामानाने एकाच पातळीवर येते. सापेक्षरीत्या का होईना, त्यात एक प्रकारचा सारखेपणा येतो. आता त्यातला एकही कागद हा कमी वा अधिक महत्त्वाचा आहे, हे अगोदरच ठरविता येत नाही. उलट एखादे पत्र घ्या. ते गोडवा आणि प्रेम यांनी अगदी ओथंबलेले असते. परंतु ते खरोखरच प्रेमापोटी लिहिलेले होते का ती बनवाबनवी होती, याबद्दल निर्णय घेणे कठीण असते. याचे कारण एकच. ते म्हणजे त्या पत्रातील शब्दातून व्यक्त होणारे मुळातले जे ध्वनीचे सूक्ष्म असे आरोह –अवरोह असतात, तो ध्वनी काढणारा आवाज आता इतिहासजमा झालेला असतो. तसेच हे पत्र ज्या व्यक्तीस लिहिलेले होते, ती व्यक्ती या पत्राला झळाळी देण्यासाठी, अथवा ते पत्र येणे याचा अर्थ काय होता, हे सांगण्यासाठी, कदाचित उपलब्धही नसेल. या सर्व गोष्टी पूर्वी गम्य ठरल्या

असत्या, समजुतीच्या अवाक्यात होत्या, त्या आता अगम्य बनतात, अथवा समजुतीच्या आवाक्याबाहेर ज्या गोष्टी असतात त्यांनी वेढल्या जातात. रोजनिशीतून आणि नोंदवह्यातून अनेक प्रकारचे मूडस् आविष्कृत झालेले असतात. चिडचिड आणि राग, अवर्णनीय असा आनंद, अत्यंत कडवट शत्रुत्वापासून तो ख्रिश्चन धर्माला अभिप्रेत असलेल्या उदारतेपर्यंत साऱ्या भावना त्या रोजनिश्यात व नोंदवह्यात ग्रथित झालेल्या असतात. या नोंदीचा लेखक जेव्हा जिवंत होता, तेव्हा त्यातल्या प्रत्येक ओळीस एक विशिष्ट अर्थ होता. हे सारे कागद पत्र व चरित्रास उपयुक्त अशी खास सामुग्री आपल्या जिवंत सदसद्विवेकबुद्धीत शोषून घेणे एवढेच त्या चरित्रकाराला शक्य असते. चरित्रनायकाच्या सदसद्विवेकबुद्धीचे अस्तित्व केव्हाच संपलेले असते. म्हणूनच चरित्रकाराची सदसद्विवेकबुद्धी त्या नाहीशा झालेल्या सदसद्विवेकबुद्धीची प्रतिपालक होते. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास चरित्रकाराचे मन जे जिवंत असते, चरित्रनायकाच्या जीवनात सहभागी झालेले असते, त्याच्या सर्व आठवणी जागृत ठेवून असते असे हे मन मग एक गोष्ट करते. ती म्हणजे, जी साधनसामुग्री एक प्रकारे कालातीत झालेली आहे, त्या सामुग्रीला पुन्हा एकदा अर्थ प्राप्त करून देण्याचा ते मग प्रयत्न करते. विशिष्ट कालखंडात त्या सामुग्रीत अंतर्भूत असलेल्या साहित्याचा अर्थ ते मन उलगडून दाखविते; चरित्राला आधारभूत असलेली साधनसामुग्री ही कालातीत झालेली असते. जोसेफ कोनराड या प्रख्यात इंग्लिश लेखकाने एक ठिकाणी म्हटले आहे की 'जिवंत व्यक्ती' मृत व्यक्तींना जी नेमकी अशी प्रखरता व जीवनाची प्रत प्राप्त करून देतात, त्यानुसारच त्या मृत व्यक्तींचे जीवन व्यतीत होते. चरित्र ग्रंथात पुढे नमूद केलेल्या सर्व गोष्टी एकाचवेळी असतात. चरित्रग्रंथाला एक वाङ्मयीन अगर अर्थवैज्ञानिक, आणि ऐतिहासिक असा घाट असतो. तसेच चरित्रग्रंथासाठी अचेतन असे साहित्य नव्याने एके ठिकाणी आणलेले असते. त्या साहित्याला चरित्रकार अथवा इतिहासकार आपल्या मनाकरवी, शब्दाद्वारे, पुन्हा एकदा नव्याने प्रतिष्ठित करतो. चरित्रकाराचे मन हे इतरांना माहिती देणारे असते. त्याला चरित्रनायकाच्या आयुष्यातील घटना, एका विशिष्ट प्रकारे समजतात व उलगडतात, त्यानुसारच तो चरित्रकार, त्या घटना स्पष्ट करतो. असे करताना एका वहात्या व चौकस अशा पद्धतीने त्या घटनांचे तो कथन करतो.

त्यासंबंधात प्रख्यात अमेरिकन लेखक हेन्री जेम्स यांनी अत्यंत बोलक्या शब्दात आपले विचार व्यक्त केले आहेत. एखादी व्यक्ती जिवंत असते त्यावेळी हजारो बंध-अनुबंधानी ती बाहेरच्या जगाशी आणि अवती-भोवतीच्या माणसांशी जखडलेली असते. ती व्यक्ती मृत होताक्षणीच हे सर्व बंध-अनुबंध कायमचेच तुटतात. या दोन अवस्थात जो बदल आहे, त्याविषयी हेन्री जेम्स यांनी सांगितले आहे :

"एखाद्या व्यक्तीची फार मोठी कामगिरी संपली आणि तिचा आवाज कायमचा बंद झाला म्हणजे मग तुमच्या लेखी त्या व्यक्तीला जे फार उंच असे स्थान असते, त्या सर्वांना त्या व्यक्तीची प्रतिमा ही अगदी अनोखी अशी, सोपी, सुटसुटीत आणि सारस्वरूप झाल्यासारखी दिसते. मृत्यूचा हात त्या व्यक्तीच्या अंगावरून ज्यावेळी फिरतो, त्यावेळी त्या व्यक्तित्वात

असलेल्या सुरकुत्या काढून, ते व्यक्तित्व सर्वसाधारण व प्रमाण (Typical) होते. स्मृतीत या व्यक्तीची जी प्रतिमा अजूनही टिकून राहिलेली असते, तिला घनता व प्रखरता प्राप्त होते. व्यक्तीच्या जीवनातील अकल्पित घटना व अपघात सोडून दिले जातात. काही प्रसंगांची या जीवनावर जर सावली पडलेली असेल तर त्याची मोजदाद होण्याचे थांबते. ही व्यक्ती तशा काहीशा धूसर पण अनेक शक्यतांची नसते. या उलट हे व्यक्तित्व काही थोड्या संस्मरणीय व आदरणीय, अशा गोष्टींचे अत्यंत रेखीव असे व्यक्तित्व या स्वरूपात ते खडे असते. "चरित्रनायकाचे जीवन हे अनुभव आणि भावना या दोहोंनी भरलेल्या अगणित क्षणांचे व चांगले संपन्न असे जीवन असते. ते आता विस्कळीत व विघटित होऊन बसते. त्यात एक प्रकारचा विलक्षण सुटसुटीतपणा येतो."हे जर खरे असेल, तर मग हेन्री जेम्स यांचे वर उद्धृत केलेले विचार योग्य संदर्भात ठेवून त्याचा विचार करूया.

हा कादंबरीकार, नुकताच मृत्यू पावलेल्या आपल्या जेम्स रसेल लोवेल या प्रिय मित्राबद्दल लिहीत होता. लोवेल व जेम्स यांची मैत्री तीस वर्षापेक्षा अधिक काळ होती. लोवेल यांची प्रतिमा मनात ठेवूनच त्यानी ते शब्द लिहिले होते. जेम्स यांनी लोवेल यांच्या स्मरणार्थ फारच सुरेख लेख लिहिलेला आहे. त्यांच्या या लेखात लोवेल यांच्या व्यक्तित्वाच्या अनेक पैलूचे दर्शन वाचकास होते व त्याची प्रचीतीही येते. उदा. हेन्री जेम्स यांचे हार्वर्ड विद्यापीठातील विद्यार्थीदशेतील दिवस. हिवाळ्यातल्या दिवसात दुपारी सुमारे चारची वेळ. बाहेर चांगलाच अंधार होता. (अमेरिकेत हिवाळ्यात फारच लवकर अंधार होतो) त्या काळी अमेरिकेतही वीज अजून यायची होती. म्हणून वर्गात रॉकेलचे दिवे आणण्यात येत. या दिव्यांच्या प्रकाशात लोवेल यांचा दाढीधारी चेहरा चांगलाच उजळून निघे. ते देत असलेल्या व्याख्यानात ती कायमची स्मरणात राहावीत असे वाङ्मयीन व काव्यात्मक गुण असत. ही व्याख्याने तरुणपणी हेन्री जेम्स यांनी ऐकली होती. त्यानंतर १८७० साली पॅरिसमध्ये त्यांची व हेन्री जेम्स यांची भेट झाली. रसरशीत व उत्साही अशा या अमेरिकन कवीबरोबर जेम्स यांनी लेफ्ट - बँक या पॅरिसमधील भागातील एका छोट्या उपाहारगृहात रात्रीचे जेवण घेतले. या नंतर ते दोघे THEITRE FRANCOIS या नाट्यगृहात, नाटक पाहावयास जाणार होते. नाट्यगृहात जाण्यासाठी त्यांना सीन नदीवरील पूल ओलांडावा लागणार होता. पॅरिसमधील गॅसच्या दिव्यांच्या प्रकाशामुळे व्हॅर्निशचा हात मारला आहे. असा परिणाम सीन नदीतील पाण्याच्या पृष्ठभागावर झाला होता. या अशा पार्श्वभूमीवर कवी लोवेल यांचे दर्शन जेम्स यांना झाले होते. अगदी आरंभीच्या काळातील लोवेलही जेम्स यांच्या या लेखात आहेत. या काळात कवी लोवेल यांनी अमेरिकन यादवी युद्धात कामी आलेल्या तरुणाबद्दल आणि दुसऱ्याही अनेकांच्या स्मरणार्थ उदात्त ठरेल अशी काव्यरचना केली होती. त्यानंतर लोवेल हा कवी - लेखक इंग्लंडमध्ये अमेरिकेचा परराष्ट्र वकील, या स्थानावरून आपली जबाबदारी पार पाडत होता. हेन्री जेम्स व त्यांची तेथेही भेट झाली होती. व्हिक्टोरिया राणीच्या काळातील उमरावांच्या घरातही त्यांच्या भेटी झाल्या होत्या. कवी - लेखक, परराष्ट्र वकील लोवेल त्या ठिकाणी इंग्लंडमधल्या उमरावांना 'अमेरिकन

लोकशाही' या विषयावर व्याख्याने देत असत.

लोवेल हे इ.स.१८९१ साली मृत्यू पावले.त्यावेळी हेन्री जेम्स यांना ज्या घटना 'संस्मरणीय व आदरणीय' वाटल्या त्याच घटना 'संस्मरणीय व आदरणीय' होत्या हे ओघानेच आले. पण, आपण एका शतकाचा काळ लोटल्यानंतर हेन्री जेम्स यांच्या मृत्यूनंतरही अनेक वर्षांनी त्या घटनांसंबंधी विचार केला तर आपणास काय आढळते? इतकी वर्षे होऊन गेल्याकारणाने, त्या सर्व घटना अधिकच सारस्वरूप झाल्या आहेत, व कवी लोवेल यांच्यापासून आपणास त्या दूर नेत आहेत असे वाटते. म्हणूनच हेन्री जेम्स यांच्या लिखाणात निश्चित असा शिळेपणा आलेला आहे, ते लिखाण फारच पुस्तकी व परभृत आहे, तसेच ते आता कालबाह्य लेखक म्हणून ठरले आहेत. या सर्वांचा परिणाम म्हणून ते विस्मृतीत लोटले गेले आहेत. काही वेळा आपल्या या विसाव्या शतकातील तरल विचारपद्धतीच्या अनुषंगाने ती अगदी भोळीभाबडी व पक्षपाती व्यक्ती होती. असेही वाटते. त्यांच्या काही लेखातून, निबंधातून, ते आपणास अनेक अंगांनी चांगलेच जिवंत आहेत याची खात्री पटते. खास करून जेम्स यांच्यासारखा लेखक, कवी लोवेल यांना अगदी रसरशीतपणे जिवंत करतो, त्यावेळी जरा वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास जेम्स यांनी जे लिखाण केले. ते आपल्या दृष्टीने दस्तऐवज झाला आहे. एक अतिशय सुंदर असा दस्तऐवज पण दस्तऐवजच. कवी लोवेल यांच्या चरित्रग्रंथासाठी उपयुक्त ठरतील अशा साधनांनी अगोदरच पार वाकलेल्या टेबलावर आणखी एका बोलक्या दस्तऐवजाची भर पडली आहे. जेम्स यांच्याप्रमाणे लोवेल यांचे दुसरेही अनेक समकालीन होते. त्या सर्वांनीही लोवेल यांच्या चरित्रग्रंथाच्या साधनात भर टाकलेली आहे.

चरित्रलेखकाचे काम नेहमीच गुंतागुंतीचे असते. चरित्रलेखकाला उपलब्ध दस्तऐवजात नमूद झालेल्या प्रसंगांनी टाकलेल्या छाया– पडछाया आणि वेगवेगळे दृष्टिकोन यात वावरणे भाग आहे. या सर्व साहित्याला चरित्रलेखकाने चाळणी लावावयाची, त्यांचे मूल्यमापन करायचे आणि मग त्यातून नवनिर्मिती करावयाची. चरित्रलेखकाचे काम दुसऱ्याही काही गोष्टीमुळे सारखे वाढतच असते. उदा. चरित्रनायकाची, अगोदरच्या लेखकांनी लिहिलेली चरित्रे त्या 'टेबलावर' येऊन पडतात. त्यांच्याशी मुकाबला करणे प्राप्तच असते. विवेचनातल्या या ठिकाणी चरित्रलेखक या संज्ञेखाली येणाऱ्या व्यक्ती व्यक्तीत फरक करणे आवश्यक आहे. चरित्रकार दोन प्रकारचे असतात. त्यापैकी एक चरित्रग्रंथासाठी सर्व उपलब्ध साधने, व दस्तऐवज यावर केवळ भिस्त ठेवून लेखन करणारा चरित्रकार. दुसरा मृत चरित्रनायकाशी मैत्री. परिचय असल्याकारणाने, त्याचे स्मरण चिरकाल टिकावे, या भावनेतून चरित्रग्रंथ सिद्ध करणारा लेखक. या दुसऱ्या प्रकारचे लेखक जेम्स बॉसवेल होते.



अनुक्रमणिका

२

जेम्स बॉसवेल हे कशा प्रकारचे गृहस्थ होते? प्रा. फ्रेडरिक ए. पोट्टल यांनी त्यांचे चरित्र लिहिले आहे. त्या चरित्रग्रंथात बॉसवेल यांच्या सर्व परस्परविरोधी अशा अवस्थांचे दर्शन वाचकास घडते. अमेरिकेच्या येल विद्यापीठात बॉसवेल यांच्यासंबंधी प्रचंड साहित्य उपलब्ध आहे. (याचा उल्लेख या पूर्वी येऊन गेला आहे) या सर्व साहित्याचं संपादन करण्यासाठी प्रा. पोट्टल यांची नेमणूक झालेली होती. प्रा. पोट्टल यांचे एकंदर काम चांगलेच विस्तृत, अर्थवाही आणि अधिकारी ठरेल अशा स्वरूपाचे आहे. बॉसवेल हे पराकोटीला जाऊन, कशाचाही विधिनिषेध न बाळगणाऱ्या व्यसनाधीन माणसासारखे वेश्यागमन कसे करीत आणि तत्कालीन समाजात नाव, प्रसिद्धी, लौकिक मिळविलेल्या लोकांचा पाठलाग कसा करीत याचा सारा तपशील इंग्लिश वाङ्मयाशी परिचित असणाऱ्या सर्वांनाच चांगला परिचित आहे. प्रा. पोट्टल यांनी या सर्वांची अगदी तपशीलवार नोंद करून, ते आपल्या बॉसवेल यांच्या चरित्रात एका वेगळ्याच प्रश्नाला सामोरे गेले आहेत. चरित्रकार या नात्याने त्यांनी तसे करणे हे उचितच आहे. आपल्या चरित्रनायकाचा स्वभाव व व्यक्तित्व काय व कशा प्रकारचे होते, या संबंधीच ते प्रामुख्याने विचार करतात. प्रा. पोट्टल यांच्या विवेचनाच्या आधाराने लॉर्ड मेकॉले यांनी अनेक वर्षांपूर्वी जो प्रश्न उपस्थित केला होता, त्या कूट प्रश्नाचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न करणे शक्य होते. लॉर्ड मेकॉले यांनी पुढील प्रश्न उपस्थित केला होता. "या अठराव्या शतकातील गांवढळ (PROVINCIAL) विदूषक आणि नीतीशून्य व्यक्तिला वाङ्मयाच्या क्षेत्रातील अगदी वरच्या स्थानापर्यंत पोचण्याइतकी प्रगती कशी करता आली? चावट, वात्रट व सर्वत्र नाक खुपसणारे, अशी बॉसवेल यांची कुप्रसिद्धी होती. बॉसवेल यांना स्वत:लाही हे सारे वर्णन मान्य होते. त्यांचे आपले स्वत:बद्दलचे मत फार वाईट होते व आपण अगदी खालच्या पातळीवरचे नागरीक आहोत, असे ते कबूल करीत. अशा या माणसाने डॉ. जॉनसन यांचे चरित्र कसे काय लिहिले?

हा कूट प्रश्न व्हिक्टोरियन काळाला साजेसा होता आणि त्याला समर्पक उत्तर कार्लाईल यांनी दिलेले आहे. तसे असले तरी तो प्रश्न अजूनही एक मानसशास्त्रीय कोडे आहे. त्यातील अनेक तपशील अगदी घासून-पुसून पाहिल्यानंतरही त्या प्रश्नात अनुस्यूत असलेला अंतर्विरोध आपल्या दृष्टीस पडतो. बॉसवेल यांना प्रख्यात फ्रेंच तत्त्वज्ञ व लेखक जाँ. जॅकस रूसो यांस भेटण्याची इच्छा होती. त्यासाठीच बॉसवेल यांनी स्वत:चेच शब्दचित्र रेखाटणारे टिपण तयार केले होते, ते वाचकास उपलब्ध आहे. त्याच्या अनुषंगाने त्यांच्या व्यक्तित्वाचा शोध घेता येईल. जेम्स बॉसवेल यांना समकालीन प्रसिद्ध व्यक्तींना भेटण्याचे व्यसनच होते. हे करण्यासाठी स्वत:ची जाहिरात करणे आवश्यक होते. हे सारे ते केवळ व्यसनापोटी, अथवा हौसेपोटीच करीत नसत. आपणास कीर्ती प्राप्त व्हावी, लोकांचे लक्ष आपल्याकडे खेचले जावे, हाही या वागणुकीमागचा हेतू होता. या आपल्या सवयीला अनुसरून, तत्कालीन फ्रेंच तत्त्वज्ञ जाँ. जाकस रूसो, यास भेटावयास गेले होते. रूसो यांना भेटावयास जाण्याअगोदर आपण कोण आहोत, आपले छंद, आपला स्वभाव व आपल्याला असलेल्या अडचणी हे सारे प्रश्न व विषय विशद

करणारे एक टिपण त्यांनी तयार केले, व ते रूसो यांना पाठवून दिले.हे टिपण मुळात फ्रेंचमध्ये आहे. रूसो यांना इंग्रजी समजले नाही. तर कदाचित भेट मिळणार नाही असे बॉसवेल यांना वाटले असावे. जेम्स बॉसवेल यांच्या या अति- छोट्या आत्मचरित्रामागेही मोठा इतिहास आहे. ते केव्हा, कसे व कुठे सापडले याचा वृतांत पुढे येईलच.प्रथम बॉसवेल यांचे हे आत्मचरित्रात्मक शब्दचित्र जेव्हा सापडले, तेव्हा रूसो यांना पाठविलेल्या 'पक्क्या' आत्मचरित्राबरोबर त्याचेच दोन कच्चे खर्डेही होते. सुरुवातीला त्यांनी एक कच्चा खर्डा तयार केला, पण काही कारणांनी त्यांनी तो रद्दबातल ठरविला. सरतेशेवटी त्यांनी जे टिपण (पक्के) पाठविले, त्या मुळात तयार केलेल्या 'पक्क्या' टिपणातही अनेक पाने त्यांनी रद्दबद्दल ठरविली होती. थोडक्यात तो 'पक्का' तर्जुमाही कच्चाच खर्डा होता. हे दोन्हीही कच्चे खर्डे त्यांनी रूसोला सरतेशेवटी जे टिपण पाठविले, त्याच्या बरोबरच संशोधकांना मिळाले. हे दोन कच्चे खर्डे व रूसोना धाडलेले टिपण या सर्वांची तुलना केली असता, त्यात कितीतरी ठिकाणी अगदी अद्‌भुत स्वरूपाची तफावत आहे. थोडक्यात त्याचे असे आहे की हे – दोन कच्चे खर्डे व रूसोच्या हाती गेलेले पक्के टिपण – हे तिन्हीही भविष्यकाळाच्या दृष्टीने दस्तऐवज ठरलेले कागद- हे बॉसवेल यांनी आपल्या पत्रात एक कोठचे तरी पक्के सूत्र कल्पून लिहिलेले नाहीत. बॉसवेल रूसोना पाठविलेले टिपण तयार करताना प्रयोग करीत असावेत. त्यांना हवा होता तो सूर गवसेपर्यंत त्यांचा कान प्रयोगशील असावा. सरतेशेवटी त्यांच्या तोवरच्या जीवनात जे वेगवेगळे सूर होते. त्यांना एकत्रित करणारा राग- बंदिश त्यांना सापडली व पक्के टिपण तयार झाले. बॉसवेल यांना मिळालेले शिक्षण, त्याच्या अनुरोधाने झालेली त्यांची जडण – घडण, आणि रोमँटिक अशी भावनोत्कटता या सर्वांबद्दलचा त्यांच्या मनातील कल्लोळ, या सूत्रांच्या आधारे त्यांचे पक्के टिपण तयार झाले असे दिसते. त्यांनी ही सूत्रेच निवडली याचे कारण, एमिल आणि ला नूव्हेल हेलोईज या दोन विचारप्रवर्तक ग्रंथाचे लेखक रूसो, यांचे लक्ष आपल्याकडे खेचून घेण्यास ती सूत्रे उपयोगी ठरतील असे त्यांना वाटले. याचे कारण 'एमिल' हा ग्रंथ शिक्षणविषयक होता व दुसरा रोमँटिक भावनोत्कटते- मागची कारणपरंपरा शोधणारा होता. एकदा या दोन विषयांशी संबंधित असलेल्या सूत्रावर लक्ष केंद्रित करायचे हा निश्चय पक्का झाल्यानंतर, त्यांनी कसलाही विचार न करता, दयामाया (आपल्या स्वत:च्या लिखाणासंबंधी) न दाखविता आपल्या कच्च्या खर्ड्यातील ज्या गोष्टी या सूत्राला धरून नव्हत्या, त्या रद्दबातल ठरविल्या. पहिला कच्चा खर्डा तयार करताना, ते तसे चाचपडतच होते. यामुळेच मागाहून त्यांच्या मनात निश्चित आलेल्या सूत्रांना सोडून असलेल्या अनेक फिजूल गोष्टी त्यात घुसल्या होत्या. यानंतर 'पक्का' खर्डा तयार झाला, हा खर्डा तयार झाल्यानंतर अखेरीस जी सूत्रे अत्यंत महत्त्वाची आहेत असे त्यांनी ठरविले. ती नक्की झाली. याचा परिणाम त्या पक्क्या खर्ड्यातील अनेक पात्रे मागे ठेवण्यात झाला. या सर्व गदारोळाचे अनेक परिणाम झाले. एकाचाच उल्लेख या ठिकाणी प्रस्तुत आहे. बॉसवेल यांनी मुळात जे आत्म-शब्द-चित्र रेखाटले (लिहिले) होते, त्याहीपेक्षा त्यांनी रूसोला धाडलेले टिपण वाङ्‌मयीन दृष्टिकोनातून विचार करता, कितीतरी बाबतीत अतिशय



अनुक्रमणिका

उजवे आहे. तसे असले तरी, चरित्रकारांच्या दृष्टिकोनातून विचार करता रूसो कडे गेलेल्या त्या पक्क्या टिपणातून अनेक पहिल्या श्रेणीचे महत्त्वाचे असे बॉसवेल यांच्या जीवनातील तपशील वगळण्यात आले होते.

जेम्स बॉसवेल यांचे आत्मचरित्रपर शब्दचित्र पुढील प्रमाणे आहे :

"महाराज, मी माझ्या जीवनाची रूपरेषा आपणास सादर करीत आहे. या जगातील ज्या व्यक्तींना, चरित्रे वाचण्यात आनंद वाटतो, त्यांची करमणूक करतील अशा काही प्रसंगाव्यतिरिक्त त्यांना या शब्दचित्रात काहीही आढळणार नाही. मि. रूसो आपणास हे शब्दचित्र एखाद्या खजिन्यागत वाटेल, असे म्हणण्यात मी काही चूक तर करीत नाही ना? आपणास मानवजातीचा अभ्यास करावयास आवडतो. आपल्या त्या संबंधीच्या आजवरच्या मतांना पुष्टी मिळेल, असा भरपूर पुरावा या रूपरेषेत आपणास सापडेल. वाईट शिक्षण मिळाल्याने होणाऱ्या परिणामांचे मी एक लोकविलक्षण असे उदाहरण आहे, असे आपणास आढळून येईल. मला ज्या गोष्टीत रस आहे. त्यांच्याबद्दलची माझी स्मरणशक्ती फारच चांगली आहे. माझी कल्पक़ता रसरशीत आहे. मला विचार करावयास येऊ लागल्या दिवसापासून माझी जडण-घडण कशी झाली? माझे अस्तित्व कसे होते, एकंदरीत माझे जीवन कसे विकसित झाले तेही मला आठवते. मी आपणास त्यासंबंधीच्या प्रमुख कल्पना सादर करणार आहे. मी माझा कमकुवतपणा लपविणार नाही. मी केलेले अपराध व गुन्हे आपणापासून दडवून ठेवणार नाही.

आदर्श स्वरूप अशा महान तत्त्ववेत्या! मी जसा आहे त्याच स्वरूपात आपण मला पाहावे. माझ्या स्वभावाच्या सर्व बाजू आपण तपासाव्यात. मला सुद्धा ते माप देऊनच आपण माझी परीक्षा करावी. मला तोलावे. आपण मला सल्ला द्यावा. कदाचित मी आपल्या सल्ला घेण्याइतका किमान योग्यतेचा आहे. असे आपणास आढळून येईल.

मी खिन्नता घेऊनच जन्माला आलो. ती माझ्या कुटुंबाची प्रकृतीच आहे. माझ्या नाटकातल्या अनेकांना ही प्रकृती तापदायक होऊन त्यांना फारच सोसावे लागले आहे. तथापि मी खिन्न प्रकृतीचा आहे, याबद्दल मला दु:ख नाही. मृदू व उदात्त हृदय ज्या व्यक्तींचे आहे, त्यांची तशी प्रकृती असते असा आजवरचा अनुभव आहे. परंतु या अशा प्रकृतीच्या व्यक्तींना, फारच काळजीपूर्वक दिलेल्या शिक्षणाची आवश्यकता असते. या व्यक्तींना मिळणाऱ्या शिक्षणाच्या बाबतीत दोन प्रकारचे धोके संभवतात. एकतर या व्यक्ती कमकुवतपणाच्या आहारी जातात; तसे झाले तर त्यांची सर्वस्वी हानी होते. दुसरे या व्यक्तींना, प्रत्येक गोष्टीला असा काही रंग देण्याची सवय होते की त्यामुळे त्यांचे सारे जीवनच कष्टमय होते.

माझे संगोपन फारच मृदुतेने झालेले आहे. त्याचा एक परिणाम असा झाला की मी फार लहानपणापासूनच आजारी पडू लागलो; आणि मी एक अत्यंत नाजूक असे बालक आहे म्हणून लोक माझ्याकडे अनुकंपेने पाहात. माझी आई ही तर पराकोटीची दयाळू. हा दयाळूपणा मोठा तोट्याचा होता. मला लहानसे जरी दुखणे झाले तरी ती फारच धास्तावून जाई. मग मला शाळेत जाण्यास बंदी करण्यात येई. माझी आई मला मिठाई तर देत होतीच. पण माझे मनोरंजन

करण्याच्या हेतूने अनेक प्रकारच्या सुंदर वस्तू भेट देत असे. मी बरा झालो, म्हणजे मग माझ्या गुलामगिरीला पुन्हा नव्याने सुरुवात होईल हे मला ठाऊक होते. म्हणूनच मी सशक्त आणि निकोप प्रकृतीऐवजी, अशक्त आणि आजारी असणेच पसंत करीत होतो. हा विचार किती चक्रमपणाचा! या अशा बदलासमोर नतमस्तक होण्याअगोदर निसर्गाने भयानक असा धक्का पत्करलाच पाहिजे. निसर्गाच्या राज्यात कोणत्याही बालकाला आजारपण कष्टप्रद आणि निकोपता ही आनंददायक आहे असेच वाटले पाहिजे. याच कारणासाठी बालकाने आजाराचा प्रतिकार करावा याबद्दल त्याला प्रोत्साहन देण्यात येते. या उलट मी आजाराला प्रोत्साहन देत असे. उड्या मारणे, धावाधाव करणे, याऐवजी मी आरामखुर्चीत लोळत पडलेला असे. मी असमाधानी व लहरी होतो. आश्चर्य हेच आहे की माझी तब्बेत तेव्हा खरोखरच चांगली असे त्यावेळी मी आजारी आहे असे वारंवार सांगितले जाई. या सर्वामुळे मोठी चमत्कारिक परिस्थिती निर्माण होई. सत्याचा आदर करावा हे तत्त्व माझ्या पूज्य पिताजींनी माझ्या मनावर चांगलेच बिंबवले होते. ते तत्त्वही माझ्या मनात चांगलेच घट्टपणे बसून राहिले होते. म्हणूनच मी खोटे कधीही बोललो नाही. परंतु माझे डोके दुखायला लागेपर्यंत, मी मान खाली घालून जमिनीकडे पाहात बसे आणि नंतर मी आजारी आहे, अशी तक्रार करीत असे.

माझी आई ही पराकोटीची धार्मिक. माझ्यावर तिची फार भक्ती होती. त्यानेच मला स्फूर्ती मिळे. परंतु दुर्दैवाने तिने मला कालव्हिनिझम ख्रिश्चन या पंथाची दिक्षा दिली. त्या धर्मपंथाची शिकवणूक मिळावी म्हणून तयार केलेली प्रश्नोत्तररूपी जी कौमुदी होती, त्यात त्या पंथाची काळीकुट्ट तत्त्वे ग्रथित केलेली हेती. 'शिक्षा ही कायमचीच' हे त्या काळ्याकुट्ट तत्त्वांपैकी एक अत्यंत महत्त्वाचे. मला आजवर स्फुरलेल्या कल्पनात, पहिली कल्पना कोठची असेल तर 'शिक्षा ही अनंत काळची' हे तत्त्व. माझ्या अंगावर त्यामुळे किती शहारे येत. अग्नी ही तशी 'जड' वस्तू आहे. त्या कारणाने, मला त्याची वास्तव कल्पना होती. स्वर्गलोकातील सुखाबद्दल मी विचार करीत असे पण तो क्वचित, कारण मला स्वर्गलोकाबद्दल तशी कसलीच कल्पना करता येत नव्हती. मी असे ऐकले होते की त्या ठिकाणी सगळे लोक अखंडपणे प्रभुनामस्मरण आणि प्रभुस्तुती यातच सारा वेळ व्यतीत करतात. त्याचबरोबर, मी अशाही कल्पना करीत असे की चर्चमध्ये जशी सामस् (PSALMS) गायली जातात, तसेच ते असावे. परंतु सामस् गाणे मला आवडत नव्हते. नरकात जाऊन पडू नये यासाठी आणखी दुसरा कोणता मार्ग उपलब्ध असता तर, मी स्वर्गलोकी जाण्याची इच्छा केली नसती. मी पुढीलप्रमाणे कल्पना करीत असे. नुकतेच अग्नीच्या भक्षस्थानी पडण्यातून वाचलेले काही लोक आहेत. या लोकांची एक विशिष्ट मन:स्थिती असते. याच मन:स्थितीत सतत, सातत्याने अनंत काळ राहून, हे स्वर्गलोकांतील लोक आपला वेळ घालवितात थोडक्यात शापित लोकांच्या दु:खदायक आरोळ्या ऐकताना आपण स्वत: सुरक्षित आहोत, याबद्दल आपले स्वत:चे अभिनंदन करणारे जे महाभाग असतात त्यांच्या सारखेच स्वर्गलोकातील त्या संताचे ते वागणे होते.

माझी आई ही (ख्रिश्चन धर्मातील) एका विशिष्ट धर्मपंथाची होती. प्रत्येक व्यक्तीने परमेश्वरला

सर्वस्वी शरण जाण्याचा जो अनुभव असेल, तो घेतलाच पाहिजे. तसे केले तरच तो नरकात जाण्यापासून वाचेल अशी या धर्मपंथीयांची श्रद्धा होती. ईश्वरी करुणेचे (GRACE) जे काही व्यापार असतील, त्यांना मी शरण जाते असे ती मला वारंवार बजावून सांगे. तिने माझ्या हातात एक पुस्तक ठेवले होते. या पुस्तकात अनेक छोटी मुले परमेश्वराला शरण गेल्याचे मी वाचले. त्यातले एक बालक, तर केवळ तीन वर्षाचे होते, असे वाचल्याचे स्मरते. या उलट, चोर, खुनी, चेटकीण आणि भुते या सर्वांबद्दलच्या अगणित गोष्टी घरातील नोकर मला सांगत, व माझे मन दुसऱ्या दिशेला नेत. या सर्व संस्कारांचा व माहितीचा परिणाम, माझी कल्पनाशक्ती सातत्याने भयभीत अवस्थेत जाण्यात होत होता. थोडक्यात मी अत्यंत भित्रा व घृणास्पद बनलो.

हे जरी सारे होते तरी वयाच्या आठव्या वर्षापासून तो बाराव्या वर्षापर्यंत माझी तब्येतही चांगली होती. माझ्यासाठी एका पालक- शिक्षकाची (Governor) ची नेमणूक करण्यात आली. हे सद्‌गृहस्थ भावनाशून्य आणि संवेदनाशून्यही होते. तथापि मला ज्यायोगे आनंद होईल, अशा प्रकारे त्यांनी माझे मन घडविण्यास सुरुवात केली. मला त्यानी स्पेक्टॅटर (Spectator) हे वृत्तपत्र वाचावयाची सवय लावली. या वाचनास सुरुवात केल्यानंतरच माझी कलाक्षेत्रातील अभिरुचीसंबधींची जडण- घडण झाली. उत्तम साहित्य कसे व कशा प्रकारचे असावे याविषयीच्या कल्पना माझ्या मनात आकार घेऊ लागल्या. मानवी स्वभावातील वैचित्र्याबद्दल विचार करण्यात जो आनंद असतो, त्याची जाण, मला या वृत्तपत्राच्या वाचनामुळे आली. मी रोमन कवींच्या काव्यांचे वाचन केले. माझ्या कुटुंबाची ग्रामीण भागात जहागीर होती. त्या भागातल्या अनेक अद्‌भुत कथा प्रचलित होत्या. मला या सर्वांबद्दल या रोमन कवींच्या साहित्यवाचनाने कल्पनातीत असा उत्साह वाटू लागला. माझे पालक - शिक्षक माझ्याजवळ कधीकधी धर्म या विषयावर संभाषण करीत. परंतु ते अगदी साध्या शब्दात आणि मला आवडेल अशा प्रकारे सांगत. त्यांनी मला असे सांगितले की मी जर चांगल्या प्रकारे वागलो, तर दुसऱ्या (स्वर्गलोकात) जगात गेल्यानंतर मी सुखी होईन, त्या ठिकाणी मला सुंदर संगीत ऐकायला मिळेल. पापभीरू व पुण्यवान लोकांना, ईश्वर दैवी ज्ञान देतो, त्याची प्राप्ती मला होईल. मी, ज्यांच्याविषयी आजवर वाचत आलो, त्या साऱ्या महान व्यक्ती आणि माझ्या ओळखीचे असलेले माझे सारे मित्र मला त्या ठिकाणी भेटतील. सरतेशेवटी सांगावयाचे म्हणजे, माझ्या पालक- शिक्षकांनी स्वर्गलोकाबद्दल माझ्या मनात प्रीती उत्पन्न केली, आणि माझ्या धैर्यात काही प्रमाणात आशेने प्रवेश केला.

जगातील लायक व कर्तबगार व्यक्तित माझ्या वडिलांची गणना होईल. ते नेहमी फारच कामात असत. म्हणून माझ्या शिक्षणाची त्यांना तशी प्रत्यक्षपणे काळजी घेता आली नाही. इतर लोक करतात तेच त्यांनीही केले. त्यांनी पालक- शिक्षकाच्या हवाली मला केले. पाच ते आठ वर्षापर्यंत मी शाळेत हजेरी लावीत असे. त्या ठिकाणी मी फारच कष्टी होतो. आठव्या वर्षापासून ते बारावे वर्ष संपेपर्यंत मी माझ्या पालक- शिक्षकाच्या देखरेखीखाली वाढलो. ही चारही वर्षे, एक रविवारचा दिवस सोडून दिला तर चांगली सुरवात व आनंदात गेली. माझ्या आजूबाजूचे

लोक ज्या कोणाला परमेश्वर म्हणून संबोधीत, त्या महाभयंकर प्राण्याची मला दर रविवारी आठवण करून दिली जात असे. सॅबाथ हा दिवस पाळण्यासंबंधी ख्रिश्चन धर्मातील स्कॉट – प्रेसबिटेरीयनपंथीय लोक अतिशयोक्त असे कर्मठ होते. प्रत्येक रविवारी मला चर्चमध्ये घेऊन जाण्यात येई. तेथे एकाच दिवसात (रविवारी) तीन प्रवचने ऐकणे भाग होते. त्यांच्याबरोबर अनेक उत्स्फूर्त अशा प्रार्थना म्हटल्या जात. अनेक 'साम'चे गायनही होई. सारे अगदी कडक शिस्तीत आणि रुक्षपणे केले जात असे. संध्याकाळी धार्मिक कौमुदीतील प्रश्नोत्तरे आणि स्तोत्रे माझ्याकडून म्हणवून घेतली जात. 'साम' या गाण्याचे अत्यंत निकृष्ट असे भाषांतर करावे लागे. माझ्या ख्रिश्चन धर्मानुसार परमेश्वराच्या पवित्र दिवशी (रविवारी) माझे रोजचे काम करावयाचे नाही. माझे स्वत:चे शब्द उच्चारायचे नाहीत (फक्त परमेश्वराच्या शब्दांचा उच्चार करायचा) माझा स्वत:च्या विचारासंबंधी विचार करावयाचा नाही." हे सारे त्या दिवशी मला करणे भागच होते. या परमेश्वरी आज्ञेनुसार वागण्याचे मी अगदी मनापासून प्रयत्न केले होते. विशेषत: माझ्या स्वत:च्या विचारासंबंधी विचार करावयाचा नाही ही आज्ञा मी मनापासून पाळण्याचा प्रयत्न केला होता. एखाद्या बालकाच्या मनाच्या दृष्टीने ही छानच कसरत होती.

मी बारा वर्षांचा झालो. तेव्हा माझे जे पालक– शिक्षक होते, त्यांची आमच्या पॅरिशमध्ये धर्मगुरू म्हणून नेमणूक झाली. दुसऱ्या पालक– शिक्षकाकडे मला सुपूर्द करण्यात आले. हे गृहस्थ अतिशय प्रामाणिक पण कठोर होते. त्यांना मानवी मनाबद्दल अजिबात ज्ञान नव्हते. शाळा आणि महाविद्यालयातील ठराविक व साचेबंद शिक्षणक्रम त्यांनी पार पाडलेला होता. नेमून दिलेल्या धड्यांचा अभ्यास त्यांनी अत्यंत बारकाईने व चांगल्या प्रकारे केला होता. ते जे काही शिकले होते, ते सर्वच त्यांनी आपला स्वत:चाच तो भाग आहे अशा पद्धतीने आत्मसात केले होते. ते अत्यंत ठोकळेबाज व कर्मठ विचारसरणीचे गृहस्थ. त्यांच्या मनात 'संशय' (अर्थात धर्माबद्दल) ही गोष्ट कधीच उत्पन्न होत नसे. परंपरा असेल अथवा जी काही पद्धत प्रचलित होती. त्यानुसार त्यांचे विचार व भावना होत्या. त्यांचे वर्तनही त्यांना अनुरूप असेच होते. एक दिवस मी जेव्हा त्यांना सांगितले की मला एक मित्र आहे, मी त्याच्यावर माझ्या भावापेक्षाही अधिक प्रेम करतो, हे ऐकल्याबरोबर त्यांनी मी 'महामूर्ख' आहे असे मला सुनावले. ही गर्जना करून ते पुढे म्हणाले, 'तुला प्रेम व आपुलकी कशी विकसित होते हे ठाऊक आहे का? प्रथम तू आपल्या माता– पित्यावर प्रेम करतोस, नंतर तुझ्या भावंडावर, त्यानंतर राहिलेल्या मानवजातीवर तू आपल्या प्रेमाची पखरण करावयाची.'' त्यांनी मला अभिजात लेखकांचे साहित्य वाचावयास लावले. परंतु त्या वाचनापासून मला काहीच आनंद मिळाला नाही. माझ्याकडून एखादे काम करवून घेण्या– व्यतिरिक्त त्यांच्या मनात दुसरी कोणतीही कल्पना वा विचार नसेल. मी त्यांना एखाद्या कवीबद्दल– माझ्या माहितीसाठी आणि करमणुकीसाठी– मी करमणूक करून घेण्याची संधी पाहू नये असे थोडेच होते– प्रश्न विचारला की त्यांचा तोल जाई व ते रागावत. एखाद्या शाळामास्तराच्या उर्मटपणे माझ्या अंगावर ओरडून ते म्हणत, 'चल काम कर काम कर.' मी देत असलेल्या पाठात अडथळा आणू नकोस काळ झपाट्याने मागे पडत आहे.'

या सर्वांचा परिणाम म्हणजे वाचन करण्याने मनाची मशागत होत नाही हे माझ्या मनात पक्के ठसले. मी अमुक अमुक लेखक वाचला आहे हे सांगण्यासाठी ते वाचन पुरेसे होते.

माझ्या बाराव्या वर्षी मला तुफान पडसे झाले होते. मला अनेक प्रकारची औषधे देण्यात आली. पण मला आराम पडला नाही. माझे पोट हे तसे स्वभावतःच कमकुवत होते. तेही फारच बिघडले होते. इतके की मी खाल्लेला कोठचाही पदार्थ पचविणे मला जवळ जवळ अशक्य झाले होते. या ठिकाणी मला एक कबुली दिली पाहिजे. त्या परिस्थितीत माझे जे काही अभ्यासाचे विषय होते. त्याकडे परत जावे लागेल. अर्थात बरा झालो तर ही भीती मनात होतीच. या उलट मी आजारीच राहिलो. तर तो अभ्यास करावा लागणार नाही हे मला माहीत होते. म्हणून त्या तशा परिस्थितीतही माझ्या मनात आशा पल्लवित झाली होती. माझ्या काळी स्कॉटलंडमध्ये जे जे कोणी नामवंत धन्वंतरी समजले जात, त्यांना साहाजिकच बोलविण्यात आले. परंतु मी इतका खट्याळ होतो की, या धन्वंतरीनी मला दिलेल्या औषधांचा माझ्यावर काहीही परिणाम होणार नाही यासाठी ज्या गोष्टी आवश्यक होत्या त्या सर्व मी केल्या. माझ्या पोटाच्या हालचालींवर काहीही करून, मी नियंत्रण ठेवीत होतो, आणि मला ते धन्वंतरी जी जी गोष्ट खाण्यास भाग पाडीत असत, ती मी लगेच बाहेर टाकीत असे. मी हातावर आलेले फोडही सहन केले. तसे केल्याने मला आता काम करावे लागणार नाही. म्हणून मीच माझे अभिनंदन केले. एका विलक्षण अशा मानसिक रोगाने मी आजारी आहे असे सर्व डॉक्टरांच्या मंडळाने ठरविले आणि मी हे कबूल करतो की त्यांची ती सल्लामसलत पाहून मी मनसोक्त हसलो होतो. मी शरीराने व मनानेही अशक्त झालो होतो. व माझी स्वाभाविक अशी खिन्नताही वाढीस लागली. स्कॉटलंडमधील मोफ्फाट या गावच्या उन्हाळ्यावर मला पाठविण्यात आले. तेथे माझा जीव रमविण्यास व करमणूक करून घेण्यास परवानगी होती. मला त्या गावी हुषार, चुणचुणीत व ज्यांचा उत्साह ओसंडून वहातो आहे असे अनेक लोक भेटले. मलाही हसावे, बोलावे व भटकावेसे वाटत होते. माझ्या सर्व आयुष्यभर मी निश्चितपणे आजारीच राहणार आहे, अशी कल्पना करून घेतल्यानंतर मी निरोगी होण्याचा मूर्खपणा केला.

तेराव्या वर्षी मला विद्यापीठात धाडण्यात आले. त्या ठिकाणी मला अधिक स्वातंत्र्य होते. ती जागाही मला आवडली होती. मी विद्यापीठात एकंदर तीन वर्षे भाषांचा अभ्यास करण्यात घालवली, व त्या भाषात चांगले प्रावीण्य संपादन केले. मी फार मोठा माणूस होणार हे भविष्य माझ्या प्राध्यापकांनी वर्तविले होते.

माझे मन हिरवे व इच्छा बळकट बनल्या. मला सारखे भय वाटत असे, कारण कदाचित मी पाप करीन आणि मग मला नरकात जावे लागेल. बायबलमध्ये वाचलेल्या काही व्यक्ती आठवल्या व त्यांचे अनुकरण मी केले पाहिजे असे माझ्या अस्वस्थ मनात आले. कालांतराने हे वेड मागे पडले. सोळाव्या वर्षी दुर्दैवाने मला भयानक अशा हायपोसोन्ड्रायाने (स्वप्रकृतीचिंता-ग्रस्ततेने) मला गाठले या रोगाने माझा ताबाच घेतला होता. मी तर्कशास्त्र आणि तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला. या अभ्यासाचा काहीही उपयोग वा परिणाम झाला नसावा, कारण त्याचवेळी

मी ख्रिश्चन धर्मातील मेथडिस्ट या पंथाची दीक्षा घेतली. काही दिवसांनी मी मोफ्फाटला परत गेलो. तेथे मला एक पायथागोरसपंथी वृद्ध गृहस्थ भेटला. मी त्याच्याशी गट्टी केली. या नंतर कधीही मांस भक्षण करायचे नाही असा एक निश्चय त्यावेळी केला. मानवतेसाठी हौतात्म्य स्वीकारायचे ठरविले. त्यासाठी काय वाट्याला येईल ते सहन करायचे असा पणही केला. सर्वच मानवजातीकडे मी भयाने पाहात होतो. कालांतराने हेही सारे मागे पडले. कसे ते माहीत नाही. मला वाटते, जी मते प्रचलित होती, ती मी सातत्याने ऐकत होतो. त्यांना शरण जावयाच्या प्रवृत्तीमुळे मी ते सारे निश्चय व पण केले असावेत. मी हे सारे आपणास बराच काळ लोटल्यानंतर लिहीत आहे. पण ते तसे कां घडले, हे मला अजूनही स्पष्ट झालेले नाही.

अठराव्या वर्षी मी कॅथलिक झालो. वडिलांचे प्रेम, आकांक्षा, हितसंबंध यांच्या विरूद्ध मी संघर्ष करीत होतो. मी त्यावर मात केली आणि लंडनला पळून गेलो. दु:खाची छाया असलेल्या एखाद्या बागेत लपून बसावयाचे व आपले सारे जीवन दु:खात व्यतीत करावयाचे. हे हेतू मनात बाळगून ते पलायन केलेले होते. माझे स्नेही लॉर्ड ........ यांनी मला अश्रद्ध बनविले. त्याचा परिणाम मी स्वैराचारी होण्यास झाला. कायद्याची नैतिक बंधने, न ठेवता, मौज-मजा करण्यात मी स्वत:ला झोकून दिले. आनंदाने मी बेहोष व वेडा झालो होतो. सैन्यातला गार्डस् या विभागात प्रवेश मिळावा ही माझी इच्छा होती. इतक्यात माझे वडील लंडनला आले व मला स्कॉटलंडला परत घेऊन गेले. तेथे परतल्यानंतर, मी त्या ठिकाणी २ वर्षे मुलकी कायद्याचा (Civil Law) अभ्यास करण्यात घालविली. परंतु माझे मन एकदा का कल्लोळात सापडले की मग भरीव असे शिक्षण घेण्यास ते कधीच तयार झाले नसते. शिवाय मुलकी कायद्याचा अभ्यास करण्याकडे, माझा ओढा नव्हताच. मी त्याचे फारच वरवरचे व जुजबी असे शिक्षण घेतले. माझ्या जीवननिष्ठा व मला मान्य असलेली तत्त्वे, या दोन्हींतही दिवसेंदिवस अधिक अधिक गोंधळ उत्पन्न होऊ लागला होता. सरतेशेवटी, मी पूर्णपणे संशयात्मक बनलो. सर्वच गोष्टींकडे मी तिरस्काराने पाहात असे, येणारा दिवस मला मनाजोगता वाटेल यासाठी, तो कसा घालवावा, या संबंधी माझ्याकडे कसलीही कल्पना नव्हती. विवाहीत नट्यांशी माझे शरीरसंबंध होते. माझ्या ठिकाणी ज्या नाजूक व चांगल्या भावना होत्या त्या सर्वस्वी नाहीशा झाल्या होत्या.

स्कॉटलंडमधील खानदान घराण्यात जे पहिल्या श्रेणीचे घराणे समजले जाईल अशा एका कुटुंबातील मुलीच्या मी प्रेमात होतो. तिने एका धनाढ्य गृहस्थाशी लग्न केले. परंतु तिचे आपल्या नवऱ्यावर जेवढे प्रेम होते त्यापेक्षा कितीतरी पट अधिक प्रेम माझ्यावर होते, असे तिने माझ्या निदर्शनास आणून दिले. मला तिने आपले सर्वस्व अर्पण करण्यात, कसलीही आडकाठी आणली नाही. ती एक फारच चतुर तत्त्वज्ञ होती ती मला म्हणाली, "मी माझ्या नवऱ्यावर नवरा म्हणून प्रेम करते आणि तुझ्यावर प्रेमिका म्हणून प्रेम करते." प्रत्येकाला त्याची स्वत:ची कक्षा आहे. एका चांगल्या पत्नीची जी कर्तव्ये असतात, ती सारी मी त्याच्यासाठी पार पाडते. तुझ्याबरोबर जो अत्यंत आस्वादयोग्य असा आनंद आहे त्याचा उपभोग घेते. आपण आपले गुपित ठेवलेलेच आहे. मला कधीही मुले होणारच नाहीत अशा प्रकारे निसर्गाने मला घडविले

आहे. आपल्या उभयतांच्या प्रेमामुळे कोणाला कसलाही मनस्ताप व दु:ख सहन करावे लागत नाही. माझी सदसद्विवेकबुद्धी मला टोचणी लावीत नाही आणि परमेश्वर यामुळे रागावणार नाही याबद्दल मला खात्री आहे.'' या अशा प्रकारे तत्त्वज्ञान एका देखण्या व विलोभनीय तरुणीच्या तोंडी असावे हेच मला फार आकर्षक वाटत होते.

बाविसाव्या वर्षी माझ्या वडिलांनी मला लंडनला जाण्यासाठी परवानगी दिली. मिसेस..... या परिघातून माझी सुटका झाली म्हणून मला आनंद झाला होता. मी, यापुढे तिला कधीही पत्र लिहावयाचे नाही असा निश्चय केला होता, आणि दोन वर्षे आपण खुशाल आहोत या पलिकडे आम्हा दोघांना एकमेकांबद्दल काहीही बातमी नव्हती. लंडनमध्ये एका स्त्री बरोबर माझे संबंध प्रस्थापित झाले. दरबारी व सुसंस्कृत समजल्या जाणाऱ्या वागणुकीबाबत ही स्त्री यथातथाच होती. त्याचा मला पश्चत्ताप होणे शक्य नव्हते! परंतु एखाद्याजवळ पैसे आहेत, म्हणून त्याचे दास्य पत्करणाऱ्या अनेक मुली जगात आहेत, अशा काही मुलींच्या बरोबर अगदी हृदयशून्य असा व्यापार करण्याच्या भानगडीत मी पडलो, याचा मला जरूर पश्चात्ताप होतो. याच सुमारास माझा एका प्रसिद्ध विद्वान माणसाशी परिचय झाला. या विद्वान गृहस्थांनी ख्रिश्चन धर्मातील सत्यता मला सिद्ध करून दाखविली. अर्थात त्याला अभिप्रेत असलेला ख्रिश्चन धर्म हा तसा थोडा कडकच होता.

मी अजूनही धास्तावलेल्या मन:स्थितीतच होतो. माझ्या वडिलांची इच्छा स्कॉटलंडमध्ये मी वकिली करावी अशी होती. त्यांनी मला प्रवास करण्यास परवानगी दिली पाहिजे, या अटीवर मी त्यांच्या या विचाराला संमती दिली. यानंतर हॉलंडमधील युट्रेक्ट या शहरी गेलो. तेथे मी माझ्यावर जबरदस्ती करून, अगदी झटून अभ्यास केला, परंतु त्यामुळे माझा फारसा फायदा झाला नाही. एखाद्या गोष्टीचा मनापासून कसा अभ्यास करावा हे मी खरोखरच कधीही शिकलो नाही. पराकोटीच्या खिन्नतेने मला ग्रासले होते. धर्माबद्दल माझ्या पूर्वीच्या काळ्याकुट्ट कल्पना परत आल्या; आणि काही वेळा माझी कशावरच श्रद्धा नाही असे झाले. एका अनिश्चित अशा भयावहपणे, मी माझा स्वत:चा जीव घेण्याचे ठरविले.

माझे पालक लॉर्ड मारिशाल यांनी आपल्याबरोबर मला जर्मनीला नेले. त्यांच्या संभाषणामुळे माझ्या कल्पना व विचार या दोहोत बदल झाला. माझ्या गोठलेल्या हृदयात त्यांच्या सदगुणामुळे धुगधुगी आली. मी माझ्या खिन्नतेसंबंधी त्यांना कबुली दिली. मला इटली या देशात प्रवास करण्यास परवानगी देण्यासंबंधी त्यांनी माझ्या वडिलांना लिहिले. नॉयचेटल या गावी माझ्या वडिलांचे मारिशाल यांच्या पत्राला आलेले उत्तर मला पाहावयास सापडेल अशी माझी अपेक्षा आहे.

महाराज माझ्या स्वभावात जे वाईट आहे त्या सर्वांचाच अहवाल आपणास पेश केला आहे. तो घाईघाईने लिहिलेला आहे हे खरे. तसेच माझ्यात जे चांगले आहे तेही मी आपणास सांगितले आहे. आता मला सांगा मला अजूनही एक 'माणूस' बनणे, शक्य आहे का ? -ते जर मला शक्य असेल ... हायरे दैवा, मी नेमका याच्या विरुद्धच सर्व काही असेन, याची मला भीती

वाटते.... मिसेस ..... हिच्या बरोबरचे घनिष्ठ संबंध हे नीतीपर जर असते.... कदाचित् तीही बदलली असेल. हे उदार तत्त्वज्ञा, मी तुझ्या मदतीची याचना करीत आहे. माझे मन कमकुवत आहे पण हृदय बळकट आहे. त्यावर फुंकर घाल. आणि मग त्या हृदयातील पवित्र अग्नी कधीही विझणार नाही.' .

अठराव्या शतकातल्या स्कॉट तरुणाने, 'कबुलीजवाब' देण्यात अत्यंत तरबेज असलेल्या माणसाला दिलेला तो कबुलीजबाब (Confession) होता. या कबुलीजबाबात सारांशरूपाने पुढील गोष्टी नमूद केलेल्या आहेत. चोवीस वर्षाच्या बॉसवेलनी कालव्हिन या ख्रिश्चन धर्मपंथाला मंजूर असलेल्या प्रश्नांची ईश्वरामुळे आपणास कसे व किती सोसावे लागले याचे वर्णन केले आहे. त्याचबरोबर अत्यंत प्रेमळ पण भीतीने कायम पछाडलेल्या आईचाही आपल्यावर किती अनिष्ट परिणाम झाला हेही त्यात कथन केले आहे. बॉसवेल यांच्या आईने पापाबद्दल झालेली शिक्षा आमरण असते, याची भीती घालून घाबरविले. याबद्दल बॉसवेल यांनी आपल्या आईला दोष दिला आहे. त्यांच्या पित्याची त्यांना भीती वाटत असे, पण त्याचा उल्लेख या कबुलीत त्यांनी गाळलेला आहे. बॉसवेल आपल्या पित्याबद्दल सांगताना लॉर्ड ऑफ ऑचिनलेक हे जगातील अत्यंत कर्तबगार व सन्माननीय अशा व्यक्तीपैकी एक होते, असेही सांगतात. असे करून, ते आपल्या आईवडिलांबरोबर त्यांची जी नेहमी भांडणे होत असत त्या सत्याचा रूसोला थांगपत्ता लागणार नाही ही काळजी घेतात. ते सरतेशेवटी असेही सांगतात की 'वाईट-शिक्षणाच्या परिणामांचा मी एक विलक्षण असा नमुना आहे'. -कदाचित् ते रूसोवर छाप पडावी म्हणून -अथवा रूसोचा एमिलहा ग्रंथ त्यांना आवडला असेल म्हणून, आपल्या कबुलीजबाबात त्यांनी ही गोष्ट नमूद केलेली असावी.

बॉसवेल यांची ही जी मन:स्थिती आहे त्याबद्दलचे आधुनिक मत जगावेगळे आहे. आधुनिक मतानुसार बॉसवेल 'पित्याच्या शोधात' आयुष्यभर गुंतलेले होते असे आहे. डॉ. जॉनसन यांचे प्रेम व कृपणपणा या दोहोंच्या मिश्रणाने, त्यांची ती गरज भागली असावी. हे जर खरे मानले तर आणखी एक प्रश्न उपस्थित होतो. बॉसवेल यांच्यावर अधिकार गाजविणाऱ्या वडीलधाऱ्या माणसांबरोबरचे, त्यांचे संबंध हे चांगलेच जटिल होते. त्यांच्या बंडाची जी वेगवेगळी आवर्तने होत, त्यातला फरक आपणास पाहाता येतो. अपराधीपणाची भावना त्यांच्या मनात सदैव घर करून होती. आपण अत्यंत कुचकामी आहोत, असे त्यांना फार लहानपणापासून वाटत होते. या सर्वांचा परिणाम असा झाला की ते नेहमी स्वत:च आपल्या स्वत:च्या वागणुकीवर फारच बारकाईनं लक्ष ठेवीत असत. त्यांना त्याचे जणू वेडच होते. बेधुंद वागणेही त्याच कारणामुळे होऊ लागले. आत्मपीडनही त्यांनी अनेक प्रकारे करून घेतले. तीही सवय त्यांना लागली होती. बॉसवेल यांनी बिनधास्तपणे आपणास गुप्त रोग होऊ दिला, याचे कारण ते आपल्या शरीरावर एक प्रकारे वेदना लादीत होते. अनेक दिवस या सर्व अवगुणांपासून ते अलिप्त होते. आपण पुन्हा एकदा सद्गुणांची प्रस्थापना केली आहे अशी भावना तसे वागण्यामागे होती. एखाद्या गुन्हेगाराला फाशी देण्याचा प्रसंग असला, तर बॉसवेल त्या ठिकाणी हटकून हजर असत.

आत्मपीडनाचा तो आणखी एक मार्ग होता. ही फाशी पाहिल्यानंतर, त्यांना भीतीदायक स्वप्ने पडत. क्रूरपणा प्रदर्शित करता यावा व आत्मपीडन करावे असे बॉसवेलना नेहमी वाटे. या संबंधात त्यांचे जे सामर्थ्य होते. त्याला या त्यांच्या वागणुकीमुळे खतपाणी मिळत असे. एखाद्या गुन्हेगाराला फाशी देत आहेत हे पाहून आपण जणू आपणालाच फाशी देताना आपण स्वत: हजर आहोत ही भावना त्यांच्या मनात जागृत होण्यासारखेच ते होते.

ते रोजनिशी नियमितपणे लिहीत. तसेच नोंदवह्यात सातत्याने नोंदी करीत असत. असे केल्याने त्यांना विसावा मिळाल्यासारखे वाटे. ते जणू आपण स्वत:चेच मित्र आहोत, असे समजून या दोन्ही द्वारा स्वत:शीच प्रश्नोत्तरे करणे त्यांना शक्य होते. तसेच या मार्गांचा अवलंब केल्याने एकतर त्यांना आपल्या मनातील दुष्ट विचारांना वाट करून देणे शक्य होते, शिवाय स्वत:जवळच आणि अत्यंत गुप्तपणे जगालाही कबुलीजबाब देता येत होता. ते काही वेळा अगदी थोडक्या व मोजक्या शब्दात नोंद करीत. ह्या अशा नोंदी तशा सामान्यच होत्या, पण एकाएकी त्यांच्या भेदकतेची झलक पाहावयास मिळते. 'रेसीला आलो : आजचा ईस्टरचा दिवस. ऊठ. जॉनसन हो,' 'तू कोणालाही दुखापत केलेली नाहीस.' असे म्हणून स्वत:ची समजूत काढतात. आणि मग. एकाएकी 'मी काय आहे! काय अगदी खरा?' हा शेवटचा जो प्रश्न आहे तो काफकाच्या साहित्यातील एखाद्या व्यक्तीने विचारला असता. बॉसवेल जेव्हा रुसो, व्हाल्टेअर, पाओदी यांच्यावर स्वत:स लादीत असत किंवा डॉ. जॉनसन यांचा आशीर्वाद मिळविण्यासाठी गुढघे टेकीत, तेव्हा ते तसे का वागत? या प्रश्नाचे उत्तर असे असण्याची शक्यता आहे की या प्रसिद्ध व्यक्तींच्या जीवनातून ते आपल्या स्वत:च्या व्यक्तित्वाची जुळवाजुळव करीत होते. जॉनसन यांचे चरित्र हे सरते- शेवटी बॉसवेल यांचे चरित्र आहे.

त्याकाळी एखादे नाटक चालू होण्याअगोदर काही छोटी प्रहसने होत. त्यात बॉसवेल जाहीरपणे विदूषकाची भूमिका करीत. गांवढळ नकला करणे त्यांना फार आवडे. हे त्यांचे सारे वागणे तसे चांगलेच जादा होते. या वागण्याला समांतर अशी अन्य वागणूक केल्यानंतर ते लंडनमधल्या सुप्रसिद्ध गल्लीबोळातल्या वेश्यांकडे जात असत. पत्नीच्या शोधात ते किती झपाटल्यासारखे होते त्याचे ते वागणे द्योतक आहे. पण हे झपाटणे हेही तसे अर्धवटच होते. बेल ड झ्युयलेन या उमराव स्त्रीचे त्यांनी केलेले प्रियाराधन तर प्रसिद्धच आहे. 'पोर्ट्रेट ऑफ झेलिड' या जॉफ्रि स्कॉट यांच्या पुस्तकात यासंबंधीचे उपरोधिक व नेटके वर्णन वाचावयास मिळते.

बॉसवेल ज्या ठिकाणी प्रियाराधन करीत त्याला ते स्वत:च नेहमीच अत्यंत कौशल्याने सुरुंग लावीत. ते 'प्रेम' करीत. पण त्या प्रेमापेक्षा अधिक गलथान व अधिक भावनाशून्यपणे 'प्रेम' करणे शोधूनही सापडले नसते. याचे कारण त्यांच्या स्त्रीदाक्षिण्याच्या मुखवट्याखाली त्यांची 'स्त्री' जाती विषयीची घृणा दडलेली होती. त्यांनी 'ठेवलेल्या' काही स्त्रिया दयाळू व मातृहृदयी होत्या. तसे होते तरी अगदी स्वस्तातले स्वस्त 'प्रेम' खरेदी करण्यास ते जवळ जवळ नेहमीच तयार असत. सरतेशेवटी त्यांनी एका जवळच्या नातेवाईक मुली बरोबरच लग्न केले,

तेही घाईघाईने. त्यांनी आपल्या ब्रम्हचर्याचा त्याग केला तो प्रेमापोटी नाही, तर केवळ रागाच्या भरात. त्यांचे वडील पुन्हा एकदा लग्न करणार होते म्हणून बॉसवेल यांनी स्वतः लग्न केले! दोन्हीही विवाह एकाच दिवशी झाले होते.

बॉसवेल एकोणतीस वर्षांचे होते, तेव्हा त्यांनी कॉर्सिया या देशावर पुस्तक लिहिले. या पुस्तकाने त्यांना बऱ्यापैकी प्रसिद्धी मिळाली होती. त्यांची अत्यंत तिसऱ्या दर्जाची काव्येही लोकांना माहीत होती. ते चरित्रवाङ्मयाच्या पाठीमागे नव्हते. या उलट त्यांना वृत्तपत्रीय प्रसिद्धी आणि जनसंपर्क यातच अधिक रस होता. बॉसवेल यांच्या या सर्व वर्षांच्या कालखंडात ते सदैव काहीतरी तिसऱ्या दर्जाचे काम करण्यात गुंतलेले दिसतात. हे नक्की. तथापि त्यांच्या याच कालखंडातील नोंदवह्या, -मुळात त्या अगदी गुप्तता राखून लिहिलेल्या होत्या, -फारच लक्षणीय आहेत. ललित वाङ्मयाची निर्मिती करणारा आणि नोंदवही ठेवणारा या दोन्ही प्रकारच्या लेखनातला फरक चटकन लक्षात येईल. कादंबरीकाराला ज्याची आवश्यकता असते त्याची जरुरी नोंदवही लेखकाला नसते. नोंद कशी करावी आणि स्वतःचा दस्तऐवज स्वतःच तयार करावा याचे रहस्य बॉसवेल यांनी आत्मसात केले होते. प्रा. पोट्टल यांनी त्यासंबंधात पुढील विधान केलेले आहे, 'ते (बॉसवेल) प्रयोग करीत, आणि पसंत नसेल ते त्याज्य ठरवीत. वाङ्मयीन सुरांचे ज्ञान त्यांना अचूक होते. या त्यांच्या स्वरज्ञानाच्या मदतीने ते नेमक्या बंदिशीची निवड करीत.' या अशा अनेक बंदिशी एका सूत्रात गोवल्या गेल्या की मग चरित्रग्रंथाचे कलाकृतीत रूपांतर होते. सॅम्युअल जॉन्सन यांना बॉसवेल भेटणे हा मि. बॉसवेल यांच्या जीवनाला एकत्र बांधणारा सूर होता.

( क्रमशः )

---

आपण आयुष्य आणि साहित्य याविषयी जितका खोलवर विचार करीत जावं तितकं ते वैचित्र्यपूर्ण आणि अर्थपूर्णही वाटत जातं. जी जी गोष्ट सुंदर आहे त्या त्या गोष्टीमागे एखादी व्यक्ती आहे. एखादा क्षण माणसाला घडवीत नसतो तर उलट माणूसच युगनिर्माता असतो.

**– ऑस्कर वाईल्ड**

---

कलाकृतीचे परीक्षण ही एक कलाच असते. एखादी कलानिर्मिती होत असताना कलाकारातील विश्लेषणात्मक, समीक्षणात्मक वृत्ती नकळत कार्यरत असतातच. त्याशिवाय कलाकाराकडून कलाकृती निर्माण होऊच शकणार नाही. त्याचप्रमाणे समीक्षण वा परीक्षण हीही खरोखरी कला असते. एखादा परीक्षणपर लेख, समीक्षा निर्माण करण्यासाठी समीक्षक हा कलाकारच असावा लागतो. समीक्षा ही स्वतंत्र निर्मितीच मानावी असं मला वाटतं.

**– ऑस्कर वाईल्ड**

---



अनुक्रमणिका

# लेखमाला

## प्रेमपुजारी डी. एच्. लॉरेन्स

**– श्रीकृष्ण कामत**

### दहा

इंग्लंडच्या हवामानाचा लॉरेन्सला त्रास होत होता. इटालीला परतायचा त्याचा बेत होता. पण ४ ऑगस्ट १९१४ रोजी जर्मनीबरोबर इंग्लंडनं युद्ध पुकारलं आणि इंग्लंडमध्येच राहाणं त्याच्या नशिबी आलं. खिशात दमड्या मोजक्याच. संसार थाटायला जागा हवी. बेलिंग्डन लेनमधील 'ट्रँगल' या नावाची कॉटेज त्याला मिळाली. बकिंगहॅमशायरमधील चेशॅमजवळ. महिन्याचं भाडं सहा शिलींग. १९१५ च्या जानेवारीपर्यंत लॉरेन्स इथं राहिले.

पाच महिन्याच्या या काळात 'माझा आत्मा थडग्यात पडून होता– मेला नव्हता, पण एक सपाट दगड त्यावर ठेवलेला, एक मढं, मढ्यागत थंडगार आणि कुणीही अस्तित्वात नव्हतं, कारण मी स्वत:च अस्तित्वात नव्हतो. तरीही मी मेलो नव्हतो – फक्त हद्द पार केली होती– दुसऱ्या हद्दीत गेलो होतो– आणि सदासर्वकाळ माझ्या मनाशी पक्कं होतं, पुन्हा मला उठून उभं राहायलाच हवं.' त्याच्या काळजाचा मातीचा थंडगार गोळा झाला होता. त्यात हळूहळू चैतन्य येत गेलं. नैराश्याची काजळी दूर झाली. यातून तो सावरला. 'मी आशा बाळगून आहे. ही आशा– जीवनाचा नवा अंकुर– किती नाजूक असेल, सांगता येणार नाही मला.'

लॉरेन्सांच्या घरीही समरप्रसंग चालू होते. मरे सांगतो, मुलांच्या नुसत्या उल्लेखानं फ्रीडा ओक्सावोक्शी रडत असे आणि लॉरेन्सचे माथे भडकत असे. त्यांच्या झगड्याला अन्य कारणंही होती. स्वतंत्र बाण्याच्या दोन व्यक्तिमत्त्वांमधला तो संघर्ष होता. शिव्याशापांच्या वर्षावाबरोबर भांड्यांचा माराही चालू असे. त्यांच्या घरी येणाऱ्या पाहुण्यांनी त्यांच्या मारामारीचं रसभरीत वर्णन केलेलं आहे. पण लॉरेन्स पति-पत्नीमधील हळूवार भावबंध मात्र त्यांच्या नजरेनं टिपलेले आढळत नाहीत.

मुलांना भेटण्यासाठी फ्रीडाचा जीव कासावीस होत होता. १९१४ च्या डिसेंबरमध्ये लॉरेन्स फ्रीडाबरोबर आपल्या कुटुंबियांना भेटायला गेला होता. या वेळी फ्रीडा प्राध्यापक वीकलींना भेटली. या भेटीचा वृत्तांत लॉरेन्सनं ॲमी पॉवेलला कळवला :

"माजी नवरा मागं सरकत म्हणाला, "तू– पुन्हा तू भेटणार नाहीस असं मी समजत होतो."

फ्रीडा : हो– ठाऊक आहे मला.

माजी नवरा : *या* गावात तुझं काय काम?

फ्रीडा : मुलांच्या संदर्भात मी तुला भेटायला आले आहे.

माजी नवरा : जिथं तुला ओळखतात तिथं तुझं थोबाड दाखवायला शरम नाही वाटत तुला? दीडदमडीची वेश्या तुझ्याहूनही चांगली की नाही?

फ्रीडा : नाही.

माजी नवरा : या धरतीवरून माझी हकालपट्टी करण्याची इच्छा आहे तुझी, बाई? जिथं मला स्वस्थता लाभेल असं एकही ठिकाण नाही माझ्यासाठी?

फ्रीडा : हे बघ, मला मुलांबद्दल तुझ्याशी बोलायचं आहे.

माजी नवरा : मिळणार नाहीत तुला ती - त्यांना तुला भेटायची इच्छा नाही.

नंतर संभाषणात अर्वाच्चपणाची हलकीशी छटा मिसळली. त्यातील काही भाग :

माजी नवरा : तुला जायचंच होतं तर

एखाद्या *भल्या गृहस्था*बरोबर का नाही गेलीस?

फ्रीडा : तो थोर माणूस आहे.

पुढील चिखलफेक :

माजी नवरा : पृथ्वीवरील अधमातील अधमप्राणी तू आहेस हे लक्षात आलं नाही तुझ्या?

फ्रीडा : नाही

अशीच थोडीशी बाचाबाची आणि फ्रीडाचं निघून जाणं. यापुढं मुलांना भेटता येणार नाही.

माजी नवरा : मुलांच्याबाबतीत तू काही लुडबूड केलीस तर तुला अटक करावी अशा सूचना माझ्या सॉलिसिटरांना मी दिल्या आहेत, माहिती आहे की नाही तुला?''

समोरच्या व्यक्तीचा मुलाहिजा न बाळगणारी फ्रीडा. पण तीसुद्धा वीकलींच्या विखारी वाग्बाणापुढं मुकाट झाली, खिन्न मनानं माघारी वळली.

शिशिरात लॉरेन्सची तब्येत बिघडली. आपल्याला क्षयाची बाधा झाल्याचं तो नाकबूल करत असला तरी त्याला भेटायला आलेल्या ॲमी पॉवेलच्या नजरेतून ते निसटलं नव्हतं. त्याची पैशाची ओढाताण होत असणार हेही तिच्या ध्यानी आलं होतं. पैसे देणं त्याला रुचणार नाही हे ती जाणून होती. बोस्टनला परतल्यानंतर त्यानं तिला टाइपरायटर पाठवून दिला. १६ ऑक्टोबरला पत्र लिहून त्यानं तिचे आभार मानले. 'मी नेहमीच म्हणतो की चांदीचं घड्याळ ही माझी छोटीशी मालमत्ता आहे – खरंही आहे ते. आता टाइपरायटर माझं साम्राज्य आहे'. याच दिवशी 'रॉयल लिटररी फंडा'चा त्याला ग्रँट म्हणून ५० पौंडाचा चेक आला. हे आर्थिक साहाय्य त्याला लाभलं नसतं तर त्यानं दिवस कसे गुजरले असते कोण जाणे!



अनुक्रमणिका

लॉरेन्सांना भेटायला मरेज टूंगलला आले. लॉरेन्सांच्या शेजारीच एखादं कॉटेज भाड्यानं मिळेल का हे पाहाण्यासाठी मरेज आले होते. त्यांच्या आगमनानं लॉरेन्स आणि फ्रीडा खूष झाले. कॅथरीन फ्रीडाबरोबर घरी राही आणि मरे जागेच्या शोधार्थ बाहेर जाई. त्याला हवी तशी कॉटेज अखेर सापडली. लॉरेन्सांपासून तीन मैलावर ही कॉटेज होती. ती जागा राहाण्यालायक करण्यासाठी लॉरेन्स त्याच्या नेहमीच्या उत्साहानं मरेला मदत करू लागला. रंगाचा ब्रश झटपट चालवता येत नाही म्हणून तो मरेवर डाफरला देखील. या दोन्ही जोडप्यांमध्ये सर्जक लेखकच बरंचसं घरकाम करत असत. आणि कष्टाची कामं उपसण्यातला कॅथरीनचा उरक पाहून सुस्तपणे. काम करणारी फ्रीडा अचंबा करत असे. इथंच कॅथरीननं आपल्या पूर्वायुष्यातले अत्यंत खाजगी अनुभव – त्यातले काही तिनं मरेलाही सांगितलेले नव्हते – फ्रीडाला सांगितले. त्यातील एक अनुभव १९०७ मधला. ती न्यूझिलंडमध्ये असतानाचा. तिच्याहून नऊ वर्षांनी मोठ्या असलेल्या एडीथ बेन्डॉल या देखण्या स्त्रीबरोबरचे तिचे समलिंगसंभोगी संबंध. या चुटपुटत्या शारीरसंबंधातलं सौख्य भोगल्याची कबुली तिनं दिली. यथावकाश ही कहाणी लॉरेन्सच्या कानी पोचली आणि तिथून 'द रेनबो' या त्याच्या कादंबरीत तिचा शिरकाव झाला. 'शेम' या प्रकरणातील उर्सुला आणि विनिफ्रेड इंगेर याचं नग्नावस्थेतील पोहणं पुढं वादग्रस्त ठरलं.

१९१५ च्या जानेवारीत लॉरेन्स ग्रेटहॅमला राहायला गेले. लॉरेन्सला भेटायला येणाऱ्यांची वर्दळ असे. पाहुणे लॉरेन्सांशी बोलण्यात गर्क असत. फ्रीडाची कुणी फारशी दखल घेत नसे. आपल्याला कुणी खिजगणतीतही घेत नाहीसे पाहून तिचं डोकं फिरायचं. अशा वेळी ती कशी वागेल याचा नेम नसायचा. जूनमध्ये बर्ट्रांड रसेल लॉरेन्सला भेटायला गेला. दुसऱ्या दिवशी त्यानं ओट्टोलिनला पत्र लिहिलं : तू जवळपास असलीस की तिची (फ्रीडा) आठवण प्रकर्षानं होते. काल लॉरेन्सनं तुला एक प्रदीर्घ पत्र लिहिलं होतं, पण तिनं ते हस्तगत केलं आणि फाडून टाकलं. नंतर त्यानं तुला दुसरं पत्र लिहिलं, आशा करतो ते तुझ्यापर्यंत पोचेल. तो फार संतापला होता. फुलांच्या ताटव्याशेजारील छोट्या भिंतीवर ती प्रकटली, कुजकट बोलत राहिली. तो म्हणाला, "उतर खाली तिथून लाडके, नाहीतर थोबाड फोडीन तुझं. अती केलं आहेस तू यावेळी."

रसेल भेटून गेल्यानंतर फ्रीडानं त्याला लिहिलं. माझ्याशी तू थोडाफार वाकडेपणानं वागलास– तुला वाटलं असावं की तुझ्या लिखाणाची पुरेशी कदर करत नाही, मला ते कधी कळणार नाही, ती विशिष्ट मानव– निर्मित गोष्ट जिला तू बुद्धी म्हणतोस ते एक गूढ आहे, माझ्या लेखी काहीसं थरारक असं...: एकूण गंमतच आहे. अधिकार गाजवण्याच्या इच्छेला तू दिलेला घाट, तुझ्या बुद्धीचा धाक मला नेहमीच वाटेल, मला तो स्त्रियांच्या विरोधात असल्याचं जाणवतं, निदान सध्या तरी!

या वर्षीच्या फेब्रुवारीमध्ये रसेल आणि लॉरेन्स यांचा एकमेकांशी परिचय झाला होता. हा परिचय ओट्टोलिन मोरेलनं घडवून आणला होता. तर्काला प्रमाण मानून केलेल्या विचारापेक्षा

मनाच्या उपजत प्रेरणा आणि अंत:स्फूर्ती श्रेष्ठ असतात, हा आपला विचार या प्रथमभेटीत लॉरेन्सने रसेलपुढं मांडला होता. आपली भूमिका विशद करताना त्याचा आवेश, उत्साह पाहून रसेल भारावून गेला होता. त्यानंतर ओट्टोलिनला पाठवलेल्या पत्रात त्यानं लिहिलं होतं की लॉरेन्सच्या विचारसरणीवर त्याचा विश्वास बसत चालला आहे. या काळात लॉरेन्सच्या डोक्यात कल्याणकारी राज्याची कल्पना घोळत होती. या राज्यात माणसं आजारी असोत वा ठणठणीत, प्रत्येकाला वेतन मिळणार होतं, आणि त्याच्याशी रसेल सहमत होता. दोघांचाही युद्धाला प्रखर विरोध होता. काही काळ तरी असं वाटत होतं की ते दोघं जीवश्चकंठश्च मित्र बनणार. एकत्रित व्याख्यानं देण्याचंही त्या दोघांनी ठरवलं होतं.

मार्चमध्ये रसेलच्या आग्रहानुसार लॉरेन्सनं केंब्रिजला भेट दिली. तत्पूर्वी त्यानं रसेलला पत्र लिहून सांगितलं होतं,की एकाच वेळी बऱ्याच जणांना भेटण्यासाठी त्यांने बोलावू नये. 'मला जमावाची आणि टोळ्यांची आणि समाजाची आणि कंपूंची भीती वाटते– तेवढी एकेका व्यक्तीची वाटत नाही.' लंडनमधील खानदानी घरात सहजगत्या वावरणारा लॉरेन्स केंब्रिजमधल्या वातावरणाला उबगला. तिथून परतल्यानंतर त्यानं फ्रीडाला सांगितलं की ज्यांना तो तिथं भेटला ती माणसं 'खोलीत येरझाऱ्या घालत होती आणि वाल्कनमधील परिस्थितीविषयी आणि तसलंच काहीतरी बोलत होती, आणि त्यांना त्याबद्दल काहीही माहीत नव्हतं.' त्यानं रसेललाही लिहिलं की केंब्रिजनं त्याला उद्विग्न केलं आहे, 'औदासिन्याच्या मलेरियानं' त्याला पछाडलं आहे. तिथलं वातावरण सडलेलं आहे, चिखलानं बरबटलेलं आहे. 'त्याची दुर्गंधी सहन करणं मला अशक्य आहे!' रसेलच्या काही मित्रांमध्ये, विशेषत: मेयनार्ड केन्स आणि ई. एम्. फॉर्स्टर,यांना समलिंगीसंभोगाबद्दल आकर्षण असलेलं पाहून त्याचं मन विटलं होतं. जानेवारीमध्ये फॉर्स्टर लॉरेन्सला भेटायला ट्रँगलला आला होता, त्यावेळीही त्याच्या समलिंगसंभोगी आकर्षणावरून लॉरेन्सनं त्याची हजेरी घेतली होती. त्याला सल्ला दिला होता की त्यानं दडपून टाकलेली स्वत:ची लैंगिकता स्त्रीकडे वळवावी. लॉरेन्सच्या या आगांतुक सल्ल्याबद्दलची आपली नाराजी फॉर्स्टरनं लपवली नव्हती.

जुलैमध्ये रसेलनं नियोजित व्याख्यानांची टिपणं लॉरेन्सकडे पाठवली. 'प्रिन्सिपल्स ऑफ सोशल रीकन्स्ट्रक्शन' हे रसेलचं पाहिलं लोकप्रिय पुस्तक या टिपणांवरच आधारित आहे. लॉरेन्सनं टिपणं वाचली, त्यात बरीच खाडाखोड केली, स्वत:च्या सुधारणा केल्या आणि ती परत रसेलकडे पाठवली. लॉरेन्सचं औधत्य पाहून रसेल खवळला. पण त्यांची मैत्री संपुष्टात आली ती रसेलच्या 'द डेंजर्स ऑफ सिव्हिलायझेशन' या लेखावर लॉरेन्सनं १४ सप्टेंबरच्या पत्रात टीका केली तेव्हा. 'तुझ्यामध्ये दडपून टाकलेल्या इच्छा ओतप्रोत भरलेल्या आहेत, ज्या क्रूर आणि समाजविघातक बनल्या आहेत. आणि त्या शांतता 'प्रोपोगंडा'चं सोज्वळ रूप घेऊन प्रकट होतात. तुझे संकल्प धूळफेक करणारे आणि निष्ठुर आहेत. ही विकृती आहे, मानसिक रक्त-पिपासा!' त्याच्या या प्रखर हल्ल्यानं रसेल हादरला. 'चोवीसेक तास मला वाटत होतं मी

जगायला लायक नाही आणि आत्महत्या करण्याच्या विचारात होतो.' परंतु या आघातामधून त्यानं स्वत:ला सावरलं, लॉरेन्सची मैत्री तोडून टाकली.

'पोर्ट्रेटस फ्रॉम मेमरी' या आपल्या पुस्तकात रसेलनं असा दावा केला आहे की, 'फॅसिझमचं संपूर्ण तत्त्वज्ञान राजकारण्यांच्या ध्यानी येण्यापूर्वीच लॉरेन्सनं त्याचं सूतोवाच केलेलं होतं.' लॉरेन्सच्या 'ब्लड- कॉन्शसनेस' वरील श्रद्धेची 'तद्दन बाष्कळ बडबड' या शब्दात रसेलनं संभावना केली आहे आणि ठाम विधान केलं आहे, 'त्यावेळी माझ्या ध्यानात आलं नव्हतं की ती थेट ऑसविट्झला घेऊन जाणारी होती.' ऑसविट्झ ही नाझींची कुविख्यात छळछावणी ज्यूना नामशेष करण्यासाठी अस्तित्वात आलेली. रसेलचं हे विधान अर्थातच अतिशयोक्तीचं आहे. तथापि, लॉरेन्सची विचारसरणी ही फॅसिस्ट चळवळीच्या विचारसरणीशी मिळतीजुळती आहे असं रसेलनं सूचित केलं आहे त्यात तथ्य आहे.

विवाहित फ्रीडासंगे लॉरेन्स चोरून पळून गेला होता. त्यानं केलेल्या अपहरणाचं समर्थन करण्याच्या ओघात १९१३च्या जानेवारीत एक नवीन विचार लॉरेन्सच्या डोक्यात आकाराला येत होता. 'देह आणि अंत:प्रेरणा विरुद्ध मन आणि बुद्धी. माझा श्रेष्ठ धर्म, रक्तावरील श्रद्धा, इंद्रिय, बुद्धीहून अधिक सुज्ञ असतात. आपली बुद्धी चूक करू शकते, पण आपल्या रक्ताला जे भावतं, रक्त जे मानतं आणि सांगतं ते नेहमीच सत्य असतं!' रागाच्या भरात झालेल्या हत्येविषयी त्याला सहानुभूती वाटू शकत होती पण युद्धात यांत्रिकपणे होणाऱ्या हत्येची त्याला चीड होती. ही चीड, मन आणि बुद्धी यांच्या प्रतिसादापेक्षा अंत:प्रेरणांचा प्रतिसाद निकोप असतो. या त्याच्या ठाम विचारसरणीवर शिक्कामोर्तब करते. तरुणांची एक संपूर्ण पिढी कत्तलखान्याकडे पाठवली जात असलेली पाहून लोकशाहीबद्दलचा त्याचा तिटकारा वाढत गेला होता. लोकशाहीची अशा हत्याकांडाला अनुमती असेल तर जळो ती लोकशाही. १९१५ च्या जुलैमध्ये त्यानं रसेलला ठणकावून सांगितलं होतं. 'तुमची लोकशाही तुम्ही बाजूला सारायला हवी. जनतेवर तुम्ही विश्वास ठेवता कामा नये..... सर्व काही निरंकुश हुकुमशहाच्या हाती एकवटायला हवं. ....संपूर्ण राज्य ढासळत आहे, तुला दिसत नाही आहे का?'

यात भर, लॉरेन्सचा ज्यू-द्वेष. याचं मूळ अर्थातच अज्ञानात होतं, त्यानं करून घेतलेल्या गैरसमजुतीमध्ये होतं. एखाद्या ज्यूशी त्याचं बिनसलं, तो संतापला की त्या ज्यूमधला ज्यूपणा त्याला खुपू लागे. विल्यम हायनेमान यानं 'द ट्रेसपासर' प्रकाशित करण्यास नकार दिला होता. आणि त्याचा कवितासंग्रह काढणार की नाही याबाबत त्यानं निर्णय कळवलेला नव्हता. या संदर्भात आपल्या एका कविमित्राला ८ जुलै १९१२ रोजी लिहिलं होतं. 'मला वाटतं तो सडका ज्यू त्या स्वीकारणार नाही.' १९१३ मध्ये किंग्जगेटहून पाठवलेल्या पत्रात त्याच्या ज्यू-द्वेषाची झलक दिसते. ही जागा त्याला का आवडत नाही याचं त्यानं स्पष्टीकरण केलं होतं. 'हे गब्दुल, वयस्कर ज्यू आणि त्यांच्या मोटारी आणि त्यांचे तंबू, करायचं काय मला त्यांच्याशी' त्याच्या

दुसऱ्या दिवशी जणू काही आपल्या कल्पनेवर खूष होऊन त्यानं एडवर्ड गार्नेटला लिहिलं. 'हे ज्यूंचे व्हिला आणि बेबी आणि पपा यांच्यामध्ये मला भयंकर चुकल्याचुकल्यासारखं वाटतं!'

मार्क गेर्टलरसारख्या ज्यूंशी घनिष्ट मैत्री झाल्यानंतरही लॉरेन्सचे ज्यूबद्दलचे पूर्वग्रह बदलले नाहीत. गेर्टलेर हा डोरोथी ब्रेट्टचा 'स्लेड'मधील मित्र. चित्रकार. देखणं रूप. गार्सिंग्टन येथील ओट्टोलिन मोरेलच्या शाही दरबारातील लॉरेन्सप्रमाणंच एक मानकरी. त्याच्यामधला ज्यूपणा लॉरेन्सनं अचूक हेरला होता. 'मेरी-गो-राऊंड' या त्याच्या चित्रात आढळणाऱ्या नैराश्यावर त्यानं नेमकं बोट ठेवलं होतं. ९ ऑक्टोबर १९१६ रोजी त्याला पाठवलेल्या पत्राच्या प्रारंभी, एक उत्कृष्ट आधुनिक कलाकृती आपण पाहिली अशा शब्दात त्याची स्तुती करून त्यानं लिहिलं, 'विघटनाची ती एक थरारक ज्योत आहे, तुझी ज्योत..... हे चित्र रंगवायला ज्यूच हवा. तुझा राष्ट्रीय इतिहास न देता.... सरते शेवटी तुझा वंश शेवटच्या घटकेला पोचला आहे– ही चित्रं म्हणजे त्याचा प्राणांतिक आक्रोश आहे!' ताज्या कलमात लिहिलं, 'माझ्यापाशी पैसे असते तर मी ते विकत घेतलं असतं.' तथापि, गेर्टलर वेगळ्या वंशातला आहे अशाच नजरेनं तो त्याच्याकडे पाहात असे. याच वर्षी गिल्बर्ट कान्नानची 'मेन्डेल' ही कादंबरी प्रकाशित झाली. गेर्टलर आणि डोरा कॅरिंग्टन यांच्या प्रेमसंबंधावर ही आधारित आहे. आपल्या मित्राच्या जीवनाचं हे बीभत्स वाङ्मयीन रूप पाहून लॉरेन्स भडकला. परंतु या संदर्भात त्यानं गिल्बर्टला दोष दिला नाही, दोष दिला गेर्टलरला. कॅथरीन कार्सवेलला त्यानं लिहिलं, गेर्टलरनं स्वत:च्या आयुष्यातील प्रत्येक तपशील गिल्बर्टला सांगितला हे ज्यूला साजेसं आहे! तरीही त्यांची मैत्री घनिष्ट होती. स्वत:च्या खिशात तुटपुंजे पैसे असतानाही लॉरेन्सला तो पैसे देऊ करत असे. ५ डिसेंबर १९१६ च्या पत्रात त्यानं देऊ केलेले उधार पैसे नाकारताना लॉरेन्सनं लिहिलं. 'मला शक्य आहे तोवर धनिकांकडून उधार पैसे घ्यायचे, गरिबांकडून नाहीत हा माझा दंडक आहे. 'वूमेन इन लव्ह' मध्ये विकृत शिल्पकार लोएर्के या रूपात गेर्टलरची व्यक्तिरेखा रेखाटताना त्याचं औदार्य, त्याचा नि:सीम स्नेह याचा लॉरेन्सला विसर पडला होता.

युक्रेनमधील रशियन सॅम्युएल सोलोमोनोविच कोटेलिआन्स्की हा लॉरेन्सचा आणखीन एक ज्यू मित्र. कीव्ह विद्यापीठाकडून मिळालेल्या शिष्यवृत्तीवर १९१० मध्ये तो लंडनला आला होता. हाय होल्बोर्न येथील विधी-कचेरीत सेक्रेटरी व भाषांतरकार म्हणून त्यानं काम केलं होतं. कॅथरीन मॅन्सफिल्ड, मरे, लिओनार्ड आणि व्हर्जिनिया वुल्फ यांच्या सहकार्यानं त्यानं टॉलस्टॉय, डोस्टीएवस्की आणि चेकॉव्ह यांच्या काही साहित्यकृतींचे इंग्रजीमध्ये अनुवाद केले होते. लिओनार्ड सांगतो : 'कॉटला जे चांगलं वाटतं त्याविषयी त्याची मनापासूनची मान्यता..... खोटं बोलण्याची त्याची असमर्थता कॉटशी तुमचा जर का घनिष्ट परिचय झाला तर ३००० वर्षांपूर्वी प्रमुख हिब्रू प्रेषित कसा असेल हे तुम्हाला कळून येईल.'

लॉरेन्सला कॉटचं भारी कौतुक. त्यानं कॉटला जेवढी पत्रं लिहिली तेवढी कुठल्याही अन्य मित्राला लिहिली नव्हती. त्यात ज्यूंच्या वृत्तीबद्दलची लॉरेन्सची मतं व्यक्त होत असत. १९१७

मध्ये त्यानं लिहिलं : ज्यूंचा द्वेष माणसं का करतात? मी एका निष्कर्षाप्रत आलो आहे आणि तो म्हणजे ज्यूंनी सातत्यानं घेतलेला धर्माचा आसरा– थेट प्राचीन काळापासून- आणि त्याचा वापर त्यांनी स्वत:च्या व्यक्तिगत आणि खाजगी इच्छापूर्तीसाठी केला, जणू काही ती एक अशी गोष्ट होती जी त्यांचं स्वत:चं महत्त्व, सुस्थिती आणि डामडौल वहिवाटीच्या हक्कानं अबाधित ठेवू शकत होती. गुलाम बनवण्याची ज्यूंची ही क्लृप्ती– त्यांनी श्रेष्ठ धार्मिक भावनांचा वापर खाजगी डामडौल अबाधित राहाण्याची एक क्लृप्ती म्हणून केला. तथापि, कॉटला आयुष्यभर लॉरेन्सबद्दल आदरच वाटत असे. वंश म्हणून ज्यू वेगळे आहेत अशी लॉरेन्सची भावना असली, आणि गुलाम करण्याची क्लृप्ती या शब्दप्रयोगात नीत्शेचा प्रतिध्वनी उमटलेला असला तरी तो नाझी मनोवृत्तीचा नव्हता. १९५३ मध्ये 'हार्पर्स'च्या अंकात रसेलनं लॉरेन्सचा नाझी असा उल्लेख केला तेव्हा फ्रीडानं त्याला दटावलं. तू सेंट ऑगस्टीनलाही नाझी म्हणू शकशील. हिटलर सत्तेवर आलेला पाहायला लॉरेन्स जिवंत नव्हता, जिवंत असता आणि त्याच्या स्वत:च्या विचारसरणीशी सादृश्य असलेल्या वक्तृत्वानं भारावून गेला असता तरी नाझी भस्मासुराच्या दर्शनानं, कृत्यांनी त्याला चीडच आणली असती, त्याचा त्यानं तिरस्कारच केला असता हे नि:संशय.

बाह्य घडामोडींविषयी अत्यंत जागरूक असणारा लॉरेन्स फ्रीडाबरोबरचे स्वत:चे संबंध, त्यातील ताणतणाव यांचाही मागोवा घेत होता, त्यांना वाङ्मयीन रूप देण्यास त्यानं प्रारंभ केला होता.

'द रेनबो' या नावानं आपल्याला परिचित असलेली कादंबरी ऑगस्ट १९१४ आणि मे १९१५ या दरम्यानच्या काळात लिहिली गेली आहे. 'द सिस्टर्स' चा तिसरा खर्डा प्रकाशन करण्यालायक नाही म्हणून मेश्यूएननं तो साभार परत केल्यानंतर तिच्या कथानकातील पूर्व भागावर लॉरेन्सनं 'द रेनबो' नव्यानं लिहिली. या कादंबरीमध्ये लॉरेन्स आणि फ्रीडा यांच्या जीवनाचं प्रतिबिंब लख्खपणे पडलेलं आहे. 'सन्स अँड लव्हर्स' मधील क्लॅरा डॉवेस नवऱ्याकडे येण्यासाठीच केवळ त्याला सोडून जाते यावरून फ्रीडानं लॉरेन्सला वेळोवेळी डिवचलेलं होतं. आता स्वत:च्या आयुष्यावर आत्मविश्वासानं नियंत्रण ठेवणाऱ्या स्त्रियांचं चित्रण करून आपली जुनी चूक सुधारण्याचा त्याचा विचार होता. तथापि, त्या आत्मविश्वासाबाबत अजूनही त्याची मन:स्थिती द्विधा असल्याची जाणीवही त्याला होती, त्यानं दुसरा हेतू प्रकट केला : फ्रीडामधील 'सर्वशक्तीमानता, त्यातील समग्र ऐश्वर्यासह' दाखवायची.

आपल्या विवाहाच्या निकोपपणावर विश्वास ठेवण्याची गरज लॉरेन्सला भासत होती. आपल्या सहजीवनात आत्यंतिक सुख मिळवणं त्यांना शक्य होतं. म्हणूनच त्याच्या मित्रांना खटकणारी त्यांची कडाक्याची भांडणं दुर्लक्षित करण्याकडे त्याचा कल होता, किंबहुना त्या भांडणांना नैतिक मूल्य आहे असा त्याचा आग्रह असे. मुलांच्या वियोगानं फ्रीडा रडते हेच भांडणाचं

एकमेव कारण राहिलेलं नव्हतं, आणखीनही एक कारण होतं, अतिशय स्फोटक असं, आणि कादंबरी त्याचे मूळ शोधण्याचा प्रयत्न करते.

'द रेनबो'ला नॉटिंगहॅमशायर आणि डर्बीशायरची पार्श्वभूमी आहे. औद्योगिक क्रांतीपासून पहिलं महायुद्ध, या कालखंडातील तीन पिढ्यांची ही कहाणी आहे. या कादंबरीचा घाट पारंपारिक आहे. 'सन्स अँड लव्हर्स' मधील पॉल मोरेल– लॉरेन्स असं समीकरण मांडता येतं. एवढं त्या दोघांच्या आयुष्यात साम्य आहे. असं ठसठशीत साम्य 'द रेनबो' मध्ये आढळत नाही. इथं प्रत्येक पुरुषपात्राला भावनांचा एक 'पॅटर्न' दिलेला आहे, ज्याचं साम्य फ्रीडाबरोबरच्या लॉरेन्सच्या नात्याशी आहे. टॉम ब्रँगवेन मिसेस लिडीया लेन्स्कीला प्रथम पाहातो तत्क्षणी त्याला हव्या असलेल्या स्त्रीची त्याला ओळख पटते. तो उद्‌गारतो, "हीच ती." फ्रीडाप्रमाणं लिडीया सुखवस्तू घरात जन्मलेली आहे, निग्रही आहे, विवाहित आहे आणि टॉमपेक्षा सहा वर्षांनी मोठी आहे. तिच्यामधली ही वैशिष्ट्ये टॉमला त्याच्या लैंगिक गंडापासून मुक्त करतात आणि आपल्याशी लग्न करशील का हे तिला विचारण्याइतपत त्याच्यात आत्मविश्वास जागवतात.

मिसेस लेन्स्कीच्या अंगी काहीशी गूढ अलिप्त वृत्ती आहे जी लैंगिक आकर्षणाला हातभार लावते. पण तिचा त्याला धाकही वाटतो. बऱ्याचदा ती टॉमकडे दुर्लक्ष करताना दिसते. त्याच्या कामासक्तीमध्ये भीती आणि भक्ती याचं मिश्रण आहे. आपली वासना त्या विवाहित स्त्रीला कलंकित करील ही धास्ती त्याला कधीच वाटत नाही. (जशी गावातल्या मुलीविषयी त्याला वाटत असे) परंतु संबंध गाढ होत जातात तसतसा तिच्या अलिप्त वृत्तीनं तो वेडापिसा होतो, त्याच्यामधला आग्यावेताळ जागा होता.

लिडीया गरोदर राहाताच टॉमला धाक दाखवणारी तिची अलिप्तता केवळ काल्पनिक राहात नाही. तो 'स्थानभ्रष्ट' झाल्याची भावना व्यक्त करतो, जणू काही त्याच्यासाठी असलेलं एकमेव स्थान जन्माला येणारं अपत्य बळकावून बसणार आहे. लिडीयाची पहिल्या नवऱ्यापासून झालेली मुलगी अॅना टॉमला तिच्या आईच्या बिछान्यावरून हाकलून देण्याचा प्रयत्न करते. टॉमचा मत्सर (मुलांच्या ओढीनं रडणारी फ्रीडा पाहून मत्सरानं थरथरणाऱ्या लॉरेन्सचं इथं स्मरण व्हावं) आपल्याकडे 'लक्ष वेधून घेण्याच्या आत्यंतिक गरजेपोटी प्रकट झालेला आहे. लक्ष वेधून घेण्यासाठी तिचा तो चक्काचूर करून टाकील.'

वैवाहिक जीवन पुढं सरकत असतं. समागमाला थोडा आवर घालण्याचं बंधन स्वत:वर घालून घेण्यास टॉमला शिकावं लागतं, आणि शक्यता आहे, लॉरेन्सलाही तसंच करावं लागलं असणार. लिडीया लेन्स्कीप्रमाणं, फ्रीडाला तिचा नवरा केवळ तिच्या इच्छेनुरूप आणि तिच्या स्वत:च्या गरजेपुरता हवा होता. लिडीया तक्रार करते की टॉमला तिची बेसुमार गरज वाटत असते, पण त्याच्यावर तिला प्रेम करायला लावण्याइतपत तो तिच्यासाठी काही करत नाही. फ्रीडासाठी लॉरेन्स आणखीन काय करू शकणार होता? पैसे तो कमावत होता, मित्रांचा स्नेह त्यानं जोडलेला होता, सारं घरकाम तो स्वत: करत होता; तथापि, लिडीयाचा आरोप, माझ्या

मते, लॉरेन्सच्या स्वानुभवारून केला गेलेला आहे. तद्वतच फ्रीडाला शय्यासोबतीत जेवढं सुख तो देत होता त्याच्याशी निगडित आहे. अन्य लेखकाच्या संदर्भात हे अनुमान सयुक्तिक ठरणार नाही, परंतु समागमाआधीच्या प्रणयक्रीडांविषयीची त्याची नाराजी आणि आपल्या स्वत:च्या कामवासनेची हावरेपणानं तृप्ती करून घेणाऱ्या स्त्रियांबद्दल त्याला वाटणारी शिसारी- लॉरेन्सच्या पुढील काळातील लेखनात उमटलेली त्याची ही स्वभाववैशिष्ट्ये वरील अनुमानाला बळकटी देतात. काहीही असो, फ्रीडाबरोबरची त्याची भांडणं आता उघडपणे त्यांच्यामधील लैंगिक संबंधावरून होत असत. १९१४ च्या शरदात मरे आणि लॉरेन्स यांच्यामध्ये 'सेक्स'विषयी अगदी खाजगीत संभाषणं चालत. थोड्याफार प्रमाणात चारचौघांपुढं होणारी लॉरेन्सांची भांडणं याला कारणीभूत झालेली होती. एका प्रसंगी, 'कुत्रा कुत्रीशी जे करतो' तसा भोग तू आपला घेतोस असा आरोप फ्रीडा लॉरेन्सवर करत असताना मरेच्या कानी पडलं होतं, त्यानंतरच्या शाब्दिक तळतळाटामधून सूचित होत होतं की कुठल्याही तऱ्हेनं लॉरेन्सशी समागम करण्याची फ्रीडाची इच्छा नव्हती.

लिडीयाचं चित्रण नेहमीच सहानुभूतीनं केलेलं आहे. वरकरणी ती आत्मविश्वास दर्शवत असली तरी एकाकीपणाची, असुरक्षिततेची भावना तिच्यात आहे हे टॉमला काही वेळेला जाणवतं. ती तक्रार करते, जणू काही ती 'कुणीच नाही' हे तिच्या मनावर ठसवण्याचा तो प्रयत्न करतो. लॉरेन्सचं कौतुक असणाऱ्या बऱ्याच स्त्रिया असूनही लॉरेन्सनं उभ्या आयुष्यात फ्रीडाशी कधी बेईमानी केली नव्हती. एका प्रसंगी लिडीया टॉमला विचारते, त्याला दुसऱ्या स्त्रीकडे जायचं आहे का, जसं फ्रीडानं लॉरेन्सला विचारलेलं असेल. टॉमप्रमाणंच लॉरेन्सही अन्यत्र जाणं असंभवनीय होतं.

लिडीयाची मुलगी ॲना आणि टॉमचा पुतण्या विल यांचा विवाह होतो. विल हा मस्तकात जावा एवढा ॲनावर अवलंबून असतो. तर ॲना 'ॲना विक्ट्रीक्स' म्हणून आपला वेगळेपणा जपण्यात धन्यता मानते. तिचं व्यक्तिमत्त्व फ्रीडाचं स्मरण करून देते. सर्वसामान्य माणसांना तुच्छ लेखणारी, आपलं तेच खरं करणारी ॲना प्रियकर म्हणून आपल्या चुलत भावाची निवड करते. फ्रीडाप्रमाणंच आईवडिलांची नाखुषी, त्यांचा विरोध बाजूला सारून दरिद्री विलशी लग्न करण्याच्या स्वत:च्या निर्णयावर ॲना ठाम राहाते.

ॲना आणि विल हनीमूनचं सौख्य एवढं मनमुराद लुटतात की त्या आनंदाच्या डोही डुंबत असताना शयनगृहाबाहेरील जगाचा त्यांना विसर पडतो, आणि तहानभूकही ते विसरून जातात. आपण उठून कामाला लागत नाही म्हणून विल शरमिंदा होतो, पण ॲना मात्र बिछान्यात बिनदिक्कतपणे लोळत राहाते (गार्गनॅनोमधील लॉरेन्सांच्या दिवसांची स्मृती जागी होते) तथापि, ॲनाचे विलवरील वर्चस्व विनाशकारक असल्याचं दर्शवण्यात आलं आहे, जशी लॉरेन्सला भीती वाटत असायची की फ्रीडाचं त्याच्यावरील वर्चस्व विनाशकारक आहे.

कादंबरीमध्ये, आपल्याच कोषात गुरफटून राहाण्याचा कंटाळा येतो तो ॲनाला. बाहेरील

जगाला आपल्या घरात प्रवेश देण्यासाठी ती चहापार्टी देते.

आपण आपल्या खाजगी आयुष्याच्या बाहेर फेकले गेलो आहोत, लहान बालकाप्रमाणं आपल्याशी बोललं जात आहे हे पाहून विलचं माथं भडकतं. लॉरेन्स फ्रीडावर काढत असे तसाच आपल्या रागाचा वचपा विल ॲनावर काढतो. तिरस्काराच्या कचाट्यात सापडल्यामुळं ॲना जे जे करते ते सारं त्याच्या मस्तकात जातं. विलच्या या वागणुकीत ॲना कष्टी होते. एकांतात अश्रू ढाळते. तिच्या डोळ्यातून आसवं ओघळताना तो पाहातो, तत्क्षणी तिच्या दुःखाची त्याला प्रकर्षानं जाणीव होते. तो अश्रूंनी चिंब झालेल्या तिच्या चेहऱ्याला आपल्या ओठांनी हलकेच स्पर्श करतो आणि प्रेमानं थरथरतो, जणू काही त्यांच्यामधल्या क्रोधानं त्यांची प्रणयक्रीडा अधिक हळुवार बनवली होती. लॉरेन्स आणि फ्रीडा यांच्या मित्रांनी पाहिलेल्या त्या दोघामधल्या प्रेमळ समेटातही हाच घटक होता.

तथापि, ॲनाचा स्वतंत्र बाणा विलला असह्य होतो. जेव्हा तो प्रेमभरात घरात पाऊल टाकतो तेव्हा ॲना शिवणाच्या मशिनवर बसलेली त्याचा नजरेला पडते, आतुरतेनं ती आपली वाट पाहात नव्हती, याचा हा पुरावा पाहून रागानं त्याचा चेहरा आक्रसतो. त्याला वाटतं, जर का ती त्याच्यावाचून राहू शकते त्याचाच अर्थ तर तिला त्याची पुरेशी गरज भासत नाही. ॲना गरोदर असतानाचा एक सुरेख प्रसंग आहे. ॲना एकटीच नाचत असते, आत्ममग्न आणि हर्षनिर्भर प्राणी, गर्भारपणामुळं टपोरलेलं पोट– तिचं हे रूप आपल्यामधला 'स्व' जपणाऱ्या एका स्त्रीचं होतं. तिच्या आयुष्यातला प्रत्येक क्षण आपल्या हुकुमतीखाली असावा ही विलची इच्छा त्यांच्यामधल्या साऱ्या भांडणांना कारणीभूत होत होती. ॲनाला वाटतं, स्वतःचं आयुष्य स्वतःच्या इच्छेनुरूप जगता यावं यासाठी तिला त्याच्याशी झगडावं लागतं. ॲना जेव्हा तक्रार करते, "मला तू झोपू देणार नाहीस, मला तू जगू देणार नाहीस." तेव्हा फ्रीडाचा आवाज आपण ऐकत असतो. त्यांची कितीही कडाक्याची भांडणं होवोत, ॲनाला सोडून जाण्याच्या विचाराला त्याच्या डोक्यात थारा नसतो. अन्य स्त्रीकडे जाण्याचं तो केवळ कल्पनाचित्र रंगवू शकतो. अन्य स्त्रीकडे गेल्यानं परिस्थिती यत्किंचितही पालटणार नाही, तिच्यावर तो आहे तसाच अवलंबून राहाणार याची त्याला पूर्ण जाणीव होती. विलप्रमाणंच लॉरेन्सही फ्रीडावर अवलंबून होता, 'जसं बालक आपल्या आईवर अवलंबून असतं.' जेव्हा त्याची मुलगी उर्सुला जन्मते तेव्हा विल प्रेमासाठी तिच्याकडे वळतो, जसे घरात सत्ता गमावून बसलेले पुरुष त्यांच्या मुलींकडे वळतात.

कादंबरीच्या या भागात पुरुषाच्या कामभावनेतील एक घटक म्हणून लॉरेन्स परपीडकवृत्तीचं विश्लेषण करू पाहातो. विलची स्वतःच्या मुलीबद्दलची परपीडकवृत्ती विचित्ररीत्या वाढीला लागते. तिला घेरी येईपर्यंत झोपाळ्यावर तिला उंच उंच झोके देतो (असे झोके लॉरेन्सनं जेसी चेंबर्सला दिले होते.) ॲनाशी बराच काळ झोंबाझोंबी केल्यानंतर विल एक पोरगी पकडतो. तिच्या बरोबरच्या सुरतसमयी त्याच्या अनुभवात परपीडकवृत्ती शिरकाव करते. हुकूमत

गाजवण्यातला आनंद तो भोगतो, त्या कैफात प्रणयचाळे करता करता बलात्कार केल्यागत तिच्याशी समागम करतो. या अनुभवाची शिदोरी घेऊन तो आपल्या पत्नीकडे परततो आणि ती समागमात त्याला उत्कटतेनं प्रतिसाद देते. विलमध्ये असा काहीतरी बदल घडून आला आहे, ज्याचा आवेग आपण कमी करू शकत नाही याची जाणीव ॲनाला होते. ही जाणीवच त्यांच्यामध्ये नव्यानं जागवल्या गेलेल्या या कामासक्तीच्या मुळाशी आहे असं लॉरेन्स सांगतो, त्याचबरोबर त्यांच्या मैथुनात नैतिकतेचा अभाव असल्याचंही तो सांगतो, कारण दोघंही केवळ स्वत:च्या तृप्तीचा हव्यास बाळगत असतात.

कादंबरीच्या तिसऱ्या भागाच्या केंद्रस्थानी उर्सुला आहे. विल आणि ॲना यांची ही मुलगी. या भागात कामासक्ती अत्यंत विध्वंसक स्वरूपात दाखवली गेली आहे. लुई बंटोजप्रमाणं (तिच्या व्यक्तिमत्त्वाच्या काही छटा उर्सुलामध्ये मिसळेल्या आहेत. तिच्या घराची पार्श्वभूमी विल आणि ॲना यांच्या आयुष्याला लाभलेली आहे) उर्सुलाची धारणा आहे की स्वत:च्या पायावर उभं राहाणं, स्वत:ची रोजीरोटी स्वत: कमावणं यातच आपली मुक्ती आहे. जेसी चेंबर्स, हेलेन कॉर्क याच मताच्या होत्या. कदाचित् लॉरेन्सच्या आईनंही असाच विचार केला असता. व्यक्तीच्या नोकरीला एवढं महत्त्व दिलं जातं, जेणेकरून वैवाहिक जीवन आणि घर यांना गौणत्व प्राप्त झालं होतं, फावल्यावेळात तिथं लक्ष पुरवायचं असं समजलं जात होतं, ही बाब लॉरेन्सला खटकत होती.

उर्सुलेचा शिक्षकीपेशा तिला स्वातंत्र्य देत नाही तर एक प्रकारच्या तुरुंगात बंदिस्त करून टाकतो ! फ्रीडा अर्थात, या स्त्रियांमध्ये मोडणारी नव्हती. फ्रीडाला कुठल्याही प्रकारच्या कामात काडीचंही स्वारस्य नव्हतं. उर्सुला बेभानपणे आपली शिक्षिका विनीफ्रेड इन्गेर हिच्या प्रेमात पडते, नग्नावस्थेत दोघीही समुद्रस्नान करतात हे चित्रण कॅथरीन मॅन्सफिल्डच्या अनुभवाच्या आधारे केले आहे.

लॉरेन्सला भेटायला त्याचे बरेचसे स्नेही चेशॅमला येत. मरेज, कॉट, गेर्टलर, कन्नान पतिपत्नी वगैरे. यातील बरेचसे फ्रीडाच्या विरोधात. मरे आणि कॉट यांचा तर तिच्याशी छत्तीसाचा आकडा. मरेचं म्हणणं, ती बिनडोक आहे आणि तिच्याशी उद्धटपणे वागायला लागू नये म्हणून स्वत:ला काबूत ठेवणं कष्टदायक आहे. लॉरेन्स कॉटचं दैवत. पण फ्रीडाविषयी त्याला आत्यंतिक तिटकारा. जेव्हा जेव्हा आपल्या मुलांच्या ताटातुटीवरून ती तक्रारीचा सूर काढत असे त्यावेळी कॉट बेचैन व्हायचा. एकदा त्यानं तिला सुनावलं की ती लॉरेन्सच्या पाठीशी एवढ्या खंबीरपणे उभी राहिली आहे, हा वियोग तिला सहन करता येऊ नये, छी:! फ्रीडा ताडकन उभी राहिली आणि चकार शब्द न् बोलता घराबाहेर पडली. भर पावसातून तिनं 'रोज ट्री' कॉटेजचा रस्ता धरला. तीन मैलाचा प्रवास. भिरकीत चालत राहिली. मरेंच्या घरी पोचली. कॅथरीनला भेटली. त्यानंतर काही वेळानं कॅथरीन लॉरेन्सच्या दारात उभी ठाकली. ओलेती. स्कर्ट गुडघ्यापर्यंत वर

खेचलेला. हे जे नाटक चाललं होतं त्यातली मौज ती चवीनं चाखत होती हे उघड आहे. तिनं फ्रीडाचा निरोप ऐकवला, 'ती पुन्हा इथं कधीच पाऊल टाकणार नाही.' त्यावर लॉरेन्स गरजला : जाऊ दे खड्ड्यात तिला. तिचं पुन्हा तोंड पाहायची माझी इच्छा नाही. हे भांडण नित्याप्रमाणं मिटलं आणि लॉरेन्स व फ्रीडा पुनश्च गोडीगुलाबीने नांदू लागले हे सांगणे नलगे. पण फ्रीडाबद्दलचा कॉटचा तिटकारा मात्र कमी झाला नाही. तिच्याविषयीचं आपलं मत त्यानं लॉरेन्सला कळवलंही. त्याला लॉरेन्सनं उत्तर दिलं की तिच्याबद्दलचं त्याचं मत एवढ्या सहजपणे त्यानं बनवणं योग्य नव्हे. स्त्रीमध्ये अन्य गुण असतात जे त्याला ठाऊक नाहीत. म्हणून त्यांचं मूल्यमापन तो करू शकणार नाही. त्याला ठाऊक नाही की स्त्री ही पुरुष नाही, भिन्न लिंग असलेला. त्यांच्याबद्दलचं त्याचं ज्ञान अर्धवट आहे. त्याचं जग म्हणजे पृथ्वीचा केवळ अर्धगोल. यानंतरही कॉटचं मत बदललं नाही. त्याच्या लक्षात येऊ शकलं नव्हतं की फ्रीडाला लॉरेन्सच्या चहात्यांच्या वर्तुळाबाहेर कटाक्षानं ठेवलं जात होतं. लॉरेन्सच्या आयुष्यात जे स्थान तिला प्रारंभी होतं त्याला धक्का लागला होता. ते स्थान आपण गमावून बसल्याची दु:खद जाणीव तिच्या मनात वाढीला लागली होती. ही जाणीवच तिच्या चिडचिडेपणाला कारणीभूत ठरत होती.

ख्रिसमस जवळ आल्यामुळं भांडणतंटे काही काळापुरते विसरले गेले. मरे आणि लॉरेन्स यांना हा ख्रिसमस जास्तीत जास्त मौजमजेत साजरा करायचा होता. त्यांनी मेरी आणि गिल्बर्ट कन्नान यांच्या सहकार्यानं समारंभाची आखणी केली. लॉरेन्सनं 'पंच' बनवला. लंडनहून पाहुणे आले. त्यात मार्क गेर्टलर होता. ख्रिसमसच्या दिवशी प्रत्येकानं बरंच मद्यप्राशन केलं आणि गेर्टलरनं कॅथरीनचं चुंबन घेतलं.

घडलं असं : कॉटनं सुचवलं, 'नाटकातलं नाटक करायचं' पती, पत्नी आणि तो. पती झाला मरे, पत्नी बनली कॅथरीन आणि 'तो' या देखण्या आजारी माणसाची भूमिका गेर्टलरला देण्यात आली. कॅथरीननं गेर्टलरबरोबर 'फ्लर्टिंग' करायचं. त्या अनुषंगानं मरे आणि कॅथरीन यांनी आपल्या वैवाहिक जीवनातील समस्यांचा ऊहापोह करायचा. अंतिमत: कॅथरीनने मरेकडे माघारी यायचं. प्रयोग सुरू झाला, रंगला. पण आधी ठरवल्याप्रमाणं मरेकडे जायला कॅथरीननं नकार दिला. मरेनं या गोष्टीचा बाऊ केला नाही पण त्याच्या शामळूपणानं लॉरेन्स उखडला. मरेची शामळू वृत्ती कॅथरीनला अजिबात रुचत नसल्यामुळंच ती त्याचा सतत पाणउतारा करत असते हा कयास चुकीचा नसल्याची लॉरेन्सची खात्री पटली.

मरेबरोबरच्या 'अफेअर'ला पूर्णविराम द्यायचा निर्णय कॅथरीननं एव्हाना घेतला होता. अर्थात् तिचा डोळा गेर्टलरवर नव्हता. फ्रेंच कवी आणि चित्रकार फ्रांसिस Carco याच्याशी तिची मैत्री जुळून आली होती. त्याचं लिखाण 'ऱ्हिदम'च्या एका अंकात प्रसिद्ध झालं होतं. जानेवारीत तिची पत्रं भरभरून त्याला जात होती. अखेर १५ फेब्रुवारीला तिनं इंग्लंडचा निरोप घेतला आणि फ्रांसिसबरोबर राहायला ती फ्रांसमध्ये गेली. फ्रांसवर पाऊल टाकताच पहिली गोष्ट तिनं केली, फ्रीडाला पत्र लिहिलं. त्या दोघींमधलं भगिनीप्रेम अद्याप ओसरलं नव्हतं.



अनुक्रमणिका

१९१५ च्या जानेवारीत, २० तारखेच्या आसपास लॉरेन्स ग्रेटहॅममध्ये राहायला गेला ही छानदार कॉटेज व्हायोलेट मेनेल हिनं त्यांना राहायला दिली होती. त्याला बसलेला युद्धाचा जीवघेणा धक्का एव्हाना ओसरला होता. त्याची जीवनेच्छा पालवू लागली होती. एक दिवस फेरफटका मारत असताना, 'पुन्हा मी माझे डोळे उघडले, आणि पाहिलं सर्वत्र उजेड होता.'

कॅथरीन गेल्यामुळं मरे उदास असणार याची कल्पना लॉरेन्सला होती. त्यानं मरेला आपल्या घरी येण्याचं आमंत्रण दिलं. मरे भर पावसात चिखल तुडवत चिंब होऊन लॉरेन्सकडे आला. आणि इन्फ्लुएंझाच्या तापानं फणफणत अंथरुणाला खिळला. त्यानं आपल्या प्रकृतीची हेळसांड केली म्हणून लॉरेन्सनं त्याची खरडपट्टी काढली आणि नंतर जणू काही तो बालक असल्यागत त्याची शुश्रूषा केली. मरेची प्रकृती सुधारली. १९२१ मध्ये लिहिलेल्या 'आरॉन्स रॉड' या कादंबरीत या घटनेनं शिरकाव केलेला आहे.

लॉरेन्स चेशॅममध्ये होता तेव्हापासून एक 'नवीन समाज' घडवण्यासंबंधीचे विचार त्याच्या मनात घोळत होते. १८-१-१९१५ रोजी त्यानं हॉपकिनला लिहिलं होतं : 'मला वीसेक माणसं एकत्र आणायची आहेत आणि या युद्धग्रस्त, कंगाल जगापासून कुठंतरी दूर जायचं आहे, एखाद्या बेटावर आणि एक छोटी कॉलनी स्थापन करायची आहे. जिथं सुबत्ता नसेल, जीवन जगण्यापुरत्या गरजा भागवता येतील, माणसं प्रामाणिक असतील'

या 'नवीन समाजा' विषयीचे लॉरेन्सचे विचार ग्रेटहॅमला आल्यानंतर स्पष्ट होत गेले. त्याच्याकडे येणाऱ्या प्रत्येकाला तो आपले विचार ऐकवू लागला, बर्ट्रांड रसेलसारख्या परगावच्या मित्रांना पत्रांमधून कळवू लागला. आपल्या कार्यात ऑट्टोलिन मोरेलनं सहभागी व्हावं ही त्याची इच्छा. गार्सिंग्टनच्या तिच्या घराभोवतीच्या ५०० एकर जमिनीवर या नव्या समाजाचं केंद्र उभारता आलं तर बरं, नव्या जागेचा शोध घेण्याची दगदग वाचेल हा त्याचा अंत[illegible] १ फेब्रुवारीला त्यानं ऑट्टोलिनला पत्र पाठवलं. पाचशे एकर जमिनीचा उल्लेख टाळून [illegible] की या नवीन समाजाचं केंद्र तिनं उभारावं. या समाजाचं स्वरूप कसं असेल याची कल्पना तिला या पत्रात विशद केली. ती थोडक्यात येणेप्रमाणे :

"हा समाज एका नव्या जीवनाचा प्रारंभ करील असं जीवन ज्यात व्यक्तित्वाची मचोटी हीच एकमेव संपत्ती असेल. आपण एकमेकांची टर उडवू, एकमेकांचा तिटकारा करू. तरीही चांगुलपणा उरतोच हे आपण जाणतो. आपल्यांमधील या ज्ञात आणि शाश्वत चांगुलपणावर या नव्या समाजाची उभारणी होईल. युद्ध संपल्यानंतर माणसाचा आत्मा एवढा पंगू, एवढा घायाळ झालेला असेल की त्या नुसत्या विचारानंच थरकाप उडतो. त्यांच्यासाठी आपला समाज एक नवा आशेचा किरण ठरेल. आपल्या समाजात पैशासाठी वा सत्तेसाठी झगडे नसतील, असेल व्यक्तिगत स्वातंत्र्य आणि सामान्यांची उन्नती करण्याचे सामुदायिक प्रयत्न. प्रत्येकानं ध्यानी ठेवायला हवं की तो एका मोठ्या देहाचा एक अवयव आहे.

आपल्याला प्रारंभी अत्यंत काळजीपूर्वक पावलं उचलावी लागतील. भला थोरला साप

आपल्याला नामशेष करायचा आहे. हा साप म्हणजे सत्ता गाजवण्याची इच्छा. आपल्या देशवासीयांवर हुकूमत गाजवण्याची एका माणसाची दुर्दम्य इच्छा. आपल्याला व्यक्तिगत दबाव नको, 'मला अनुसरा' नको तर फक्त 'पाहा'.

हा साम्यवाद आधारलेला आहे श्रीमंतीवर. दारिद्र्यावर नव्हे; स्वाभिमानावर, मान तुकवण्यावर नव्हे; साऱ्या प्रबळ वासनांच्या परिपूर्ण पूर्तीवर, त्यांच्या त्यागावर नव्हे, स्वर्गात नव्हे तर भूतलावर. या पृथ्वीवरील आपण परमेश्वराचे पुत्र असू. गोष्टींकडे आपला कल नसेल, कारण आम्हाला ठाऊक आहे साऱ्या गोष्टींचे आम्हीच वारसदार आहोत. आम्ही खानदानी असू आणि जमावाला हाताळण्यात सापाप्रमाणं धूर्त असू. जमाव आम्हाला चिरडून टाकू शकणार नाही, भुकेनं तडफडवू शकणार नाही वा जीवे मारू शकणार नाही. आम्ही जमावाशी, त्या पिपासू माणसांशी चाणाक्षपणे व्यवहार करू, हळहळू त्यांना आम्ही अंकित करू. आम्ही सुव्यवस्था निर्माण करू. आपण सारे राजपुत्र, जसे परमेश्वराचे देवदूत.''

मरेलासुद्धा त्यानं आपले विचार ऐकवले. पण त्याच्या विचाराशी आपण असहमत आहोत असं मरेनं दर्शवलं नाही. नुकतीच कॅम्पबेलबरोबरची मरेची मैत्री संपुष्टात आली होती. कॅथरीनशी पत्रव्यवहार होता पण ती परत आपल्याकडे येईल याची खात्री नव्हती. लॉरेन्सशी जुळून आलेले घनिष्ट संबंध त्याला अधिक दृढ व्हायला हवे होते. लॉरेन्स ऐकवी ते तो निमूट ऐके. लॉरेन्सनं त्याला सांगितलं,''लिखाणाबिखाणात काही अर्थ उरलेला नाही, जीवनाची सांप्रतची परिस्थिती प्रथम बदलायला हवी. 'द रेनबो' नंतर एक कादंबरी तो लिहील. पुढील काळात त्याची जागा घेणाऱ्या त्याच्याहून महान कादंबरीकारांना बाप्तिस्मा देणाऱ्या जॉनप्रमाणं तो केवळ अग्रदूत आहे. आणि हा थोर कादंबरीकार मरेवाचून अन्य कोण असेल!'' 'लॉरेन्सनं माझ्यावर भार टाकावा हा शुद्ध वेडेपणा आहे' असं मरेला वाटलं पण तो मनोमन सुखावलाही. लॉरेन्सच्या जीवनातील आपलं स्थान बळकट करण्याच्या कामी तो लागला. परिणामी फ्रीडाबद्दलचा त्याचा तिटकारा वाढीला लागला. १९१५ च्या मेमध्ये त्यानं कॅथरीनला लिहिलं की उन्हाळ्याच्या सुट्टीत लॉरेन्सला आपल्याबरोबर घेऊन दूर कुठंतरी जाण्याचा त्याचा विचार आहे. फ्रीडाला तो सोडचिठ्ठी देऊ शकतो का हे त्याला पाहायचं आहे. काहीशा निष्पापपणे पण पूर्ण विश्वासानं त्यानं लिहिलं की, त्याच्या संगतीत लॉरेन्स सुखी आहे कारण त्याच्या ध्यानी आलं आहे की मी त्याच्यावर प्रेम करत आहे ! त्यावर कॅथरीनचं तिखट प्रत्युत्तर आलं.

मरेच्या मनात लॉरेन्सविषयी जे प्रेम होतं ते अशारीरिक होतं. 'ब्लूम्सबरी ग्रूप' मधील आपल्या काही समलिंगसंभोगी परिचितांबद्दल लॉरेन्सला तिटकारा वाटत होता. त्यानं नुकतंच डेव्हिड गार्नेटला सांगितलं होतं की तो आणि समलिंगसंभोगी मित्र यातून त्यानं एकाची निवड करावी. गार्नेटनं आपल्या मित्रांची निवड केली होती. तथापि, तो आणि मरे यांच्यात प्रेमळ नातं निर्माण झालं असल्याची भावना फ्रीडाबरोबरचे लॉरेन्सचे ताणतणाव सुसह्य करत होते, त्याचबरोबर मरेबद्दलच्या फ्रीडाच्या क्रोधाग्नीत तेलही टाकत होती. दरम्यान कॅथरीन फ्रान्समधून

येतजात होती. Carco बद्दलचं तिचं आकर्षण ओसरू लागलं होतं. त्यांचं प्रेमप्रकरण कधीच उत्कट नव्हतं. 'ॲन इनडिस्क्रीट जर्नी' आणि 'je ne parle pas francais' या कथांमधून तिनं त्याचं जे चित्रण केलं आहे त्यावरून तो मरेहूनही बुळ्या होता असं दिसतं. ती पुनश्च मरेपाशी येऊन राहू लागली, आजारी पडली.

लॉरेन्सांनी १९१५ च्या ऑगस्टात ग्रेटहॅममधून आपलं बस्तान हालवलं आणि ते हॅम्पस्टेडमधील व्हेल ऑफ हेल्थला राहायला आले. इथं ते जेमतेम पाच महिने राहिले. त्यांच्या शेजारी देखणी कवयित्री ॲना विकहॅम राहात असे. ॲना आणि लॉरेन्स बराच काळ हिंडण्याफिरण्यात घालवत असत. या काळात मरेनं त्याला सुचवलं. आपण काहीतरी करूया त्यांनी 'सिग्नेचर' हे नियतकालिक हे सुरू केलं. आठवड्याला एक शिलिंग या भाड्यानं रेड लायन स्क्वेअरमधील फिशर स्ट्रीटमध्ये ऑफीस थाटलं. गुरुवारी रात्री तिथं डझनभर मित्र जमत, चर्चा करत. ऑक्टोबर, नोव्हेंबरमध्ये 'सिग्नेचर'चे तीन अंक निघाले आणि ते बंद पडलं. या नियतकालिकात कॅथरीननं 'माटिल्डा बेरी' या टोपणनावानं लिखाण केलं. मरेनं 'देअर वॉज अ लिटल मॅन' हे आत्मकथनपर लेखन केलं. लॉरेन्सनं 'द क्राऊन' हा लेख लिहिला. तो तीन अंकांमधून प्रकाशित झाला.

या काळात लॉरेन्सच्या मनात जे तात्त्विक विचार घोळत होते ते त्यानं या निबंधामधून मांडले आहेत. पुढील काळात त्यानं असं म्हटलं होतं की त्याचं 'तात्त्विक' लेखन त्याच्या काल्पनिक कलाकृतीमधून साकार होतं. 'तात्त्विक' विचारांमधून साहित्यकृती निर्माण होत नाही : कादंबऱ्या आणि कविता एखाद्याच्या लेखणीमधून नकळत बाहेर पडतात. आणि नंतर स्वत:बद्दल आणि भोवतालच्या गोष्टींबद्दल समाधान लाभू शकेल अशा मानसिक वृत्तीची निकड भासू लागते. लेखक आणि व्यक्ती म्हणून जे अनुभव त्यानं घेतले त्यामधून ठाम निष्कर्ष काढण्यास ही निकड त्याला प्रवृत्त करते.

काळोखाचा प्रतीकात्मक वापर लॉरेन्सच्या लिखाणात विविधप्रकारे केलेला आढळतो. 'द क्राऊन' मध्ये काळोख हे ऐंद्रिय संवेदनांचं प्रतीक म्हणून त्यानं विचारार्थ घेतलं आहे. ऐंद्रिय संवेदना आणि मनोवृत्ती यांच्यामधील शाश्वत लढ्याच्या संदर्भात त्यानं या प्रतीकाचा परामर्श घेतला आहे. प्रकाश आणि काळोख हे अनुक्रमे सिंह आणि एकशृंग. दोघंही राजमुकुटासाठी झगडत आहेत. राजमुकुट हे परिपूर्ण, अस्सल स्व प्रतीक. या 'स्व' चं इंद्रधनुष्य हे आणखीन एक प्रतीक. इंद्रधनुष्य बनवणंही शक्य आहे, पण केव्हा, तर व्यक्तीत तिच्या स्वत:च्या प्रवृत्तींमधील झगड्याचा पुरता सोक्षमोक्ष लावल्यानंतर. या झगड्यात काळोख वरचढ ठरला तर क्लेश, भोग. उजेडाचा विजय झाल्यास आनंद, सौख्य. तत्त्वज्ञान म्हणून यात नावीन्य काही नाही. फक्त प्रतिकं वेगळी आहेत एवढंच. 'द रेनबो' ला पुरवण्यात आलेली सूचक तळटीप म्हणून केवळ या लेखाला महत्त्व.

'द रेनबो' ३० सप्टेंबरला प्रसिद्ध झाली. ही कादंबरी प्रकाशित झाल्यानंतर सोन्याचा हंडा

आपल्याला लाभणार ही आशा लॉरेन्स बाळगून होता. पण हंड्यातून दगड निघाले. ते त्याच्या दिशेनं भिरकावण्यात आले. व्हिक्टोरियन नीतिमूल्यांच्या निकषावर 'द रेनबो'ची पारख करून तिच्या लेखकावर कडाडून टीका करण्यात आली. ५ ऑक्टोबरला मेबेलचा मित्र रॉबर्ट लिंड याचं परीक्षण 'डेली न्यूज' मध्ये प्रसिद्ध झालं. 'लिंगपूजकांचं खतरनाक अरण्य' या शब्दात त्यानं या कादंबरीचं वर्णन केलं. या परीक्षणापाठोपाठ 'स्फिअर' मधून क्लेमेंट शॉर्टर आणि 'स्टार' मधून जेम्स डग्लस यांनी जोरदार हल्ले चढवले. यावर कळस म्हणजे स्कॉटलंड यार्डनं 'द रेनबो'च्या हजाराहून अधिक प्रती मुद्रकाकडून हस्तगत केल्या आणि तिच्यावर अश्लीलतेचा आरोप ठेवण्यात आला. बो स्ट्रीटवरील पोलीस कोर्टात १३ नोव्हेंबरला सुनावणी ठेवण्यात आली.

'द रेनबो' वर घालण्यात आलेल्या बंदीविरुद्ध नामवंत लेखक, पार्लमेंटमधील परिचित सदस्य आवाज उठवतील अशी आशा लॉरेन्स बाळगून होता, ती आशा फोल ठरली. 'सोसायटी ऑफ ऑथर्स' आपल्या बाजूनं लढेल या त्याच्या अपेक्षेचा भंग झाला. आश्चर्य म्हणजे कादंबरीमधील उघड्यानागड्या लैंगिकतेबद्दल इझरा पाऊंडनं खंत व्यक्त केली.

'द रेनबो' अश्लील ठरवणाऱ्या संबंधित अधिकारीवर्गाला पुढील प्रसंग आक्षेपार्ह वाटले होते.

विनिफ्रेड इन्गेर उर्सुलाला सांगते, "मी तुला उचलून पाण्यात घेऊन जाते." उर्सुलाही खुषीनं संमती देते. दोघीही नग्नावस्थेत पोहतात. नंतर काही वेळानं त्यांच्या रोमांचित, कामपीडित देहावर पाऊस बरसू लागतो. उर्सुला तिच्या स्वामिनीच्या बाहुपाशात निश्चल राहाते. उर्सुलाचे माथे विनिफ्रेडच्या वेड्यापिशा उरोजावर विसावलेले असते. सांगते, "मी तुला निवाऱ्याला घेऊन जाते." पण उर्सुला तिच्या स्वामिनीभोवती आपला देह लपेटून घेते.

दुसरा प्रसंग आहे अँन्टोन स्क्रेबेन्स्की आणि उर्सुला यांच्या समागमासंबंधीचा. ती रागानं बेभान होऊन त्याला विचारते, "पुरुष कसला तू? एका बाईचं समाधान तुला करता येत नाही, आणि घालतोस इतर बायांभोवती पिंगा." "तुझं समाधान मी करत नाही का?" या त्याच्या प्रश्नाला ती उत्तर देते," नाही, लंडनमधील पहिला आठवडा सोडता माझं तू कधीच समाधान केलेलं नाहीस. आताही माझं समाधान करू शकत नाहीस."

ॲना आणि विल यांच्या प्रणयक्रीडांमधील विकृती, काही ठिकाणी सूचित होणारं गुदमैथुन इथं अश्लीलता धुंडाळणाऱ्याचं लक्ष कसं गेलं नव्हतं कोण जाणे!

कोर्टानं १८५७ चा 'ऑब्सिन पब्लिकेशन्स ॲक्ट' च्या आधारे खटला भरला तेव्हा पुस्तकाचा प्रकाशक मेथ्यूएननं आपणहून साऱ्या शिल्लक प्रती देऊन टाकल्या आणि लॉरेन्सची वा आपली बाजू मांडण्याच्या दृष्टीनं काहीही हालचाल केली नाही. थोडाफार दंड भरून या प्रकरणातून सुटका करून घेण्यात त्याचं लक्ष्य मुख्यत्वे गुंतलं होतं. त्याच्यावतीनं कोर्टाला सांगण्यात आलं की त्यानं दोनदा लॉरेन्सला आक्षेपार्ह मजकूर वगळण्यास सांगितलं होतं. त्याच्या



अनुक्रमणिका

## अकरा

१९१५ च्या ३० डिसेंबरला लॉरेन्स फ्रीडासहवर्तमान कॉर्नवॉलच्या उत्तर किनाऱ्यावरील पॅडस्टोवनजिक राहायला गेले. इथली कॉटेज त्यांना जे. डी. बेरेस्फोर्ड या कादंबरीकारानं जानेवारी फेब्रुवारी या दोन महिन्यांसाठीच दिलेली होती. तिथं गेल्यावर स्वस्त भाड्याची जागा पाहता येईल असा विचार करून लॉरेन्स तिथं स्थायिक झाले होते. लॉरेन्स आजारी होता, पराभूत होता, कफल्लक होता. आधीच त्याची आर्थिक परिस्थिती ओढगस्तीची होती तशात घटस्फोटाच्या खटल्याचा खर्च त्यानं द्यावा असा तगादा त्याच्यामागं लावण्यात येत होता. 'द रेनबो'वरील बंदीमुळं त्याला कपर्दिकही मिळणार नव्हती. त्या कादंबरीलेखनासाठी घालवलेली दोन वर्षं वाया गेली होती. त्याहूनही वाईट म्हणजे, रिचार्ड ॲल्डिंग्टन सांगतो तसं त्याच्यावर उघडउघड अश्लीलतेचा कलंक फासण्यात आला होता. त्याच्या नावाला कुप्रसिद्धी देऊन ते एवढं बदनाम करण्यात आलं होतं की बराच काळ त्याचं लिखाण छापण्यास नियतकालिकं, प्रकाशक धजावत नव्हते. आपल्याला क्षय आहे हे त्यानं आजवर स्वत:पाशीही अमान्य केलेलं होतं पण आता त्या व्याधीची लक्षणं स्पष्ट दिसू लागली होती. फ्लोरिडाला जाणं बारगळलं होतं. युद्ध संपुष्टात येण्याची चिन्हं दृष्टिपथात नव्हती.

'आपलं हे जग आता कोलमडून पडणार, नामशेष होणार, हा विनाश अटळ आहे, ता कोणी थोपवू शकणार नाही' या निष्कर्षाप्रत लॉरेन्स पोचला होता. 'आता एवढंच करता येण्याजोगं आहे जहाजाबरोबर जलसमाधी घेणं वा वाटल्यास जहाज सोडून जाणं आणि एखाद्या बहिष्कृतागत इतरेजनांपासून अलग राहून आयुष्य कंठणं. माझ्या बाबतीत, मी जहाजाच्या उतारूंपैकी नाही, पण असलोच तर, जहाजाबरोबर मी बुडून जाईन. सांप्रतच्या काळात एक पळभरही जिवंत राहाण्याची माझी इच्छा नाही. हे जीवन काय लायकीचं आहे याची पूर्ण कल्पना मला आहे. मी ते अव्हेरतो. शक्य होईस्तोवर, या काळाच्या बाहेर मी उभा राहीन, माझं आयुष्य मी जगेन, आणि शक्य झाल्यास, सुखात राहीन, जरी अवघं विश्व आक्रोशत तळहीन खड्ड्यात कोसळलं तरी. सांप्रतच्या सत्याहून एक महान सत्य आहे, आजकालच्या परमेश्वरापल्याड एक परमेश्वर आहे. झगडू दे माझ्या देशबांधवांना आणि पडू दे त्यांच्या देवदेवतांच्या अवतीभवती: तो त्यांचा प्रश्न आहे. माझ्या बाबतीत, मला शक्य होईल तोवर, मी स्वत:ला वाचवीन, कारण माझी धारणा आहे की या काळाच्या खोटेपणाला शरण जाण्याऐवजी सुखी राहाणं, परम सत्याच्या आश्रयानं आयुष्य जगणं हे महान धर्माचरण आहे.'

हा परिच्छेद लॉरेन्सनं ओट्टोलिन मोरेलला ७ फेब्रुवारी रोजी पाठवलेल्या पत्रातील. त्यानंतर तीन दिवसांनी त्यानं मार्क गेर्टलेरला लिहिलं : 'युद्ध समाप्त होण्याची लक्षणं मला दिसत नाहीत, आणि एखाद्या कलावंताच्या प्रामाणिक कामाची बूज लोक कधी काळी राखतील अशी सुतराम शक्यता नाही. हे नतद्रष्ट जीवन आहे. माझ्या युगाचा आणि त्यातील समस्त माणसांचा

मी धि:कार करतो. माझ्या बांधवांचा मी आत्यंतिक तिटकारा करतो. माझी इच्छा आहे, धरणीकंप व्हावा आणि दोनेक डझन माणसं वगळता सर्वजण त्यात गडप व्हावेत. दरम्यान, आपण गिळंकृत केलं जाणार नाही याची दक्षता आपण घेतली पाहिजे.' कारण वाचलेल्या वीसेक माणसांच्या साथीनं त्याला 'नवा समाज' निर्माण करायचा होता, त्यासाठी फ्लोरिडाला जायचं होतं.

पण फ्लोरिडाला जाणं एव्हाना बारगळलं होतं. त्याच्या कनिष्ठ मित्रांशी त्याच्या भेटी होत होत्या त्या केवळ पत्रांमधून. फ्रीडाच्या भावनिक पाठबळाची त्याला आत्यंतिक गरज होती. जग आपली अवहेलना करत आहे, तिनं तरी आपला मान राखावा एवढीच त्याची किमान तिच्याकडून अपेक्षा होती. लाजिरवाण्या दारिद्र्यात त्याच्याशी तिनं इमान राखलं होतं, तक्रारीचा सूर न काढता. त्याच्या क्रोधालाही तिनं तोंड दिलं होतं पण आता तसं वागणं तिला जमेनासं झालं होतं. त्याच्या साभार परत आलेल्या हस्तलिखितावरून ती त्याची खिल्ली उडवत होती.

कॉर्नवॉलला येण्यापूर्वी फ्रीडा आपल्या मुलांना बऱ्याचदा भेटली होती. एकदा वकिलाच्या ऑफिसात अर्ध्या तासाची भेट ठरवण्यात आली होती. मुलं फार नर्व्हस होती. फ्रीडा खुषीत होती, रडत होती. तिची धाकटी मुलगी बार्बरा सांगते की वकिलाच्या कारकुनानं भेटीचा समय संपला असल्याचं सांगताच प्रत्येक मुलानं सुटकेचा श्वास टाकला होता. दुसऱ्या एका प्रसंगी, फ्रीडानं त्यांना 'द मॅरेज ऑफ फिगारो' या ऑपेराला नेलं होतं आणि नंतर प्रत्येकाला दहा शिलींग दिले होते. हे पैसे नंतर वीकलींनी परत पाठवून दिले ही गोष्ट अलहिदा. लॉरेन्सनं नमूद केलं आहे, काहीशी आशा धुगधुगत असल्यामुळं असेल कदाचित् की मुलांवरून चिडचिडं बनणं फ्रीडानं आता जवळजवळ थांबवलेलं आहे. आणि ती निश्चितच आता त्यांच्या भांडणांना कारणीभूत ठरत नव्हती. आपण अतिशय महत्त्वाची व्यक्ती आहोत म्हणून तिच्याकडून आपल्याला मान्यता मिळावी. या लॉरेन्सच्या आग्रहांमध्ये ही भांडणं आता केंद्रीभूत झाली होती.

पुरुष आणि स्त्री यांच्यामध्ये भेदाभेद करण्यात येऊ नये असं आपलं स्पष्ट मत असल्याचं लॉरेन्स नेहमीच सांगत असे, परंतु आपली इच्छा सर्वंकष आहे, निरंकुश आहे याची जाणीव ठेवणाऱ्या स्त्रीची गरज आपल्याला आहे असं जोरदार प्रतिपादन करायला त्यानं सुरुवात केली. या आधी आपण प्रतिभावंत आहोत म्हणून आपल्याला अग्रक्रम देण्यात यावा असा त्याचा आग्रह असे. परंतु आपल्या साहित्यकृतींमध्ये कोणी रस घेत नसल्याचं आढळून आल्यानंतर तसा आग्रह धरणं तेवढं सोपं राहिलेलं नव्हतं. म्हणून एक माणूस म्हणून आपल्याला मानाचं पहिलं पान देण्यात यावं असा दावा करायला त्यानं प्रारंभ केला. त्याचं वैवाहिक जीवन या कामी कुचकामी ठरत होतं. मुलं होण्याची शक्यता नव्हती. कुटुंबीयांची उणीव, समविचारी माणसांच्या एका आदर्श समाजाची उभारणी करून भरून काढण्यास तो उत्सुक होता. या नव्या समाजाविषयीचे विचार तो आपल्या स्नेह्यांना वेळोवेळी कळवत होताच, या कार्यात त्यांनी सहभागी व्हावं यासाठी प्रयत्नशील होता. दिवसेंदिवस वैरभावनांना खतपाणी घालणाऱ्या या

जगाबरोबरचे संबंध तोडून या नव्या समाजात आश्रय घेणं त्याला शक्य होतं. या समाज-व्यवस्थेला त्यांन नाव दिलं 'रानानिम.' हा शब्द त्याला कोटेलिआन्स्की एक गाणं गुणगुणायचा त्या हिब्रू गाण्यात सापडला होता. 'रेनेनू, रानानिम', 'Rejoice in the Lord, O ye Righteous.'

काही वेळेला लॉरेन्सकडे काही पाहुणे त्यांच्या खाजगी जीवनात ताणतणावाचे भोवरे निर्माण करत. अशापैकी फिलीप हॅसेल्टिन हा एक. एक दिवस ओट्टोलिन त्याच्यापाशी अनवधानानं बोलून गेली, फ्रीडाबद्दल तिला किती तिरस्कार वाटतो आणि काहीबाही. ही खाजगी बातमी षटकर्णी झाली. आधीच फ्रीडा व ओट्टोलिन यामधून विस्तव जात नसे. त्या आगीत हे तेल. 'माझ्याबद्दल असलं काही तरी घाणेरडं ती बोलणारच– मला हा क्षुद्रपणा वाटतो. ती श्रीमंत आहे आणि आम्ही दरिद्री आणि एखाद्याच्या दारिद्र्याचा असा गैरफायदा घेणारी माणसं असतातच.' तिनं ओट्टोलिनला खरमरीत पत्र लिहिलं. ओट्टोलिननं उलट टपाली तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. या प्रकारणी लॉरेन्सनंही सारवासारव केली. त्यानं ओट्टोलिनला लिहिलं की तो आणि फ्रीडा खरोखरीच एकजीव झाले आहेत. यासाठी तो परमेश्वराचे आभार मानतो. हमरीतुमरीवर गेलं होतं. पण आता सुरळीत आहे. 'आपण तिघंही जिवलग स्नेही बनू. नंतर या ऋणानुबंधनात आपण खरोखरीच सुखी होऊ, आपण तिघंही.' पण ओट्टोलिन कॉर्नवॉलच्या दिशेला फिरकली नाही. ज्यांच्या सहयोगावर 'रानानिम' उभारण्याची उमेद तो बाळगून होता त्यापैकी एक ओट्टोलिन होती. आणि ती दुखावली गेली होती.

१९१६ च्या फेब्रुवारीमध्ये लॉरेन्सांनी हायर ट्रेगेरथेन येथे स्थलांतर केलं. हे गाव सेंट इव्हजच्या उत्तरेस पाचेक मैलावर होतं. समुद्रकिनाऱ्यावर तिथं एक मजली इमारत त्यांनी भाड्यानं घेतली. भाडं वर्षाला ५ पौंड. त्यांच्या या इमारतीला लागूनच एक मोठं घर होतं. तळमजल्यावर एक भोजनगृह, एक मोठी अभ्यासिका. शिवाय या घरात तीन बेडरूम्स होत्या. वर्षाला भाडं १६ पौंड. लॉरेन्सला वाटलं हे घर मरेजसाठी आदर्श आहे. मरेजचं वास्तव्य तेव्हा दक्षिण फ्रांसमधील बान्दोल येथे होतं. १९१५ च्या नोव्हेंबरमध्ये ते तिथं गेले होते. कॅथरीनचा लाडका भाऊ लेस्ली याचा खून करण्यात आला होता. या आघातामधून तिला सावरावं या उद्देशानं मरे तिच्याबरोबर बान्दोल येथे राहात होता. तिथं लॉरेन्सचं पाच मार्चचं पत्र त्यांच्या हाती पडलं. त्या पत्रात आपल्या शेजारी येऊन राहाण्याचा आग्रह लॉरेन्सनं केला होता. पत्रात तो मरेजसाठी सुचवत असलेल्या घराचं तपशीलवार वर्णन अगदी आकृत्या काढून त्यानं केलं हातं. 'तुम्ही आलात तर आम्हाला आनंद होईल. एवढी सुंदर जागा : आपलं रानानिम.' तीन दिवसांनी लॉरेन्सनं मरेजना पुन्हा लिहिलं. 'खरंच तुम्ही ही दुसरी जागा घेतलीच पाहिजे. मी बघत राहातो तिच्याकडे. मी एव्हापासूनच म्हणू लागलो आहे : कॅथरीनचं घर, कॅथरीनचा टॉवर. त्या जागेत काहीतरी लक्ष वेधून घेण्याजोगं आहे..... आमच्या घरापासून केवळ बारा पावलांच्या अंतरावर आहे : आपण खिडक्यांमधून संभाषण करू शकू : आणि आमच्या व्यतिरिक्त, पिवळ्या फुलांची काटेरी झुडपं, आणि शेतमळे, स्वैर बागडणारी कोकरं, आणि घुबडांशी मारामारी

करणारे सीगल्स, क्वचित प्रसंगी एखादा कोल्हा आणि समुद्रावर एखादं जहाज.

'तुम्ही यायलाच हवं, आणि आपण इथं खूप, खूप काळ राहू, अतिशय स्वस्तात. हे बघा, आपण कुठंतरी स्थायिक व्हायला हवं, आणि इथं एवढं मोकळं आणि रम्य आहे, आणि आपल्याला खर्चही फारसा करावा लागणार नाही.

'आणि इत:पर गद्दारीवगैरेचा विषय नको. यापुढं आपण एकमेकांवर विश्वास ठेवू या– मला खात्री आहे आपल्याला ते शक्य आहे. आपण मोजकेच आहोत, आणि आपण विखुरलेले आहोत हे विचित्र नव्हे का?' एकत्र राहून आपण खरोखरीच सुखी आणि उद्यमशील होऊ या.

फ्रीडानंही कॅथरीनला लिहिलं : 'मी आता अतिशय जीवनोत्सुक आहे, आत्मिक कटकटीचा जाच नाही, आम्ही "दोस्त" आहोत आणि गहन गोष्टींविषयी आम्ही यत्किंचितही फिकीर करत नाही, ठीक आहेत त्या, आपण फक्त शेतावरल्या लिलीप्रमाणं जगायचं.'

प्रेमाचा आणि मैत्रीचा हात लॉरेन्सनं पुढं केलेला पाहून मरे आणि कॅथरीन भारावून गेले. त्या दोघांच्याही मनात लॉरेन्सविषयी काही ग्रह होते, ते त्यांनी बाजूला सारले आणि आपली सारी चीजवस्तू गाडीवर टाकून ते कॉर्नवॉलला हजर झाले. आपली वास्तू राहाण्यालायक करण्याआधी एका छोट्या हॉटेलात त्यांनी मुक्काम केला. ही नवीन जागा आपल्याला कधीच पसंत पडणार नाही ही धास्ती कॅथरीननं मरेपाशी व्यक्त केली, तरी एप्रिल अखेर मरेज आपल्या घरी राहायला गेले. त्यानंतर तीनेक आठवड्यानं कॅथरीननं कॉटला लिहिलं : पुढील महिन्यापर्यंत सारं काही सुरळीत होईल, निदान व्हायला हवं आणि सूचित केलं की मरे आणि लॉरेन्स पतिपत्नी यांच्याशी तिचं जमणं अशक्य झालं आहे. ती सतत कामात व्यग्र असे. घरातील सारं कामधाम तीच करत असे. मरेलाही त्यात काही गैर वाटत नसे. या काळात त्याचं निस्सीम प्रेम लॉरेन्सच्या वाट्याला येत होतं. तशात तिचं आयुष्य दु:स्वप्नागत केलं ते लॉरेन्स आणि फ्रीडा यांच्यामधील बिघडलेला संबंधांनी.

लॉरेन्स आणि फ्रीडा यांच्यामधील वादावादी नित्याचीच. हाणामारी अधूनमधूनची. कॅथरीन सांगते की भांडी एकमेकांच्या दिशेनं फेकली जात. एक दिवस फ्रीडानं शेलेविषयी एक विधान बिनधास्तपणे ठोकून दिलं, त्यावर लॉरेन्स म्हणाला की ती अक्कल पाजळते आहे. झालं, फ्रीडाच्या रागाचा पारा चढला. कॅथरीनचं म्हणणं, या प्रसंगी रागानं प्रथम तोल गेला तो फ्रीडाचा. आपल्याला निव्वळ डिवचण्यासाठीच फ्रीडा नेहमीच आपल्याविरोधी पवित्रा घेते या लॉरेन्सच्या समजुतीमध्ये तथ्य असल्याचं मरेला जाणवलं. लॉरेन्स फ्रीडावर गरजला, "वाटलं काय तुला? शेलेबद्दल एखादा शब्दही उच्चारायलाही तू धजावलीस तर मी.....' त्यानंतर काही तासांनी त्या दोघांची पुन्हा बाचाबाची झाली. फ्रीडावर राग काढण्यासाठी लॉरेन्स तिच्यामागून धावला. जेवणाच्या टेबलाभोवती दोघांची पळापळ सुरू. फ्रीडा पुढं, लॉरेन्स मागं. फ्रीडा तावडीत सापडताच त्यानं तिच्यावर गुद्दे लगावले, तिचे केस उपटले, म्हणाला, "कुत्तरडे, तुझं नरडं चिरून टाकीन."



अनुक्रमणिका

त्यानंतरचा दिवस उजाडला. नित्याप्रमाणं आधल्या रात्रीच्या भांडणाचा मागमूसही नव्हता. सकाळी फ्रीडाला अंथरुणात ब्रेकफास्ट देण्याची लॉरेन्सची धावपळ सुरू झाली. त्याची तब्येत बरी नसतानाही. आपल्या बायकोवरील त्याचं हे मानहानीकारक परावलंबित्व पाहून कॅथरीन चकित झाली.

फ्रीडा लॉरेन्सहून कितीतरी वरचढ ठरत होती. ही परिस्थिती पालटून टाकण्यास तो असमर्थ ठरत होता. आणि ही असमर्थतेची भावना त्याच्या संतापाला कारणीभूत ठरत होती. त्यानं कॅथरीनला एकदा लिहिलं होतं : 'स्त्रीनं पुरुषाला अग्रक्रमाचा मान द्यायला हवा, आणि त्यानं हा मान स्वीकारायला हवा अशी माझी धारणा आहे. मला असं वाटतं, पुरुषांनी बिनदिक्कतपणे त्यांच्या स्त्रियांपुढं जायला हवं, त्यांची अनुमती वा मान्यता विचारण्यासाठी मागं वळूनही न पाहाता.' साहित्यिक म्हणून पदरी अपयश पडल्यानं फ्रीडाकडून आपली कदर व्हावी ही लॉरेन्सची अपेक्षा होती, आणि ती देण्यास फ्रीडानं नकार दर्शविला होता. आपल्या जीवनात सुसंवाद निर्माण होण्यासाठी तिच्यावर दबाव आणण्याच्या त्याच्या प्रयत्नात अपयश येत राहिल्यानं तो पिसाळत होता. कॅथरीन सांगते : तो आरडाओरड करतो, थयथयाट करतो, टेबलावर मुठी आदळतो, सर्वांचा उद्धार करतो आणि त्यानंतर तो आजारी होतो, पांढराफटक पडतो आणि हवालदिल बनतो.

जे काही घडत होतं त्यासाठी कॅथरीननं फ्रीडाला दोषी धरलं आहे. अर्थातच याच्या मुळाशी फ्रीडाच आहे..... तो जेव्हा इतरांच्या संगतीत असतो, ज्यांचा त्याच्यावर लोभ आहे, त्यावेळी त्याला प्रकर्षानं जाणवत असावं की फ्रीडाची त्यानं केलेली निवड किती जीवघेणी आहे. फ्रीडाशी कॅथरीनचं एके काळी बरंच सख्य होतं. पण आता तिच्याबद्दल कॅथरीनला फारशी आपुलकी वाटत नव्हती. लॉरेन्सबद्दल तिला आस्था होती. तिचा तो मित्र होता. पण त्याच्याबद्दल तिच्या दुसऱ्या तक्रारी होत्या. तो आणि मरे प्रवासबॅगा पाठीवर मारून भटकायला बाहेर पडत असत. घरी तिला एकटीला राहावं लागत असे. लैंगिक प्रतीकांचं त्याचं 'ऑब्सेशन' पाहून तिच्या कपाळाला आठ्या पडत असत. त्याच्या घराला त्यानं 'द फॅलस' म्हणून संबोधावं असं सुचवून तिनं त्याला चिमटा घेतला होता.

'वूमेन इन लव्ह' मधील जेराल्ड क्रीच आणि गुड्रन ब्रँगवेन या व्यक्तिरेखा मरे आणि कॅथरीन यांच्यावर लॉरेन्सनं बेतलेल्या आहेत, (अर्थात, गुड्रन आणि जेराल्ड यांच्यामधला वर्चस्वावरून होणारा संघर्ष आणि लॉरेन्स आणि फ्रीडा यांच्या वैवाहिक जीवनातील पराकोटीचा झगडा यात विलक्षण साम्य आहे) असं फ्रीडानं मरेला सांगितलं तेव्हा त्याला आश्चर्य वाटलं होतं. तसं मरे सांगतही असे. तरीही, कादंबरी वाचताना, जेराल्डबरोबर रक्ताचा बंधुभाव ( blood brotherhood) जोडण्याची रूपर्ट बिरकीनची इच्छा आणि लॉरेन्सशी असलेलं आपलं नातं यात विलक्षण साम्य असल्याचं मरेच्या ध्यानी आलं होतं. कॉर्नवॉल येथे लॉरेन्सनं त्याला आपल्या आवडीचा जो सिद्धांत सांगितला होता त्याचं विस्मरण त्याला झालं नव्हतं. या काळात

लॉरेन्स 'वूमेन इन लव्ह' वर काम करत होता. पण मरेला जवळचा मित्र मानत असूनही कार्टवरी विषयी तो चकार शब्द त्याच्यापाशी बोलला नव्हता.

लॉरेन्सला आपल्याविषयी वाटणाऱ्या प्रेमात समलिंगसंभोगाच्या आकर्षणाचा अंश आहे आणि आपले ते इप्सित साध्य करण्यासाठी तो प्रेमाचा दिखावा करत आहे या विचाराला मरेनं आपल्या डोक्यात थारा दिला नव्हता. मरेचा चरित्रकार फ्रँक ली सांगतो की मरे शाळेत असताना त्याच्याशी गुदमैथून करण्याच्या इच्छेनं झोंबाझोंबी झाली होती. तेव्हापासून त्याला समलिंगसंभोगाचा मनस्वी तिटकारा होता. तसा तिटकारा लॉरेन्सलाही होता. बर्ट्रांड रसेलच्या समलिंगसंभोगी मित्रांचा उल्लेख त्यानं 'इव्हिल' या शब्दात केला होता. मरेविषयी त्याच्या जे मनात होतं ते शारीरिक नव्हतं, आत्मिक होतं. या बंधुभावाच्या नात्यात त्याला कॅथरीनलाही, त्याबाबत तिच्या मनात चलबिचल असली तरीही, अंतर्भूत करून घेण्याचा त्याचा विचार होता. फ्रीडाबरोबरच्या झंझावती संबंधाचा तोल ढळू न देण्यासाठी तेवढ्याच तोलामोलाचं मैत्रीचं वजन मरेकडून लाभू शकेल यासाठी त्याची धडपड चालू होती. पण त्याची ही अपेक्षा फोल ठरली होती. या प्रकरणात कॅथरीनला आपण गमावून बसू ही धास्ती मरेला होती. आणि कॅथरीन तिच्या खोलीत बसून सिगारेटी ओढत कुढत होती.

फ्रीडाबरोबरच्या संबंधात काही तरी न्यून आहे या भावनेपोटी पुरुषाबरोबरच्या गाढ मैत्रीचा, नात्याचा लॉरेन्स आग्रह धरत होता ही गोष्ट मरेनं अचूक हेरली होती. आपलं साहित्य नाकारलं जात असल्यामुळं लॉरेन्स स्वत:वर खूष नव्हता आणि वैवाहिक शय्येवर जे काही घडत होतं ते त्याला पसंत नव्हतं. तरीही फ्रीडा आणि तो यांच्यामधले संबंध अजूनही चोख आहेत, जीवनदायी आहेत हे स्वत:ला पटवून देण्याची, त्यावर विश्वास ठेवण्याची गरज त्याला भासत होती. हे स्पष्ट करण्यासाठीच तो- फ्रीडा आणि मरे-कॅथरीन या दोन जोडप्यांच्या नात्यामधील वैधर्म्यावर त्यानं नेमकं बोट ठेवलं होतं. आणि त्याचा आग्रह होता की तिरस्कार आणि प्रेम यामधील त्याचे प्रक्षोभक हेलकावे हे भक्कम वास्तव होतं, ज्यावर आयुष्याची उभारणी करायला हवी. असं म्हणूनच मरे-दापंत्यामधील प्रेमाला खोटं म्हणून हिणवतो आणि फ्रीडाबरोबरचे आपले संबंध तो अस्सल समजतो.

कॉर्नवॉल येथील 'कॉम्यूनल' जीवनाचा प्रयोग सपशेल फसला यात आश्चर्य वाटायला नको. त्या चौघांनाही एकमेकांविषयी जिव्हाळा होता, पण त्यांच्यामधले ताणतणाव प्रचंड होते. लॉरेन्सच्या म्हणण्यानुसार, त्यांना थोडेफार बहाणे करावे लागत आणि आम्हाला पुढं ते जमेनासं झालं! दोन महिन्यानंतर मरे आणि कॅथरीन यांनी निर्णय घेतला की कॉर्नवॉलच्या दक्षिण दिशेला मायलोर या गावी स्थायिक व्हायचं. त्यांनी तसं लॉरेन्सला सांगितलं. लॉरेन्स खिन्न झाला.

कॅथरीनच्या एव्हाना लक्षात आलं होतं की मरेपासून तद्वतच लॉरेन्सपासून आपण दूर व्हायला हवं. ओट्टोलिन मोरेलबरोबरची मैत्री अधिक दृढ करण्यासाठी, आणि मरेच्या साहित्यिक वर्तुळामधून बाहेर पडल्यानंतर तिचा आश्रय लाभावा हा हेतू मनी बाळगून कॅथरीन तिला पत्रं

लिहीत होती. लॉरेन्सचा शेजार सोडल्यानंतरही केवळ स्वत:साठीचं ओट्टोलिननं आमंत्रण पाठवावं अशी पत्रामधून ती याचना करत होती.

१९१६ च्या जूनमध्ये कॅथरीन लंडनला निघून गेली. तिथून ती मायरोलला जाणार होती. मरेनं सामानसुमानाची बांधाबांध केली. या कामी लॉरेन्सनं नेहमीच्याच आपुलकीनं त्याला मदत केली. त्याचं सामानसुमान गाडीवर चढवलं. लॉरेन्सचा आपण अखेरचा निरोप घेत आहोत या भावनेनं मरेनं त्याला 'गुड-बाय' केलं. त्या चौघांचे संबंध पुढील काळात पूर्ववत झाले नसले तरी मैत्रीचे धागे अद्याप तुटलेले नव्हते. तुटायला अद्याप अवकाश होता. मरे आणि कॅथरीन यांच्यामधले संबंध संपुष्टात आले असल्याचं लॉरेन्सच्या चाणाक्ष नजरेनं अचूक हेरलं होतं. तसं त्यानं कॉटला कळवलंही होतं.

मरेपासून विभक्त होण्याचा विचार कॅथरीनच्या मनात घोळत होता तसाच विचार मरेच्याही मनात मूळ धरू लागला होता. लेखक म्हणून त्याला मान्यता मिळू लागली होती. या वर्षभरात त्याची दोन पुस्तकं प्रकाशित झाली होती. त्यातील 'स्टिल लाईफ' ही कादंबरी सामान्य होती. तरी डोस्टोएवस्कीवरचं त्याचं लिखाण नावाजलं जात होतं. लंडनला परतल्यानंतर वॉर ऑफिसमध्ये त्याला कारकुनाची जागा मिळाली होती. त्यामुळं लष्करी सेवेमधून त्याची सुटका झाली होती. शिवाय त्याला पगार त्याच्या गरजा भागवण्यापुरता मिळत होता. त्या ग्रीष्मात त्यानं गार्सिंग्टनला बऱ्याच भेटी दिल्या होत्या. या काळात ओट्टोलिनच्या विचारांनीच त्याचं मन बहुतांशी व्यापलेलं होतं. ३१ ऑगस्टला त्यानं तिला लिहिलं होतं : 'मी तुझ्या प्रेमात पडलो असावा अशी मला विचित्र शंका येते.' मरे आणि कॅथरीन यांच्यात पुन्हा दिलजमाई झाल्यानंतरही तो ओट्टोलिनला पत्रं लिहीत होता, तिच्यासंगे चंद्रप्रकाशात फेरफटका मारत होता. काही काळ त्याला वाटत होतं की तिचंही त्याच्यावर प्रेम जडलेलं आहे. परंतु तिच्या या काळातील नोंदींमध्ये असं काही असल्याचं आढळून येत नाही. मरेच्या देखण्या रूपाची भुरळ तिला पडली असेलही, पण भावनिकदृष्ट्या ती त्याच्यामध्ये गुंतलेली होती असं दिसत नाही.

मरे मायरोलला निघून गेल्यानंतर लॉरेन्स आणि फ्रीडा उदास झाले. लॉरेन्सची प्रकृती खालावली होती. पैशाच्या विवंचना होत्याच. लॉरेन्सनं आपला एजंट पिंकर यास लिहिलं की त्याच्या खिशात फक्त ६ पौंड शिल्लक राहिलेत. ॲमी लॉवेल आणि ओट्टोलिन मोरेल यांच्याकडून आर्थिक मदत मिळाली नसती तर लॉरेन्सच्या हालाखीला पारावार राहिला नसता.

१९१६ च्या 'मिलीटरी सर्व्हिस ॲक्ट' लागू होईपर्यंत ब्रिटिश सैन्यात बहुतांशी व्हॉलेंटियरांचा भरणा केला जात असे. आता युद्धात मृत्युमुखी पडलेल्यांची संख्या वाढल्यानं या कायद्याची कडक अंमलबजावणी करण्याचं धोरण सरकारनं स्वीकारलं. त्यानुसार लष्करी अधिकाऱ्यांसमोर हजर राहण्याचं लॉरेन्सकडे फर्मान गेलं. २८ जूनला लॉरेन्स पेन्झासला गेला, तिथून बोडमिनला. ६० मैलांचा हा प्रवास. वैद्यकीय तपासणीसाठी दोन दिवस आणि एक रात्र त्याला वस्ती करावी लागली. इतरांच्या बरोबर तुरुंगवजा बराकीत. रात्रीसाठी त्यानं कपडे नेले

नव्हते. सर्वांच्या देखत व बरोबरीनं जस्ताच्या हौदात स्नान उरकावं लागलं. त्याचा जळफळाट झाला. १ सप्टेंबरला त्यानं सिंथिया ॲस्क्विथला लिहिलं की ही आठवण झाली तरी त्याच्या अंगाचा रागानं तिळपापड होतो.'मी इंग्रज राहिलेला नाही.मानवतेचा मी शत्रू आहे.हा दु:स्वप्नगत अनुभव 'कांगारू' मधील 'द नाईट मेअर' या प्रकरणातही चित्रित झाला आहे. वैद्यकीय तपासणीची सोमर्सची पाळी येते. तो कपडे उतरतो. फक्त शर्टात व्हराड्यांत गारठून बसतो. त्याच्या हाडकुळ्या पायांकडे बोट करून एक गलेलठ्ठ इसम फिदीफिदी हसतो.

या तपासणीत लॉरेन्सला क्षय असल्याचं निदान झालं. ही गोष्ट आजवर तो अमान्य करत होता. स्वत:च्या मनाशीही. आताही तो विचार निपटून काढण्याचा प्रयत्न त्यानं केला : 'मी सक्षम नाही म्हणून त्यांनी भले माझ्यावर लेबल लावू दे. मला ठाऊक आहे माझी देहयष्टी नाजूक आहे तरी ती चांगली दणकट आहे, आणि माझा वैशिष्ट्यपूर्ण 'स्व' हीच देहयष्टी फक्त वाहू शकते.

१९१६ च्या ख्रिसमसमध्ये कॅथरीन कार्सवेल लॉरेन्सांकडे राहायला गेली. ते भटकत, डोस्टोएवस्की आणि मरेचं त्याच्यावरील पुस्तक यांच्याबद्दल चर्चा करत, दोघंही मिळून थाळ्या घासत, विसळत; घराची साफसफाई करत. एक दिवस लॉरेन्स आणि फ्रीडा यांचं खडाजंगी भांडण झालं. त्यानंतर थोडा अवधी लोटला. लॉरेन्स स्वत:शी गुणगुणत थाळ्या घासत होता. त्याला कमी ऐकू येत असल्यामुळं फ्रीडा मागं येऊन कधी उभी राहिली त्याला कळलंच नाही. तिनं जेवायला घेतली जाणारी दगडी प्लेट त्याच्या डोक्यावर आदळली.कार्सवेल सांगते :त्याला फार लागलं, गंभीर दुखापतही झाली असती, पण फ्रीडा तशी का वागली, तिच्या रागाचं कारण काय हे मात्र कार्सवेल स्पष्ट करत नाही. लॉरेन्स या आकस्मिक मारानं एवढा चक्रावून गेला होता की, तिच्या माराची परतफेड करण्याचंही भान त्याला राहिलं नव्हतं. लॉरेन्ससारखा माणूस झगडा करायला मिळाला म्हणून फ्रीडाला किती धन्यता वाटत असेल असं कार्सवेल नमूद करते पण फ्रीडाचा हल्ला निष्कारण होता, ती चिडीला यावं असं काही घडलेलं नव्हतं हे ती विचारात घेताना दिसत नाही, पण लॉरेन्सविषयी थोडीशी सहानुभूती वाटत असल्यामुळं एवढ्यावरच त्याला सोडून देत आहे. हे फ्रीडाचे उद्‌गार मात्र ती नोंदते.

'द सॅव्हेज पिलग्रिमेज' या आपल्या लॉरेन्सच्या चरित्रात फ्रीडाच्या वैशिष्ट्यपूर्ण गुणाचं यथायोग्य मूल्यमापन केल्यानंतर कार्सवेल सांगते : 'काही वेळेला आम्हाला असं वाटायचं त्यानं निवड केली होती. निसर्गाच्या आवेगाची, स्त्रीत्वाच्या जोषाची– केवळ एक स्त्री म्हणून नव्हे. लॉरेन्सच्या लेखी फ्रीडा म्हणजे तडाखा देणारा आणि खुदूखुदू हसणारा वारा,शांतचित्त करणाऱ्या पर्जन्यधारा वा बिनडोक पागल वादळ, प्रसन्न करणारा सूर्य वा विधिनिषेध नसलेला तडिताघात......काही वेळेला ती त्याचा तिरस्कार करायची आणि तो तिचा. त्याच्यामधल्या काही गोष्टींची ती टेर उडवायची आणि तिच्यामधल्या काही गोष्टी त्याचं माथं फिरवायच्या– अशा गोष्टी, ज्यांची तीव्रता कमी करण्यास त्या दोघांचीही अनुमती लाभणं अशक्य. त्याला

तिचं कौतुक होतं, ते थोड्याफार प्रमाणात याच कारणासाठी लॉरेन्स आणि फ्रीडा यांच्या भांडणाचं मूळ लैंगिकतेशी संबंधित आहे असं समजणाऱ्या त्यांच्या मित्रांमधला कॉर्सवेलचा हा आवाज वेगळा आहे. तिचा विश्वास होता की 'लॉरेन्स जर का देहानं थंड आणि मनानं दुबळा असता तर पत्नी म्हणून त्यानं फ्रीडाचा स्वीकार केला नसता, वा ती लाभल्यानंतर, तिला तो राखू शकला नसता.'

लॉरेन्सांच्या भांडणांना विराम ठाऊक नव्हता. त्यांच्यामध्ये तणावही निर्माण झाले होते. अन्यत्र भावनिक संबंध नव्यानं जोडण्याची निकड लॉरेन्सला भासत होती. तसे त्याचे प्रयत्न चालू होते.

१९१६ च्या अखेरीस अमेरिकन पत्रकार ईस्थर ॲन्ड्रूज लॉरेन्सच्या जीवनात आली. रॉबर्ट माउंटसिएरशी तिचे सलगीचे संबंध होते. माउंटसिएर पुढं १९२० मध्ये लॉरेन्सचा अमेरिकेतील एजंट बनला. अमेरिकेत वाचकवर्ग मिळवण्यास लॉरेन्स उत्सुक होता. त्याला आशा होती, अमेरिकेतील वाचकवर्ग इंग्लंडमधल्या वाचकवर्गासारखा नसती कुस्पटं काढणारा नसावा. ईस्थर आणि माउंटसिएर यांची सौजन्यशील वागणूक लॉरेन्सला भावली. ही दोघं लॉरेन्सला भेटली तेव्हा त्यांचा विवाह झालेला नव्हता आणि ही गोष्ट त्यांच्याकडे संशयानं बघण्यास कॉर्नवॉलवासियांना पुरेशी होती. लॉरेन्सच्या घरी 'ख्रिसमस ईव्ह' साजरी केली जात असताना माउंटसिएरची कागदपत्रं तपासायला पोलिसांनी धाड घातली होती. माउंटसिएर मॉन्सेल या नावानं पुढं 'कांगारू'मध्ये अवतरला. कॉर्नवॉलमध्ये पोलीस मॉन्सेलची उलटतपासणी घेतात, नंतर इंग्लंडमध्ये त्याला अटक केली जाते आणि त्याची कसून झडती घेण्यात येते.

ईस्थर माउंटसिएरबरोबर राहात होती पण ती सुखी नव्हती. तो इंग्लंडला गेल्यानंतर ती ख्रिसमसला लॉरेन्सांकडे राहिली. तीनेक आठवडे तिथंच मुक्काम केला. पुढल्या वर्षी ती पुन्हा लॉरेन्सांना भेटायला आली. यावेळी फ्रीडा कोलायटिसनं आजारी होती. लॉरेन्स आणि ईस्थर बराचसा काळ एकत्र घालवत. त्याला ती अतिशय आवडली होती. त्यानं तिला बरीच पत्रं लिहिली, जिव्हाळ्यानं भरलेली. तिच्याशी शय्यासोबत करण्याचा मोह कुणालाही पडावा असा तिचा देखणेपणा मादक होता. लॉरेन्सच्या परिचित स्त्रीयांहत्यांपेक्षा ती वेगळी होती. तथापि, तिच्याशी लॉरेन्सचे लैंगिक संबंध होते असं विधान करणं धाष्ट्याचं ठरेल.

ख्रिसमसला कॅथरीन कार्सवेलच्या लक्षात आलं होतं की, ईस्थर रूपसुंदरी आहे पण दुःखी आहे आणि फ्रीडाच्या विरोधात आपली ताकद तोडीस तोड आहे हे दाखवण्याची तिची ईर्ष्या अनावर आहे. अर्थात् तिच्या पदरी अपयश आलं हे सांगणं नकोच. शक्यता आहे, लॉरेन्सशी शय्यासोबत करणं ईस्थरला आवडलं असतं आणि ही गोष्ट फ्रीडाच्या नजरेतून निसटली नव्हती. ईस्थरनं आपली मनीषा पूर्ण केली की नाही याबाबत मात्र फ्रीडा अखेरपर्यंत साशंकच राहिली. १९१७ च्या ग्रीष्मात आपल्याला फार एकाकी वाटत होतं आणि याचं कारण ईस्थरबरोबरची लॉरेन्सची लगट असं फ्रीडानं आपल्या आठवणीत नमूद केलं आहे. लॉरेन्सची अमेरिकन

आश्रयदाती मेवल लुहान (फ्रीडाबद्दलची तिची असूया लक्षात घेता तिच्या शब्दावर विश्वास ठेवणं जड आहे) हिच्या मते, फ्रीडानं तिला सांगितलं होतं की कॉर्नवॉलमध्ये असताना लॉरेन्सनं आपल्याशी बेईमानी केली होती. या संदर्भात दोन व्यक्तींचा उल्लेख तिनं केला होता. एक अमेरिकन छोकरी. पण त्यांचा अनुभव अपेशी ठरला होता. फ्रीडानं मेबलला असं सांगितलं असेलही. शक्यता आहे, दुसरी व्यक्ती म्हणून विल्यम हेन्री हॉकिंगचा उल्लेख फ्रीडानं केला असेल. या काळात लॉरेन्स हॉकिंगची मैत्री दाट होती.

हॉकिंग सुंदर होता, जवळपासच्या शेतावर काम करत होता. तो आणि लॉरेन्स एकाच वयाचे. हॉकिंगनं वयाच्या तेराव्या वर्षी शाळेला रामराम ठोकला होता. पण त्याला पुस्तकांमध्ये, भाषांमध्ये रुची होती. लॉरेन्स शिक्षित, लेखक, साहाजिकच हॉकिंग त्याच्याशी अदबीनं वागत होता, त्याचा मान राखत होता.

जगाकडून काय मिळवता येईल यासंबंधीच्या त्याच्या अपेक्षा लॉरेन्सनं उंचावल्या होत्या. 'शेतीहून अन्य कुठल्याही कामाला तो अपात्र असला तरी बौद्धिक जीवनासाठी तो आसुसलेला आहे.... तो माझ्याकडे पाहातो जणू काही अकस्मात मी त्याला पंख देऊ शकेन!'

लॉरेन्सनं हॉकिंगच्या घरातील सर्वांशी मैत्री केली. हॉकिंगचा धाकटा भाऊ स्टॅन्ले याला फ्रेंच बोलायला तो शिकवू लागला. हॉकिंग कुटुंबियांबरोबर सहलींना जाऊ लागला. या सहलीत मेबल आणि मेरी या हॉकिंगच्या बहिणीही सामील होत. त्यांच्याबरोबर काही वेळेला फ्रीडाही चहा घेत असे. परंतु या सामान्यजनांशी लॉरेन्स ज्या सहजतेनं, आत्मीयतेनं वावरत असे, त्यांच्यात मिसळत असे, तसं वागणं फ्रीडाला कधीच जमू शकलं नाही. प्रकृती खराब असूनही हॉकिंगबरोबर शेतात काम करण्याचा लॉरेन्सचा उत्साह दांडगा. हॅग्ज फॉर्मवर लॉरेन्स जायचा तेव्हा पेंढ्या कशा सुबकरीत्या बांधायच्या हे तो शिकला होता. आता त्याचं प्रात्यक्षिक तो हॉकिंगांना दाखवत असे. लॉरेन्स मायेचा भुकेला होता आणि ती निरपेक्ष माया जशी त्याला चेंबर्सांकडून मिळत असे तशीच आता हॉकिंगांकडून मिळत होती.

'वूमेन इन लव्ह'ला लॉरेन्सनं उपोद्घात लिहिला होता. 'द रेनबो' अश्लील ठरवली गेल्यामुळं घाबरून लॉरेन्सनं हा उपोद्घात कादंबरीतून वगळला हेता. या उपोद्घातामध्ये हॉकिंगसारखी शरीरयष्टी लाभलेल्या एका कॉर्निश तरुणाबद्दल रूपर्ट बिरकिनला अतोनात शारीरिक आकर्षण वाटत असल्याचं दाखवलं आहे : 'नंतर पुन्हा बिरकिनला जाणवायचं, त्याच्यामध्ये आसक्ती उफाळून आली आहे, या माणसाला जाणून घेण्याची, त्याला आपलसं करून घेण्याची आसक्ती, जणू काही त्याचं भक्षण त्याला करायचं होतं, त्याचा प्रत्यक्ष गाभाच त्याला हस्तगत करायचा होता.... .त्याच्या समोर असलेल्या दणकट माणसाच्या देहामध्ये जणूकाही त्याच्या आसक्तीची पूर्ती सामावलेली होती. बिरकिनबद्दल असंही नि:संग्धिपणे सांगण्यात आलं आहे : पुरुषांपेक्षा त्याला नेहमीच स्त्रियांची ओढ अधिक होती, स्त्रीच्या सहवासात त्याला अगदी मोकळं वाटत असे, असं असूनही स्त्रीबद्दल पुरुषाला वाटायला हवं असं समजलं जात तसं क्षोभक, आवेगी,

उत्कंठित आकर्षण त्याला वाटत असे ते पुरुषांबद्दल!'

अर्थात् यातून असा अर्थ काढणं संयुक्तिक ठरणार नाही की हॉकिंगबद्दल लॉरेन्सला अशीच आसक्ती होती वा हॉकिंगनं (दोन वर्षांनी त्याचं लग्न झालं) त्याच्या असल्या प्रयत्नांचं स्वागतच केलं असेल. पण हॉकिंगला जाणवलं होतं की लॉरेन्सला समलिंगसंभोगाचं थोडफार आकर्षण असावं. तो शेतावर येत असे आणि त्यासंबंधी बरंच बोलत असे! आपल्याला असलं आकर्षण असल्याचं त्यांनी कॅथरीन कार्सवेलापाशी नाकारलं होतं. पुरुषा-पुरुषामधल्या मैथुनाबद्दल त्याला घृणा होती, ही वस्तुस्थिती होती. त्याचा विचार मनात आला की त्याला बीटल कीटकाचं स्मरण होत असे असं त्यानं कॉटला लिहिलं होतं, आणि कॉर्नवॉलमध्ये मरेच्या सहवासात असताना बीटलचं स्वप्न त्याला पडलं होतं, आणि 'द व्हाईट पिकॉक' मध्ये समलिंगसंभोगी प्रवृत्तीला आलेली जाग, नग्नावस्थेत पुरुषाला कवटाळण्यात मिळणारं सुख, त्यानं वर्णिलं आहे. लॉरेन्सच्या व्यक्तिमत्त्वामध्ये स्त्रीत्वाचा अंश बऱ्याच प्रमाणात असावा. जेसी चेंबर्सचे भाऊ 'पुरुषाच्या कातड्यामधील स्त्री' असा त्याचा उल्लेख करत. लैंगिकबाबतीत लॉरेन्सची मनोवृत्ती द्विधा असल्याचं हेलेन कॉर्कलाही जाणवलं होतं. या संदर्भात हेन्री सॅव्हेज या पत्रकाराला त्यानं लिहिलेलं पत्र लक्षणीय आहे. १९१३ च्या डिसेंबरमध्ये हेन्रीनं 'इंग्लिश रिव्ह्यू' मध्ये 'द व्हाईट पिकॉक'चं परीक्षण केलं होतं, तिची स्तुती केली होती. त्या ओळखीच्या आधारे लॉरेन्सनं पत्रात रिचार्ड बर्नहॅम मिडलटन या तरुण लेखकाविषयी लिहिलं होतं. रिचार्डनं १९११ मध्ये आत्महत्या केली होती. त्याबद्दल लिहीत असताना लॉरेन्सनं अनुमान केलं होतं : 'कदाचित् अशी एखादी स्त्री त्याला आढळली असती, जिच्यावर त्यानं प्रेम केलं असतं आणि तिनं त्याच्यावर मग काही प्रश्न नव्हता, आणि तो पाक राहिला असता... एखाद्या पुरुषावर तो प्रेम करू शकला असता, स्त्रीवर करेल त्याहून अधिक : अगदी शारीरिक देखील, जसं प्राचीन लोकांनी केलं होतं..... मला वाटतं, याचं कारण बऱ्याचशा स्त्रिया पुरुषाच्या कल्पनाशक्तीला वाव देत नाहीत– अर्थात् मला कल्पना नाही. मला जाणून घ्यायचं आहे, महात्मतेकडे जाणाऱ्या जवळजवळ प्रत्येक पुरुषाचा कल समलिंगसंभोगाकडे का असतो, तो हे मान्य करो वा अमान्य, म्हणूनच स्त्रीच्या देहापेक्षा पुरुषाच्या देहावर त्याचं अधिक प्रेम असतं– जसं मला वाटतं ग्रीकांचं होतं, शिल्पकार आणि झाडून सारे!'

तथापि, लॉरेन्सच्या समलिंगीसंभोगी वर्तनाचा एकमेव पुरावा आहे तो एकानं दुसऱ्याला, दुसऱ्यानं तिसऱ्याला सांगितलं अशा स्वरूपाचा. हिल्डा डुलिटलच्या आठवणीनुसार १९१७ मध्ये फ्रीडानं तक्रार केली होती की लॉरेन्सला पुरुष केवळ लैंगिक दृष्ट्याच आवडतात आणि रिचार्ड ॲल्डिंग्टन या आपल्या पूर्वीच्या नवऱ्याला १९४९ मध्ये पाठवलेल्या पत्रात हिल्डानं लॉरेन्सच्या कॉर्नवॉलमधील 'विषयासक्त सलगीचा उल्लेख केला होता. विशेष महत्त्वाचं, १९५३ च्या ऑगस्टमध्ये फ्रीडानं मरेला लिहिलेलं पत्र. या पत्रात तिनं सांगितलं होतं. 'मला वाटतं त्याच्यामधील समलिंगसंभोगी प्रवृत्ती ही दैन्यावस्थेमधून उद्भवलेली अवस्था होती– मी त्याच्याशी

झगडले आणि जिंकले.' फ्रीडानं उल्लेखिलेल्या लॉरेन्सच्या 'दैन्यावस्थे'ला बऱ्याच गोष्टी कारणीभूत झाल्या असाव्यात. फ्रीडाबरोबरच्या संबंधात निराशा पदरी पडली नसती तर या 'विषयासक्त सलगी'नं डोकं वर काढलं असतं का वा आपल्या लैंगिक बाबींमध्ये पुरुषाला आपण फार प्राधान्य देत आहोत ही वाढती जाणीव त्यांच्या झगड्याचं कारण ठरतं नव्हती ना, या प्रश्नांची उत्तरं नि:संदिग्धपणे मिळत नाहीत. यातील कुठलंही कारण असो, त्या दोघांमधल्या दीर्घकालीन झगड्याच्या नव्या वळणाला हॉकिंग निमित्तमात्र झाला होता.

लॉरेन्स हॉकिंगला भेटायला जायचा तेव्हा फ्रीडा, सेसिल ग्रे या शेजाऱ्याच्या संगतीत बराचसा काळ घालवत असे. ग्रे तरुण होता, गोंडस होता, सुखवस्तू होता. त्याच्या आईवडिलांकडून त्याला २०० पौंड वर्षासन मिळत होतं. लॉरेन्सला ग्रे कधीच फारसा आवडला नव्हता. लॉरेन्सच्या लैंगिक समस्यांबद्दल आपल्याला बरंच काही माहीत आहे असं तो दर्शवत असे. त्यापैकी एक समस्या : त्याचं षंढत्व. हा गौप्यस्फोट ग्रेपाशी केला होता, फ्रीडानं. (ही तक्रार तिनं अन्य कुणा मित्राकडे केली नव्हती!) तिला एकाकी, उदास वाटू लागलं की ती ग्रेला भेटत असे आणि त्याच्या सहवासात तिला उभारी येत असे. मुक्त लैंगिक संबंधाविषयीचे तिचे विचार आणि या बाबतीत पुढाकार घेण्याची तिची धिटाई लक्षात घेता शक्यता आहे, ग्रे आणि फ्रीडा प्रेमिक असावेत.

'बिड मी टु लिव्ह' (१९६०) या कादंबरीमध्ये हिल्डा डुलिटलनं लॉरेन्स, फ्रीडा, ती स्वत: आणि ग्रे यांच्याशी साम्य असलेल्या पात्रांच्या ग्रुपचं चित्रण केलं आहे. तिनं असं सूचित केलं आहे की सेसिल ग्रेच्या संगतीत आपल्याला बराच अवधी घालवायला मिळावा म्हणून, यासाठी हिल्डाशी शय्यासोबत करावी फ्रीडा लॉरेन्सला प्रोत्साहन देत होती. इथं काही गफलती आहेत. लॉरेन्स हॉकिंगकडे गेला की फ्रीडाला आपसूक संधी मिळत असे, वेळही मिळत असे आणि हिल्डामध्ये स्वारस्य घ्यावं यासाठी लॉरेन्सला फ्रीडाच्या प्रोत्साहनाची गरज नव्हती. त्यानं तिला काही अतिशय लाघवी पत्र पाठवली होती, पण एका प्रसंगी त्या दोघांना एकांत लाभला असूनही त्यानं घाईघाईनं तिथून पाय काढला होता आणि हिल्डा बिचारी खट्टू झाली होती. फ्रीडा आणि ग्रे यांचे संबंध कसेही असोत, सरतेशेवटी ग्रेला गटवला हिल्डानं आणि त्याच्यापासून तिला मूलही झालं.

लॉरेन्सभोवती कोंडाळं करणाऱ्या स्त्रियांचा ग्रे दुस्वास करत असे. स्त्रियांच्या संगतीचा लाभ लॉरेन्स फारसा उठवत नसल्याचं पाहून तो लॉरेन्सला कॉर्नवॉलमधील सेंट अँथनी म्हणत असे. त्यांनं लॉरेन्सला लिहिलंही होतं की स्त्रियांचा एक गुप्त पंथ स्थापन करून त्याचा अध्वर्यू बनण्याच्या दिशेनं तो पावलं उचलत आहे. कदाचित् फ्रीडालाही तसं वाटत असेल. शिष्य आणि मॅग्दालीन यांच्यामध्ये येशू ख्रिस्ताचा ओढा मॅग्दालीनकडे अधिक होता असा टोमणा ग्रेनं आपल्या पत्रात मारला होता. त्या अनुषंगानं लॉरेन्सनं त्याला लिहिलं की येशूनं आपल्या शिष्याकडे कमी लक्ष दिलं असतं आणि मॅग्दालीनकडे अधिक लक्ष पुरवलं असतं तर बरं

झालं असतं. सुवासिक तेल ओतण्यानं केली नसेल एवढी नासाडी बाराजणांच्या शिष्यत्वानं केली आहे. तो स्वत: आणि त्याच्या 'बाया' यांच्यासंबंधी सांगायचं तर त्या कशा आहेत, कशा नाहीत हे त्याला ठाऊक आहे, यात थोडीफार खिचडी झालेली असली तरी त्याही पलीकडे असलेलं वास्तव ग्रे आणि फ्रीडा लक्षात घेत नाहीत. बाह्य रंगावरूनच ते जगाची पारख करू इच्छितात. मॅग्दालीननं ख्रिस्ताचे पाय धुतले वगैरे बाबी बाजूला ठेव. शिष्य आणि ख्रिस्त तद्वतच ख्रिस्त आणि बेथानी स्त्रिया यांच्यामधल्या सामंजस्यापेक्षा ख्रिस्त आणि मॅग्दालीन यांच्यामधलं सामंजस्य अधिक गाढ होतं, शब्दांविणं संवाद साधणारं होतं. ख्रिस्ताला हे ज्ञान झालं होतं, त्यापायी तो घाबरलाही होता. पण हे ज्ञान 'ख्रिश्च्यानिटी,' 'पावित्र्य', किंबहुना प्रेमाहूनही गाढ होतं. फ्रीडा त्याचा तिरस्कार करते तसाच ग्रेही त्याचा तिरस्कार करतो. ग्रेनं तिरस्कार करणं सोडून द्यावं.

ग्रे आणि फ्रीडा यांना एकाच माळेत लॉरेन्सनं गोवलं ही बाब अर्थपूर्ण आहे. लॉरेन्स अधिकारवाणीनं त्यांना सुनावतो की लैंगिक संबंधांची त्या दोघांची कल्पना आणि तो स्वत: आणि त्याचं अनुयायित्व पत्करलेल्या स्त्रिया यांची त्या संबंधांबाबतची कल्पना यात महदंतर आहे हे त्या दोघांनी मान्य करावं : 'तुला हवं आहे एक भावनाप्रधान विषयासक्त "अंडरवर्ल्ड", फ्रीडा आणि हेब्रेडिअन्स यांच्याप्रमाणं : माझ्या "स्त्रियांना हवं आहे एक परमानंद देणारं तरल बुद्धिजीवी "अंडरवर्ल्ड", ग्रीकांप्रमाणे- ऑर्फिझम."

लॉरेन्सनं 'वूमेन इन लव्ह' लिहून पूर्ण केली. २१ नोव्हेंबर १९१६ रोजी त्यानं कॅथरीन कॉर्सवेलला लिहिलं की त्याची कादंबरी शेवटी एकदाची तिच्याकडे तो पाठवून देत आहे. 'थँक गॉड, ती घराबाहेर मी काढू शकलो..... अर्थात् शेवटचं प्रकरण, उपसंहार, अजूनही लिहायचा आहे : पण थोड्या कालावधीनंतर!

या कादंबरीत 'द रेनबो' मधील ब्रँगवेन कुटुंबाची कथा पुढं चालू होते. या कथेच्या केंद्रस्थानी आहेत उर्सुला आणि गुड्रुन या बहिणी. दोघीही एका छोट्या गावात शिक्षिका आहेत. या गावी क्रीच कुटुंबाच्या खाणी आहेत. उर्सुला ही रुपर्ट बिरकिन या शाळा इन्स्पेक्टरच्या प्रेमात पडते. गुड्रुन हिचं खाणमालकाचा मुलगा जेराल्ड याच्याशी 'अफेअर' असतं. बिरकिन आणि जेराल्ड हे जिवाभावाचे दोस्त आहेत. कादंबरीच्या प्रारंभीच्या खर्ड्याची सुरुवात कादंबरीप्रमाणं ब्रँगवेन भगिनींच्या विवाहविषयक चर्चेनं झालेली नव्हती, तर जेराल्ड आणि बिरकिन यांच्या सहलीच्या वर्णनानं करण्यात आली होती. या सहलीत एकमेकांविषयीच्या भावना त्यांना शब्दांविणा कळलेल्या होत्या. दोघंही त्यांच्या आयुष्यात सुखी नाहीत. बिर्किनचं लेडी हेरमिओन रॉड्रीस हिच्याशी प्रेमप्रकरण आहे. हेरमिओनचं मानसिक संतुलन काहीसं बिघडलेलं आहे. तिच्याशी शरीरसंबंध जोडणं त्याला अशक्य होतं. जेराल्डच्या हातून त्याच्या बालपणी त्याचा भाऊ अपघातानं मारला गेला होता, परिणामी, क्रीचच्या मालकीच्या खाणीमधून अधिकाधिक उत्पादन



अनुक्रमणिका



काढण्याचा प्रयत्न करणं त्याच्या जीवनाची इतिकर्तव्यता बनली आहे. भावाची उणीव भासू न देणं हा यामागील त्याचा उद्देश असावा.

इंग्लंडची भूमी लॉरेन्सला प्रिय होती. पण सांप्रत त्या भूमीची औद्योगिकरणानं केलेली वाताहत त्याला अस्वस्थ करत होती. या वाताहतीचं चित्रण आपल्या या कादंबरीत करायचं त्यानं मनाशी योजलं होतं. पण कादंबरीचा मुख्य विषय बनला : लैंगिक प्रेमाद्वारे मुक्ती साधण्यामधील अडचणी, अडथळे. त्यानं गुड्रुनला अत्याधुनिक, सर्जनशील, कामसू बाई दाखवली. कामप्रेरणेमधून आत्मपीडक आणि परपीडक सुख मिळवण्याची तिची धडपड असते. या तिच्या धडपडीत ज्याच्यावर तिचं प्रेम आहे त्या पुरुषाचा– जेराल्डचा विनाश अटळ ठरतो. तिची वहीण उर्सुला दिलखुलास वृत्तीची बाई आहे. प्रत्येक गोष्टीतील मौज ती लुटते. तिची व्यक्तिरेखा फ्रीडाचं स्मरण करून देते. हेरमिओन जेव्हा खोचकपणे तिला ऐकवते की बिरकिनशी लग्न करणं म्हणजे त्याच्यापायी क्लेश भोगणं. त्यावर उर्सुलाचं म्हणणं की प्राप्त परिस्थितीमध्ये सुख वेचायला हवं. 'मला वाटतं सुखी नसणं ही अवनती आहे.' उर्सुला फ्रीडाला पसंत पडली होती, आवडली होती. 'तू जा तुझ्या बायांकडे... ..तुझ्यामागं त्यांची माळ सदाचीच घोटाळत असते– तुझी इच्छाही तीच. तुझ्या त्या आत्मिक नववधूंकडे– पण माझ्याकडं मात्र येत जाऊ नकोस, कारण मी काही त्यांच्यातली नाही, थँक यू.' उर्सुलाच्या या जळफळाटात आपल्याला फ्रीडाचा आवाज ऐकू येतो.

बिरकिनची विचारपद्धती लॉरेन्सचीच आहे. उर्सुलानं त्याच्या लैंगिक बाबीमधील शर्ती मान्य कराव्यात यासाठी त्याची चाललेली धडपड म्हणजे फ्रीडाबरोबरच्या लॉरेन्सच्या धडपडीचा वृत्तांत आहे. लैंगिकतेचा कुठलाही प्रकार बिरकिनला जवळजवळ तिरस्करणीय वाटू लागलेला असतो :

'तो जाणून होता त्याचं आयुष्य तिच्यावर अवलंबून आहे. पण आपणहून तिनं दिलेलं प्रेम स्वीकारण्यापरीस तो मरण पत्करेल. प्रेमाची पुराणी रीत म्हणजे जाचक बंधन, देशसेवेसाठी सक्तीनं लष्कारात भरती होण्याचा प्रकार ..... विवाहाचा त्याला तिटकारा होता त्याहूनही त्याला अधिक तिटकारा होता स्वैराचाराचा.... ..एकूण, त्याला संभोगाचा तिटकारा होता, संभोग कितीतरी मर्यादित आहे. संभोगानंच युगुलांची पुरुष आणि स्त्री अशी विभागणी करून टाकलेली आहे– संभोगाला इतर गरजांच्या स्तरावर नेऊन ठेवण्याची, परिपूर्ती नव्हे तर एक औपचारिक क्रिया-पद्धती म्हणून गणण्याची त्याची इच्छा नव्हती.

बिरकिन आजारी असताना स्त्री- शक्तीच्या तिटकाऱ्यानं त्याचं मन व्यापलं जातं, भ्रमिष्ट क्रोध त्याचा कब्जा घेतो. 'त्याच्या लेखी, स्त्री 'मॅग्ना मेटर'- सर्वशक्तिमान माता ठरते. फ्रीडा तिच्या आत्मकथनात सांगते की लॉरेन्सला स्त्रियांचा नेहमीच धाक वाटत असायचा. त्याला वाटायचं की अखेरीस त्या पुरुषाहून अधिक शक्तिशील असतात. त्या सर्वेसर्वा असतात. 'तिच्यापासून पुरुष जन्माला येतो आणि तिच्यापाशी परततो, त्याच्या तनमनाच्या अंतिम

गरजेपोटी. ती म्हणजे धरणी आणि मृत्यू, जिथं प्रत्येकजण परततो.' याच नजरेनं बिरकिन स्त्रियांकडे पाहातो. त्याला अतिशय गाढ प्रेमाकर्षण आहे ते जेराल्डचं.

कादंबरीच्या अखेरीस दोन्ही जोडपी स्विस आल्प्समध्ये सफरीला जातात. इथला गारठा बिरकिन सहन करू शकतो कारण उर्सुलाच्या देहाची ऊब त्याला मिळत असते. इथं तो आणि उर्सुला बेबंद भोग उपभोगतात. जेराल्डशी गुदमैथुन करणं बिरकिनला जमलेलं नसतं. आता त्यातली मौज तो उर्सुलासंगे भोगतो. 'त्यांना हवं ते करणं त्यांना शक्य होतं– ती झोपायला गेली तेव्हा तिला हे कळून चुकलं. एखाद्याला तृप्ती देते अशी कुठलीही गोष्ट वर्ज्य कशी करता येईल? त्यात कसलं आलं आहे अध:पतन? पर्वा कशाला करायची?'

'वूमेन इन लव्ह'चं लक्षणीय वैशिष्ट्य म्हणजे लॉरेन्सनं केलेलं मानवी नात्याचं प्रभावशाली चित्रण आणि त्याच्या स्वत:च्या लैंगिक अस्वास्थ्याचे उमटलेले पडसाद.

२१ नोव्हेंबर १९१६ ला लॉरेन्सनं 'वूमेन इन लव्ह'चं हस्तलिखित कॅथरीन कार्सवेलकडे पाठवून दिलं तेव्हा त्यानं तिला आवर्जून लिहिलं होतं: 'अन्य कुणालाही ते वाचायला देऊ नकोस.' कारण त्याच्या परिचित व्यक्तींचे त्यानं केलेलं चित्रण त्या व्यक्तींना रुचणार नाही याचं भान त्याला होतं. त्यानं एवढी खबरदारी घेऊनही ओट्टोलिन मोरेलच्या कानी गेलंच की, या कादंबरीत ती खलनायिका आहे. तिनं लॉरेन्सला तसं विचारलंही. कॅथरीन मॅन्सफिल्डची चरित्रलेखिका क्लेअर टॉमलिन हिनं संशय घेतला आहे मरेचा. त्यानंच ओट्टोलिनच्या मनात संशयाचं बी पेरलं असावं. या काळात त्या दोघांचं बरंच गुफ्तगू चालत असे.

'वूमन इन लव्ह'चं हस्तलिखित ओट्टोलिनच्या हाती देणं लॉरेन्सला भाग पडलं. तिनं ते वाचलं. तिला धक्का बसला. ती दुखावली गेली. 'कुरूप थेरडेगत घाणेरडे पोशाख' अंगावर घालणारी, असं जिचं वर्णन करण्यात आलं आहे ती हेरमिओन आपलीच प्रतिकृती आहे हे तिच्या लक्षात यायला वेळ लागला नाही. लॉरेन्सनं बाजूला सारलेली ती एक 'मिस्ट्रेस' होती हे सूचित केलेलं पाहून तर तिचा संताप अनावर झाला. हेरमिओनच्या घराचं बारीकसारीक तपशीलासकट केलेलं वर्णन गार्सिंग्टनवर बेतलेलं होतं हे उघड होतं. तिनं पत्र लिहून लॉरेन्सकडे स्पष्टीकरण मागितलं. त्यानं मुळमुळीत उत्तर दिलं. लिहिलं की त्याच्या हेतूबाबत तिनं गैरसमजूत करून घेतलेली दिसते, हेरमिओन अतिशय छान बाई आहे, वगैरे वगैरे.

हेरमिओनच्या घराच्या वर्णनावरूनच केवळ ओट्टोलिनचं तिच्याशी असलेलं साम्य ओळखता येत होतं असं नव्हे. हेल काढून एकसुरी बोलणं आणि वैशिष्ट्यपूर्ण वाक्यरचनेची आवड या ओट्टोलिनच्या खास लकबी बारकाव्यानिशी चित्रित केलेल्या होत्या. आपल्या चेहऱ्याचा 'खत्रूड' असा करण्यात आलेला उल्लेख वाचून ओट्टोलिन नाराज होणं स्वाभाविक होतं. आपल्याला हवं ते साध्य करण्यासाठी हिकमती लढवणारी आणि बिरकिनच्या विचारांची निव्वळ पोपटपंची करणारी बाई म्हणून तिचं पुस्तकभर वर्णन करण्यात आलं आहे. तिची बुद्धिमत्ता आणि तिचं ग्रंथप्रेम यांचीही खिल्ली उडवण्यात आलेली आहे. बिरकिनवरून हेरमिओन आणि

उर्सुला यांच्यामध्ये होणाऱ्या झगड्याचं चित्रण ज्या तऱ्हेनं लॉरेन्सनं केलेलं होतं ते ओट्टोलिनला खटकलं. या चित्रणात ती आणि फ्रीडा यांना परस्परांविषयी वाटणाऱ्या मत्सराचं ठसठशीत प्रतिबिंब पडलेलं आहे. 'तिचा "हम करे सो कायदा," तिचा अहंभाव, ऐहिक गोष्टींबद्दलची तिची ओढ, हे काय आत्मिक आहे? कोळीण आहे ती, एक एक कोळीण, अगदी पूर्ण व्यवहारी– तिला सत्ता हवी, झटपट सत्ता, आपण थोर बाई आहोत या भ्रमात तिला राहायला हवं, बस्स, आणखीन काही नाही.' या उर्सुलाच्या भडिमारात फ्रीडाचा आवाज ओट्टोलिनला ऐकू न येता तरच नवल!

चीड असणाऱ्या हेरमिओनच्या व्यक्तिरेखेनं ओट्टोलिनचा मानसिक छळ मांडला. तिच्याही आजवर ध्यानी न आलेलं तिचं भयासूर रूप लॉरेन्सनं आरास रचून थाटलं होतं. पुस्तकातला अत्यंत द्वेषमूलक भाग लिहिण्यात फ्रीडाचा निश्चितपणे हातभार लागलेला आहे अशी ओट्टोलिननं स्वत:च्या मनाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. 'सन्स अँड लव्हर्स'च्या लेखनप्रक्रियेत फ्रीडाचा जसा सहभाग होता तसा आणि तेवढा या कादंबरीत खचितच नव्हता. औपरोधिक लिखाण ओट्टोलिनला आवडत असे. 'क्रोम येलो' या कादंबरीत अल्डस हक्स्लेनं प्रिस्किला विम्ब्रुश म्हणून ओट्टोलिनचं 'कॅरीकेचर' रेखाटलेलं आहे. तिला ते, अर्थातच आवडलेलं नव्हतं पण तिनं त्या गोष्टीचा बाऊ केलेला नव्हता. कालांतराने ती विस्मृतीतही गेली. पण 'वूमेन इन लव्ह'नं दिलेल्या यातनांवर मात करणं तिला अवघड जात होतं. तिनं चीड व्यक्त केली की ती आणि लॉरेन्स यांच्यात लैंगिक संबंध कधीच जुळून आले नव्हते आणि ते वस्तुस्थितीला धरून होतं. यास्तव, हेरमिओनबद्दल लॉरेन्सला जो द्वेष वाटतो त्याचा उगम आपल्याला अन्यत्र शोधावा लागेल.

काही जणांचं म्हणणं, ओट्टोलिनला चीड आली कारण तिचं कादंबरीत करण्यात आलेलं हुबेहूब वर्णन. वस्तुत: हे चित्रण अगदीच वरवरचं आहे. वैवाहिक जीवनातील क्लेशदायी मानखंडनेमुळं ओट्टोलिननं ऑगस्टस जॉन, बर्ट्रांड रसेल यासारखे यार आपल्या जाळ्यात पकडले होते. १९३७ मध्ये आपल्या विवाहाच्या वाढदिवशी तिनं आपल्या दैनंदिनीमध्ये खेदानं नमूद केलेलं आहे की तिचा नवरा फिलीप याचं तिला लैंगिक आकर्षण कधीच वाटलेलं नाही. तिच्याशी त्यानं लग्न केलं होतं ते त्याच्या डामडौलाचा षौक असणाऱ्या कुटुंबीयांखातर. कर्तव्यदक्ष म्हणून मिरवणाऱ्या फिलीपची, टायपिस्ट, मोलकरीण यांच्याशी लफडी चालू असत आणि एका प्रसंगी तर त्यानं कबुली दिली होती की त्यानं दोन स्त्रियांना पोटाशी केलं होतं. त्याचा मानसिक तोलही वरचेवर ढळत असे. आणि याचं खापर ओट्टोलिनच्या माथ्यावर फोडता येणार नाही. फिलीप पौगंडावस्थेत असल्यापासून आपल्या आईवडिलांना त्यांच्या दुसऱ्या मुलाचा लळा अधिक आहे हे त्याच्या ध्यानी आलं होतं. त्यामुळं तो बराच अस्वस्थ असे. त्याच्या या भावानं पुढं आत्महत्या केली. आपण आयुष्याच्या धकाधकीत उणे पडतो ही त्याची भावना अगदीच निराधार नव्हती : राजकारणी म्हणून स्वत:च्या लायकीविषयीच्या भ्रमात तो गहू शकत

नव्हता.

लग्नानंतर काही वर्षांनी एका गवंड्याशी ओट्टोलिनचे उत्कट शरीरसंबंध जुळून आलेले होते, पण लॉरेन्सचा परिचय झाला त्या काळात समागमात तिला स्वारस्य उरलेलं नव्हतं. तिला स्वारस्य होतं, बुद्धिमान मित्रांच्या संगतीत. या मित्रांच्या आयुष्यावरील आपल्या प्रभावाचं मोल सर्व गोष्टीहून तिला अधिक होतं. प्रारंभीच्या काळात तिच्या प्रबळ व्यक्तिमत्त्वाचा आणि खानदानीपणाचा लॉरेन्सवर विलक्षण प्रभाव होता. तिचं कौतुक आणि औदार्य त्यानं उपभोगलेलं होतं. तिच्यावर तो निहायत खूष होता. 'वूमेन इन लव्ह'चं लेखन चालू असताना त्यानं तिला आपल्या घरी येण्याचं आग्रहाचं निमत्रंण दिलं होतं, तो तिच्या घरी जाऊन राहात हाता, तिचं आदरातिथ्य स्वीकारत होता. तिला यातनाकारक ठरेल असं तिचं चित्रण करत असताना तो तिच्याकडून कपडे, ब्लँकेट, खाद्यपदार्थ आणि पुस्तकं बिनदिक्कतपणे स्वीकारत होता. तिचा मार्गदर्शक व प्रेषित या भूमिका त्यानं स्वत:हून स्वीकारल्या होत्या. लॉरेन्सच्या द्वेषबुद्धीचं मूळ त्याच्या स्वत:च्या जीवनाशी निगडित असावं हा तिचा तर्क चुकीचा नाही. 'वूमेन इन लव्ह'च्या बाजूला ठेवण्यात आलेल्या उपोद्घातात यासंबंधीचे काही धागेदोर सापडू शकतात. लॉरेन्सचे ओट्टोलिनबरोबरचे संबंध आणि जेसी चेंबर्सबरोबरची त्याची वासनासक्त मैत्री यात विलक्षण साम्य होतं. या दोन्ही संबंधात आत्मिक प्रेरणेची पाचर मारलेली होती. नेमकी हीच बाब फ्रीडाला खटकत असे. हेरमिओनबरोबरच्या संभोगातील बिरकिनच्या अपयशाचं वर्णन जेसीबरोबरच्या लॉरेन्सच्या अनुभवावर बेतलेलं आहे हे आपण यापूर्वी पाहिलेलं आहे.

ओट्टोलिनच्या वैवाहिक जीवनाच्या 'पॅटर्न'कडे लॉरेन्सनं पाहिलं तेव्हा त्याच्या नजरेला पडलं : एक कर्तृत्ववान आणि स्वतंत्र बाण्याची स्त्री आणि एक दुय्यम दर्जाचा पुरुष. आश्रयदायी म्हणून लाभलेली हुकूमत, संपत्ती यांनी ओट्टोलिनला आत्मविश्वास दिला होता, आणि एके काळी या गोष्टीचं त्याला भारी कौतुक वाटत असलं तरी याच गोष्टींचा त्याला तिटकारा आणि भीती वाटत होती. पुरुषांच्या कामेच्छांचा बळी घेऊन त्यांचं पौरुष हिरावून घेण्याच सामर्थ्य त्यानं हेरमिओनच्या अंगी बाणवलं होतं.

स्वत:च्या जीवनाला लागलेल्या या घोराचं अशाच प्रकारचं स्थानांतर मरे आणि कॅथरीन यांच्यामधील संबंधाचं त्यानं जे विश्लेषण केलं आहे त्यात आढळून येतं. १९१८ मध्ये तर या समस्येनं 'ऑब्सेशन' झाल्यागत तो पछाडला गेला होता. फ्रीडाबरोबरचे त्याचे स्वत:चे ताणतणाव त्यानं मरे- कॅथरीनमधील संबंधावर प्रक्षेपित केले होते. कॅथरीन सर्वशक्तिमान मातेचं रूप आहे हे तिच्या गळी उतरवण्याचा तो सातत्यानं प्रयत्न करत होता आणि तिच्यावरील मरेचं भावनिक परावलंबित्व त्याच्या मस्तकात जात होतं. फ्रीडाबरोबरचे आपले संबंध याहून भिन्न नाहीत ही जाणीव तो नजरेआड करू शकत नव्हता. १९१८च्या डिसेंबरमध्ये त्यानं कॅथरीनला लिहिलं होतं : एक प्रकारे फ्रीडा ही भक्षक माता आहे. या मार्गानं लैंगिक संबंध गेले तर त्यातून सावरणं महा कठीण. आपण जर यातून सावरलो नाही तर मृत्यू अटळ! याच

पत्रात, स्त्रीनं पुरुषाला अग्रक्रम देण्याची गरज असल्याचं प्रतिपादन केलं होतं. 'यावर माझा विश्वास आहे. फ्रीडाचा नाही. परिणामी आमची भांडणं.' फ्रीडाबद्दल त्याला वाटणाऱ्या धास्तीमधून स्वत:ची मोकळीक करून घेण्यासाठीच जे चांगले गुण फ्रीडामध्ये असावेत अशी त्याची अपेक्षा होती ते सारे गुण त्यानं उर्सुलाला बहाल केले आणि फ्रीडामधील दुष्ट शक्ती कादंबरीतील इतर स्त्रियांना वाटून दिली.

'वूमेन इन लव्ह'नं लॉरेन्स आणि ओट्टोलिन यांच्यामध्ये दुरावा निर्माण केला. फिलीप मोरेल लॉरेन्सच्या एजंटाकडे गेला आणि ही कादंबरी उघडउघड बदनामी करणारी असल्याचं त्याच्या निदर्शनास आणून दिलं आणि ताकीद दिली की कुठल्याही प्रकाशनानं ती प्रकाशित केल्यास त्याच्यावर कायदेशीर कारवाई करण्यात येईल. ही वार्ता कानी पडल्यावर लॉरेन्स शांतचित्त राहिला. 'द रेनबो' वर बंदी घातली गेल्यानंतर 'वूमेन इन लव्ह' प्रकाशित करण्यास प्रकाशक फारसे उत्सुक नव्हते. २ फेब्रुवारी १९१७ रोजी मार्क गेर्टलरला पाठवलेल्या पत्रात लॉरेन्सनं लिहिलं : 'माझ्या कादंबरीला प्रकाशक मिळत नाही. मला त्याची पर्वा नाही. या अशा जगात ती बाहेर आल्यानं तिचं काय भलं व्हायचं?' कादंबरी एका प्रकाशकडून दुसऱ्या प्रकाशकाकडे जात होती. आणि प्रत्येकानं ती प्रकाशित करायला नकार दिला होता. १९२० च्या नोव्हेंबरपर्यंत ती प्रकाशित होऊ शकली नाही. न्यूयॉर्कमधील थॉमस सेल्तझेर याच्या छोट्या, नव्या प्रकाशन संस्थेनं ती प्रकाशित केली. इंग्लंडमध्ये १९२१च्या मेमध्ये ती प्रकाशित करण्याचं धार्ष्ट्य दाखवलं. १९१७ मध्ये प्रकाशित झालेलं एकमेव पुस्तक : 'लुक! विय हॅव कम थ्रू !' हा कवितासंग्रह. साहित्यजगतात त्याची फारशी दखल घेण्यात आली नाही.' 'द टाइम्स'नं म्हटलं, 'वाग्देवता फक्त तिरस्कारानं तिची मान अन्यत्र वळवू शकते.' बर्ट्रांड रसेल खवचटपणे उद्‌गारला, 'आय ॲम ग्लॅड दे हॅव कम थ्रू, बट व्हाय शुड आय लुक?'

१९१७ मध्ये लॉरेन्सच्या आयुष्यात दोन कटू घटना घडल्या.

**पहिली :** जूनमध्ये लॉरेन्सला लष्करी वैद्यकीय तपासणीसाठी दुसऱ्यांदा बोलावण्यात आलं. २३ जूनला सकाळी सात वाजता फ्रीडाचा निरोप त्यानं घेतला. बॉडमिन बराकीमधला यावेळचा अनुभव पाहिल्यासारखा क्लेशकारक ठरला नाही. या तपासणीत त्याला क्षयाची बाधा झाली असल्याचं निश्चित निदान करण्यात आलं. लष्करी सेवेसाठी तो अपात्र ठरला. पण हलकीसलकी, कमी श्रमाची कामं करण्याच्या वर्ग- सी ३ त्याला देण्यात आला. त्यावर त्याचं म्हणणं : असली कामं करायला बरीच माणसं उपलब्ध आहेत, असल्या कामासाठी त्याचा विचार करण्यात येऊ नये.

**दुसरी :** लॉरेन्स आणि फ्रीडा यांची कॉर्नवॉलमधून अपमानास्पदरीत्या करण्यात आलेली हकालपट्टी.

कॉनवॉलमध्ये असताना लॉरेन्सांवर पोलीसांची सतत सख्त पाळत होती. १९१७ च्या शरदामध्ये युद्धाची ऐन धुमश्चक्री चालू होती. आणि त्यांचा संशय घेण्यास बरीच कारणं होती.

लॉरेन्स नेहमी युद्धाच्या विरोधात अत्यंत परखडपणे बोलत होता. त्याची बायको जर्मन होती. तिच्या साध्या वागणुकीमधूनही ग्रामस्थांना ती हेरगिरी करत असल्याचा संशय येत होता. एकदा ती माळावरून आपल्याच नादात धावत होती आणि तिच्या गळ्यातील सफेद स्कार्फ वाऱ्यानं फडफडत होता. लोकांनी संशय घेतला, ती शत्रूंच्या पाणबुड्यांना इशारे करत आहे. हॉकिंगांच्या शेतावर काम करताना लॉरेन्सला पाहून ते म्हणायचे, त्याची प्रकृती बरी असूनही तो सैन्यात दाखल का होत नाही? आपल्याला क्षय असल्याचं त्यानं कुणाला सांगितलेलं नव्हतं.

एकदा लॉरेन्स आणि फ्रीडा समुद्रकिनाऱ्यावर बसले असताना दोन पोलीस त्यांच्यामागच्या झुडुपामधून अचानक त्यांच्यासमोर येऊन उभे ठाकले. त्यांनी फ्रीडावर आरोप केली की तिच्या बॅगेत कॅमेरा आहे. या भागातील 'इन्स्टॉलेशन्स'ची छायाचित्रं घेण्याचा तिचा इरादा आहे! मी बॅग उघडली आणि पाव त्यांच्या नाकासमोर धरला. भले त्यांनी मला तत्क्षणी फासावर लटकवले असते तरी बेहत्तर, मला त्यांच्याविषयीची तुच्छता व्यक्त करायची होती!

११ ऑक्टोबरच्या रात्री लॉरेन्स आणि फ्रीडा, सेसिल ग्रेच्या घरी भोजनाला गेली. दोन पोलीस घरात घुसले. कारण त्याच्या घराच्या एका खिडकीमधून प्रकाश बाहेर फाकत होता. शत्रूंना इशारा देण्याचा हा प्रकार होता. लॉरेन्सनं त्यांच्याकडे दृष्टिक्षेप टाकला. म्हणाला, "काय मर्दानी कामं आहेत त्यांची.' खिडकीबाहेर चोरून ऐकणारी काही माणसं काळोखात घसरून चिखलात पडली याची फ्रीडाला गमंत वाटली. पण या गुन्ह्यासाठी ग्रेला जबरदस्त दंड भरावा लागला. लॉरेन्स घरी परतले तेव्हा त्यांना आढळून आलं की 'संशयित मुद्देमाल' शोधण्यासाठी त्याचं घर पार विस्कटून टाकण्यात आलं होतं. दुसऱ्या दिवशी सकाळी कुत्रे घेऊन लष्करी अधिकारी आला. त्याच्यासोबत एक पोलीस आणि दोन गुप्तहेर. अधिकाऱ्याने कोर्टाचा हुकूम वाचून दाखवला : लॉरेन्सांनी तीन दिवसात कॉर्नवॉल सोडून जावं. जो भाग निषिद्ध ठरवण्यात आला आहे तिथं त्यांनी वास्तव्य करता कामा नये. आणि ते जिथे जिथे जातील तिथले पत्ते त्यांनी पोलिसांना कळवायला हवेत. लॉरेन्सनं विचारलं, "ही सजा कशासाठी?" त्याला उत्तर मिळालं, "माझ्यापेक्षा तुम्हाला अधिक ठाऊक." फ्रीडाचं माथं भडकलं, म्हणाली, "व्वा! काय इंग्रजांचा न्याय!" लॉरेन्सनं तिला गप्प राहायला सांगितलं. तो अतिशय थंड होता, पण इंग्लंडच्या हत्याऱ्यानं पुन्हा एकवार त्याचा आत्मा भोसकला, आणि मला ठाऊक होतं, त्याला माझ्यापेक्षा अधिक क्लेश होत होते. त्याला कळत नव्हतं, आपणावर असा संशय का घेण्यात यावा!

पोलीस लॉरेन्सांच्या पाळतीवर आहेत हे विल्यम हेन्री हॉकिंगला माहीत होतं. पण त्यानं ते कधी लॉरेन्सच्या कानावर घातलं नाही. १५ ऑक्टोबरला त्यानं लॉरेन्सांना गाडीनं स्टेशनवर पोचवलं. पण त्यांच्याशी त्रयस्थपणे वागला. त्याच्या कुटुंबातील काही जणांनी तर लॉरेन्सांचा निरोप घेण्याचंही टाळलं.

"कांगारू'मध्ये ग्रेट वेस्टर्न एक्सप्रेसमधून लंडनला जात असतानाच्या प्रवासाचं लॉरेन्सनं

प्रत्ययकारी चित्रण केलं आहे. ट्रेनमध्ये प्लायमाऊथमधले सैनिक आणि नाविक दाटीवाटीनं बसले होते, गात होते. कॉर्नवॉलमधून बाहेर पडल्यानं पत्नीनं सुटकेचा श्वास टाकला होता, पण पती 'तिथं बसून होता, त्याला वाटत होतं जणू काही त्याचा मुडदा पाडण्यात आला आहे.' फ्रीडा सांगते. 'आम्हाला कॉर्नवॉलमधून बाहेर काढण्यात आलं तेव्हा त्याच्यामध्ये काहीतरी बदल घडून आला होता.' युद्धाचा आणि इंग्लंडचा त्याचा तिटकारा पराकोटीला पोचला होता. देश सोडून जाण्यासाठी त्याचा जीव कासावीस झाला होता. पण राष्ट्रीय सुरक्षिततेचा प्रश्न लक्षात घेऊन त्याला व्हिसा देण्यास नकार देण्यात आला होता. इंग्लंडच्या नरकवासातून त्याची सुटका नव्हती.

कॉर्नवॉल सोडल्यानंतर लॉरेन्स मेकलेनबर्ग स्क्वेअरमध्ये राहिले. ॲल्डिंग्टनांनी त्यांना आपल्या घरातील एका खोलीत राहायला दिलं. इथंच डोरोथी यॉर्क या लावण्यवतीशी त्याचा परिचय झाला. पंचवीस वर्षाची ही तरुणी रिचार्ड ॲल्डिंग्टनच्या प्रेमात पडली. हीच पुढं लॉरेन्सच्या 'आरोन्स रॉड' मध्ये जोसेफाईन फोर्ड या नावानं अवतरली. ॲल्डिंग्टननं अनेकवार तक्रार केलेली आहे की १९१७ मध्ये लॉरेन्सला ज्यांनी ज्यांनी मदत केली त्या साऱ्यांची 'कॅरीकेचर्स', 'आरोन्स रॉड'मध्ये केलेली आढळतात : डोरोथी यॉर्कव्यतिरिक्त रिचार्ड ॲल्डिंग्टन (रॉबर्ट कनिंगहॅम), हिल्डा ॲल्डिंग्टन (रॉबर्ट पत्नी ज्युलिया), सेसिल ग्रे (सिरील स्कॉट) आणि ऑगस्टस जॉन (चित्रकार स्ट्रथेर्स)

लॉरेन्सची आर्थिक परिस्थिती अत्यंत हलाखीची होती. फेब्रुवारीमध्ये त्याच्या खिशात फक्त ९ पौंड १९ शिलींग होते. आपल्याला अनुदान देण्यात यावं म्हणून त्यानं 'रॉयल लिटररी फंडा'कडे फॉर्म भरून पाठवले. त्याची ओढगस्त पाहून कॉटनं स्वत:पाशी असलेले अखेरचे १० पौंड त्याला देऊ केले. कॅथरीन कार्सवेलनं त्याला सुचवलं की त्यानं पुन्हा शिक्षकाचा पेशा स्वीकारावा. पण अश्लील म्हणून ज्याच्या लिखाणावर शिक्कामोर्तब झालेलं होतं अशा लेखकाला शिक्षकाची नोकरी देण्यास फारच थोड्या शाळा धजावल्या असत्या. १९१८च्या ऑक्टोबरमध्ये स्वप्रयत्नानं 'द टाइम्स लिटररी सप्लीमेंट'साठी शिक्षणपद्धतीवर लेखमाला लिहिण्याचं काम त्यानं पत्करलं. आठवड्याला त्याला तीन पौंड मिळत. पण हे काम आपल्या हातून होणं कठीण असल्याचं त्याला आढळून आलं.

दरम्यानच्या काळात लॉरेन्स मेकलेनबर्ग स्क्वेअरमधून बर्कशायरमध्ये राहायला गेले होते. इथली कॉटेज त्यांना रॅडफोर्ड या मित्रांनी दिली होती. एप्रिलला इथला मुक्काम त्यांना हलवावा लागला होता. डॉली रॅडफोर्डला स्वत:साठी ती कॉटेज हवी होती. लॉरेन्सची बहीण ॲडा हिनं त्यांच्यासाठी डर्बीशायरमधील 'मिडलटन– बाय– विर्क्सवर्थ येथे एक कॉटेज धुंडाळली होती. भाड्याची व्यवस्था तिनं स्वत:च्या पैशामधून केली होती पण पाठीशी लागलेलं दारिद्र्य, साहित्य प्रकाशित करण्यास मिळत असलेले नकार, परावलंबित्व यामुळं लॉरेन्स नाउमेद झाला होता.

११ सप्टेंबरला लॉरेन्सला पुन्हा एकवार लष्करी तपासणीसाठी बोलावण्यात आलं. २६



अनुक्रमणिका

सप्टेंबरला तो डर्बीमध्ये गेला. तिथल्या शाळेच्या एका मोठ्या खोलीत त्याची तपासणी झाली. या अनुभवाचं चित्रण 'कांगारू'मध्ये आढळतं. सोमर्स (लॉरेन्स) सांगतो त्याचं नाक कुत्र्यासारखं किंचित वर करण्यात आलं. त्यानं पाहिलं, जणू काही फर्निचर असल्यागत माणसांना हाताळलं जात होतं, आणि त्यानं ठरवलं अशा प्रकारे पुन्हा कधीही त्याला कुणी स्पर्श केलेला खपवून घ्यायचा नाही, त्याचे गुह्य भाग हाताळणाऱ्यांना त्यानं शाप दिले : 'त्यांचे डोळे फुटोत आणि त्यांच्या हाताच्या सुक्या काड्या होवोत आणि त्यांची काळिजं सडून जावोत.'

वैद्यकीय तपासणी झाल्यानंतर लॉरेन्स घरी परतला. त्यानं सिंथिया ॲस्क्विथला पत्र लिहिलं. पत्रात तिच्या मदतीची अपेक्षा व्यक्त केली. बहुधा, सरकारच्या शिक्षणखात्यात नोकरी मिळवून देण्याबाबत असावी. उद्वेगानं लिहिलं की जुन्यापुराण्या डबड्याला लाथा हाणाव्यात तशा लाथा त्यानं खाल्ल्यात तेवढ्या पुरे झाल्यात. या मिलिटरीवाल्यानं त्याला कुठलंही गलिच्छ काम करायला बोलावलं तर तो तोंड घेऊन निघून जाईल आणि वाळवंटात स्थायिक होईल. त्याच रात्री त्यानं कॅथरीन कार्सवेलला लिहिलं की समाज आणि मानवता यांचा त्याला उबग आला आहे. लेबर पार्टी आणि लष्कर जाऊ दे खड्ड्यात. त्याचं व्यक्तिगत आयुष्य मस्त आहे, स्नेही असे थोडे लोक आहेत, बाकीच्यांना करू दे त्यांना काय हवं ते.

५ नोव्हेंबरला त्यानं ॲमी लोवेलला लिहिलं : 'माझी खरोखरीच मनापासूनची एकच इच्छा आहे– पंख हवेत, फक्त पंख हवेत आणि दूर दूर उडून जावं– दूरवर.'

१९१८साल संपलं १९१९च्या जुलैमध्ये व्हर्साइलच्या तहानं युद्ध–समाप्तीवर शिक्कामोर्तब केलं. लॉरेन्सनं पुन्हा एकवार पासपोर्टसाठी अर्ज केला.

---

साहित्यप्रकारांपैकी निबंध हा वाङ्मयप्रकार असा आहे की, ज्यात फार मोठे, जड, दीर्घ असे शब्द आवश्यकच असतात असं नाही. निबंधाबाबतीत अपेक्षा फक्त एवढीच असते की, निबंध–वाचनाने आपल्याला निखळ आनंद मिळावा. (इथे अर्थातच ललित निबंध अपेक्षित आहे) निबंध वाचायला म्हणून आपण जेव्हा शेल्फवरून पुस्तक घेतो तेव्हा फक्त आनंदाचा अनुभव मिळावा एवढीच इच्छा आपल्या मनात असते. निबंधाने पहिल्या शब्दापासून आपल्याला आकर्षित करावे आणि शेवटचा शब्द वाचून आपण जेव्हा पुस्तक खाली ठेवतो तेव्हा आपलं मन ताजं, टवटवीत व्हावं. निबंधवाचनाच्या आरंभापासून अंतापर्यंत पोचेपर्यंत आपण वेगवेगळ्या प्रकारच्या अनुभवांतून जातो. त्यात कधी आश्चर्य असतं, कधी मनोरंजन असतं, कधी कुतूहल तर कधी त्यात पूर्णपणे रस निर्माण होऊन गुंतवणूक निर्माण होते. असे अनुभव देणाराच निबंध खरा चांगला म्हणावा.

–व्हर्जिनिया वुल्फ

---



फ्रांझ काफ्का
(१८८३-१९२४)

जागतिक वाङ्मयात स्वतःचे घराणे निर्माण करणारा
जर्मन कथा-कादंबरीकार.

विसाव्या शतकातील
या महान साहित्यिकाचा परिचय करून देणारा
मराठीमधील पहिला ग्रंथ

# थोडाबहुत काफ्का

शकु नी. कनयाळकर

१८८३-१९१८ या कालखंडातील काफ्काचा जीवनवृत्तांत.
'द ट्रायल' या कादंबरीचा संक्षिप्त अनुवाद.

चरित्रपट, वाङ्‌मयसूची इ. आर्टपेपरवरील ५२ छायाचित्रे
एकूण पृष्ठे २६० + ४ + १६

मूळ किंमत रु. २००
'तपशील' च्या वर्गणीदारांना
सवलतीची किंमत रु. १२०



अनुक्रमणिका

